पेशवाईचें

मन्वंतर

१३




लेखक— विठ्ठल वामन हडप

प्रकाशक— परचुरे, पुराणिक आणि मंडळी, मुंबई नं. ४




किंमत

कागदी बांधणी १०८ ]

[ कापडी बांधणी

"कादंबरीमय पेशवाई"मधील
याच लेखकाच्या पूर्वीच्या
बारा कादंबऱ्या

---

पेशवाईचें पुण्याहवाचन

पेशवाईची प्राणप्रतिष्ठा

पेशवाईचें ध्रुवदर्शन

पेशवाईचा ध्रुव ढळला?

पेशवाईचा पुनर्जन्म

पेशवाईचें पुनर्वैभव

पेशवाईचा दरारा

पेशवाईंतील दुर्जन

पेशवाईंतील पश्चिमदिग्विजय

पेशवाईंतील धर्मसंग्राम

पेशवाईंतील उत्तरदिग्विजय

पेशवाईवरील गण्डान्तर



—प्रकाशक—
बळवंत विष्णु परचुरे
परचुरे पुराणिक आणि मंडळी
बुकसेलर्स व पब्लिशर्स, माधवबाग,
मुंबई नं. ४

—मुद्रक—
शंकर रामचंद्र दाते
अ. वि. गृह—लोकसंग्रह प्रेस,
६२४ सदाशिव, पुणें.

# भूमिका



'**पेशवाईचें मन्वंतर**' ही 'कादंबरीमय पेशवाई' मालेंतील तेरावी कादंबरी होय. या मालेंतील यापूर्वींच बारा कादंबऱ्यांहून या कादंबरीचें स्वरूप जरासें भिन्न आहे. तें असें कीं, यापूर्वींच्या कादंबऱ्यांत बहुश: पेशव्यांचा प्रामुख्यानें उल्लेख व संबंध आलेला आहे; व प्रस्तुत कादंबरींत तसा खुद्द पेशव्यांच्या मर्दुमकीचा फारसा अंश नाहीं. थोरले बाजीराव पेशवे निधन पावल्यावर त्यांच्या पश्चात् पेशवाईचीं वस्त्रें कोणाला द्यावीं याविषयीं साताऱ्याला शाहूमहाराजांच्या दरबारांत फारच मतभेद माजून राहिले होते, त्याच सुमाराला रघूजी भोंसले व फत्तेसिंग भोंसले वगैरे पराक्रमी वीरांच्या नेतृत्वाखालीं कर्नाटकची मोहीम जोरानें सुरू होती. वस्तुत: अर्काटचा नबाब व तंजावरचे राजे यांच्यांतील कटकटी नबाबाच्या अघोर राज्यतृष्णेमुळें त्यापूर्वींच फारां दिवसांपासून अधिकाधिक विकोपाला जात होत्या. नबाब हळूहळू कर्नाटकांतील सर्व हिंदु राजा--महाराजांना व पाळेगारांना मातीला मिळवून व त्याबरोबरच हिंदु धर्माची श्रेष्ठता नष्ट करून कर्नाटकांत एकट्या स्वत:ची इस्लामी सार्वभौम सत्ता प्रस्थापित करण्याच्या खटपटींत होता-हिंदुपदपादशाहीचा जगड्व्याळ उद्योग जो मराठ्यांनीं व पेशव्यांनीं आरंभिला होता, त्याला विघातक असाच हा अर्काटच्या नबाबाचा उद्योग होता. तो उद्योग तसाच वाढूं दिल्यास हिंदुपदपादशाहीचा उद्योग निदान कर्नाटकांत तरी स्वप्नवत् ठरून श्रीछत्रपति शिवाजी महाराजांनीं अहर्निश परिश्रमांनीं आचरून नांवारूपाला आणलेलें गो--ब्राह्मण--प्रतिपालनाचें महान् व्रत विफल ठरणार; तें संकट टाळण्यासाठीं मराठशाहीच्या कर्त्या पुरुषांना कर्नाटकावर स्वारी करून तेथील यावनी .जुलुम--जबरदस्तीला आळा घालून आपला दरारा तेथें बसविणें प्राप्तच होतें. असा हा कर्नाटकांतील मोहिमेचा चिरस्मरणीय ऐतिहासिक प्रसंग प्रत्यक्ष पेशव्यांच्या यशोगानांत पूर्णत्वानें सामावणारा नसला तरी तो 'कादंबरीमय पेशवाई'च्या कथाविस्तारांतून बाजूला ठेवण्याजोगा खास नव्हता. त्या मोहिमेंत मराठे विजयी न होते तर, त्यांच्या

हिंदुपदपादशाहीच्या महत्त्व महत्त्वाकांक्षा, ज्या पुढें क्रमाक्रमानें उत्कर्ष पावून सुमारें पाऊण शतकानंतर कालगतीप्रमाणें अपकर्षही पावल्या, त्या मुळांतच फोल ठरल्या असत्या. इतका आणीबाणीचा प्रसंग तो होता; म्हणूनच पेशव्यांचीं यशोगीतें गाण्याला त्यांत फारसा अवसर नसतांही पेशवाईचें महत्त्व अप्रत्यक्षतः वाढविणारा तो प्रसंगविशेषच प्रस्तुत कादंबरीसाठीं निवडावा लागला. या प्रसंगांतही इतक्या खरोखरीच्या अद्‌भुत व रोमांचकारी घटना घडलेल्या आहेत कीं त्यांचें नुसतें यथावत् ऐतिहासिक निवेदनही वाचकांना विस्मयचकित करून सोडील.

या कादंबरींतील मुरारराव घोरपडे, रघूजी भोंसले, मानाजी, कोयाजी घाटगे, प्रतापसिंह महाराज, सफ्‌दरअल्ली, मीर असद, वगैरे महत्त्ववान् पुरुष तर पूर्ण ऐतिहासिक आहेतच. पण चंदासाहेबाच्या रूपयौवनावर भाळून सर्वस्वीं फंसलेली व त्रिचनापल्लीचें महत्त्ववान् हिंदी राज्य चंदासाहेबाच्या पचनीं पडण्याला कारण होणारी त्रिचनापल्लीची राणी मीनाक्षी, तंजावरच्या राजवटींतील यवन मुत्सद्दी सय्यदखान याच्या अत्याचाराला बळी पडून भ्रष्ट झालेली एका देवालयांतील देवदासी मोहना, स्वतःला पुत्रसंतति नसतां रूपी नांवाच्या बटकीचा एक मुलगा जवळ करून तो आपलाच पुत्र असें सांगून कोयाजी घाटग्याच्या कुटिल संमतीनें त्या दासीपुत्राला (तो इतिहासांत काटराजा या नांवानें प्रसिद्ध आहे) तंजावरच्या गादीवर बसविण्यासाठीं नाना कारस्थानें करणारी अपरूपा राणी, या स्त्री–भूमिकाही पूर्णपणें ऐतिहासिक आहेत. करुणा राणी, झुंझारराव, सच्चिदानन्द वगैरे अवान्तर व्यक्ति काल्पनिक असल्या तरी त्या इतर प्रमुख ऐतिहासिक व्यक्तींच्या व मुख्य इतिहासप्रसंगाच्या पूरक आहेत. त्यामुळें कथानकांतील ऐतिहासिक ओघ बदलणार नाहीं व त्याला वैगुण्यही येणार नाहीं, अशी शक्य ती खबरदारी घेण्यांत आली आहे. शिवाय ऐतिहासिक कादंबरी म्हणजे खरा इतिहास नसून इतिहासाची आभासात्मक स्थूल रूपरेखा होय, इतकें विस्तृत कथाक्षेत्र मीं 'कादंबरीमय पेशवाई'च्या पहिल्या कादंबरीपासून आंखून घेतलेलें आहे, हें माझ्या वाचकांना माहीत आहेच.

'पेशवाईवरील गंडांतर' ही 'कादंबरीमय पेशवाई'मधील बारावी कादंबरी प्रसिद्ध झाल्यानंतर ही तेरावी कादंबरी प्रसिद्ध होण्याला दोन वर्षांपेक्षां जास्त

अवधि लागला व त्यामुळें या कार्याविषयीं अनेकांना शंकाकुशंका काढण्याला अवसर मिळाला. कांहींची अशी गैरसमजूतही होऊन बसली कीं–गेल्या वर्षी त्यांपैकीं एका गृहस्थानें महाराष्ट्र–वाङमयाचा सांवत्सरिक आढावा घेतांना "मराठींत ऐतिहासिक कादंबऱ्यांविषयीं लोकांना आतां विशेष आवड राहिली नाहीं. त्यामळें ऐतिहासिक कादंबऱ्या मराठींत अलीकडे प्रसिद्ध होत नाहींत. याचें प्रत्यंतर म्हणजे श्री. हडप यांच्या 'कादंबरीमय पेशवाई' मधील एकही कादंबरी या वर्षी प्रसिद्ध झाली नाहीं." अशा आशयाचे उद्‌गार आपल्या लेखांतून काढले. दुसऱ्या कांहींनीं मला लेखकालाच दोष दिला; व खुद्द मालेचा वाचकवर्ग तर मी आणि 'कादंबरीमय पेशवाई'चे प्रकाशक या दोघांवरही थोडा फार रुष्ट झाला आहे. हा रुष्टपणा अर्थात् आपुलकीचा आहे; मालेंतून साधारणत: दर तीन महिन्यांनीं एक कादंबरी प्रसिद्ध करावयाची या आमच्या पूर्वसंकल्पानुसार कार्य मुळींच होत नाहीं याबद्दलचा तो रुष्टपणा आहे. त्यांत वाचकांची 'कादंबरीमय पेशवाई' विषयींची उत्कंठा व आपुलकीच ठळकपणें दिसून येत आहे. व म्हणूनच आम्ही— लेखक व प्रकाशक दोघेही वाचकांचा तो रुष्टपणा शुभाशिर्वाद म्हणून अत्यादरानें शिरीं धारण करून हें कार्य आजवर अपरिहार्य कारणांमुळें दिरंगाईवर पडलें होतें त्याबद्दल वाचकांची मन:पूर्वक क्षमा मागतों व यापुढें अशी दिरंगाई वाचकांना अनुभवावी लागणार नाहीं असें त्यांना आश्वासन देतों.

मात्र 'सरासरी गुडघाभर पाणी' अशी वाङमयाची सरासरी काढण्यासाठीं 'कादंबरीमय पेशवाई'चा आधार घेऊन, ज्या अर्थी या मालेंतील कादंबऱ्या अलीकडे प्रसिद्ध झाल्या नाहींत त्या अर्थी वाचकांची ऐतिहासिक कादंबऱ्यांविषयींची आवड ओसरत चालली असे अदूरदर्शीपणाचे अंदाज काढणाऱ्या व इतर सर्व शंकेखोरांना आणि टीकाकारांनाही मी येथें स्वानुभवानें नम्रतापूर्वक सुचवूं इच्छितों कीं त्यांचा हा युक्तिवाद सुतराम् खरा नाहीं. एवढें खरें आहे कीं, काळ झपाट्यानें पालटत आहे, त्याप्रमाणेंच नव्या पिढीची रुचिपालटही होत आहे; तरुण पिढी झपाट्यानें प्रगतिपथाचें आक्रमण करीत आहे. अशा वेळीं पुराणेतिहासांतील 'शिळोप्याच्या गोष्टी' वाचण्यापेक्षां आजकालचे प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न ज्यांत करण्यांत आला आहे अशा सामाजिक कथा–कादंबऱ्या वाचकांना वाचावयाला आवडतात. आणि वाचकांकडून मजवर

आत्मप्रौढीचा आरोप लादला जाणार नाहीं अशा भरंवशानें मीही सांगतों कीं मला स्वतःला देखील 'शिळोप्याच्या गोष्टी' मुळींच आवडत नाहींत. तथापि प्रगमनशील कुशल लेखक जर पुराणेतिहासांतील परंपरागत शिळेपणा दूर करण्यासाठीं देश—काल—परिस्थितीशीं त्या शिळ्या गोष्टींचा योग्य समन्वय करून आणि वर्तमानकाळ व भविष्यकाळ यांकडे नजर देऊन आज व उद्यांही मार्गदर्शक होईल असें पौराणिक व ऐतिहासिक कथावाङमय निर्माण करील, तर तें निःसंशय लोकमतप्रवर्तक होतें व तें वाचकांना आवडतेंही. 'कादंबरीमय पेशवाई'मधील कादंबऱ्यांची रचना मी प्रारंभापासून याच जाणिवेनें करीत आलों आहें, व त्यामुळेंच सहस्त्रावधि वाचकांना ही माला कधीं एकदां यथावत् पूर्ण होते आणि या मालेंतील संकल्पित पंचवीस कादंबऱ्यांपैकीं सर्व कादंबऱ्या कधीं एकदां वाचावयाला मिळतात अशी तळमळ लागून राहिली आहे.

इतर सामाजिक कथा—कादंबऱ्या लिहिण्यापेक्षां ऐतिहासिक कादंबऱ्या मूळ इतिहासांतील शिळेपणा दूर करून पण ऐतिहासिकता कायम ठेवून व सत्यविवेचनात्मक परंतु जिवंत अशा पद्धतीनें लिहिणें बरेंच अवघड आहे. सामाजिक कथा—कादंबऱ्यांतून लेखकाला आपल्या कल्पनांच्या खेळाचा पसारा जसा निरंकुशपणें मांडतां येतो, तसा ऐतिहासिक कादंबऱ्यांतून मांडतां येत नाहीं. यामुळें सामाजिक कथा—कादंबरी—लेखन जितक्या झपाट्यानें करतां येतें, तितक्या झपाट्यानें ऐतिहासिक लेखन करतां येत नाहीं. गेल्या दोनतीन वर्षांत पेशवाईवरील कादंबरी एकही निघाली नाहीं, पण माझा इतर वाङमय-पसारा बराच वाढला याचें कारण हेंच होय. तथापि यापुढें 'कादंबरीमय पेशवाई' मधील कादंबऱ्या आतां नियमितपणें दर तीन महिन्यांनीं एक याप्रमाणें पूर्वसंकल्पानुसार माझ्या हातावेगळ्या होतील असें मी येथें माझ्या प्रिय वाचकांना आश्वासन देऊं शकतों. कारण ही तेरावी कादंबरी हातावेगळी करतांना 'पेशवाईचा पुनर्विकास' ही मालेंतील चौदावी कादंबरी लिहून तयार असून पुढील पंधरावी कादंबरीही बहुतेक पुरी झाली आहे. कोणत्याही कारणानें कां असेना, एकदां रेंगाळत पडलेलें मालेच्या प्रसिद्धीकरणाचें काम पुन्हां सुरू करावयाचें तें त्याला पुन्हा अस्थानी विलंबाचें गालबोट लागूं नये अशा तयारीनेंच सुरू करावयाचें असें मीं

**प्रकाशकांच्या, माझ्या व वाचकांच्या वतीनें ठरवून ही नियमितपणाची पूर्वतयारी केली आहे. अर्थात यापुढें 'कादंबरीमय पेशवाई' मधील कादंबऱ्या नियमितपणें यथासंकल्प प्रसिद्ध होत जातील असा भरंवसा वाचकांनीं बाळगावयाला मुळींच हरकत नाहीं असें वाटतें.** वाचकांपेक्षां प्रकाशकांना व प्रकाशकांपेक्षां मला हें कार्य शक्य तितकें सर्वांगसुंदर व शक्य तितकें लवकर हातावेगळें केव्हां होतें अशी तळमळ लागून राहिली आहे. 'कादंबरीमय हिंदवी' हें माझें अत्यंत प्रिय असें जीवितकार्य आहे, व 'कादंबरीमय पेशवाई' हा त्या जगड्व्याळ कार्याचा एक भाग आहे. वाचकवृंदालाही माझी ही वाङ्मयसेवा अत्यंत प्रिय होऊन बसली आहे. हें कार्य नियमितपणें झालें तरच माझ्या या जन्मीं हातावेगळें होईल एवढें विराट आहे, व हें कार्य केल्याशिवाय मी इहलोकची यात्रा संपविण्याला तयार नाहीं. ऐन तारुण्यांत मीं एथवरची मजल गांठली आहे, त्या अर्थी हयातींत एवढें हें 'कादंबरीमय हिंदवी'मधील सुमारें चाळीसपन्नास ऐतिहासिक कादंबऱ्यांचें लेखनकार्य मी माझे इतर सर्व साहित्यविषयक व्याप सांभाळून पुरें करीन अशी उमेद बाळगल्यास ती अस्थानीं खास होणार नाहीं.

**आदर्श वाङ्मय प्रकाशन**
अक्षत्‌त्रितीया, शके १८५६,
पुणें २.

सर्वांचा नम्र,
**विठ्ठल वामन हडप**

'कादंबरीमय पेशवाई'ची पुढील चौदावी कादंबरी

# पेशवाईचा पुनर्विकास

थोरल्या बाजीरावांच्या निधनानंतर राजवटींतल्या प्रमाणेंच शाहू महाराजांच्या राजवाड्यांतही सवतीमत्सरामुळें व अधिकारतृष्णेमुळें दोन राण्यांतील अंत:कलहाची परमावधी झाली. रघूजी भोसले व बारामतीकर नाईक यांनीं थोरल्या राणी सकवारबाईच्या छायेखालून नानासाहेबांना पेशवाईपदावरून भ्रष्ट करण्याची शिकस्त केली. त्या विरोधकांच्या संघटित प्रयत्नांना कांहीं काळ यश आलें, तरी पुन्हां नानासाहेबांनाच बोलावून आणून राज्यकारभार त्यांच्या हातीं सोंपविणें महाराजांना प्राप्त झालें. त्या हृदयस्पर्शी प्रसंगावर ही कादंबरी विरचिली गेली आहे.

# पेशवाईचें मन्वंतर

## प्रकरण १ लें

## राणी मीनाक्षी फंसली !

त्रिचनापल्लीचा किल्ला* एवढा अजिंक्य—कर्नाटकांत फार पूर्वींपासून कैक शतकें अजिंक्य म्हणून जे किल्ले प्रख्यात होते, त्यांत अग्रस्थानीं चमकणारा मी मी म्हणणारे एकाहून एक कर्दनकाळ शत्रू अनेकदां तो किल्ला पाडाव करण्याच्या ईर्षेनें जिवावर उदार होऊन चालून आले. त्यांतले कांहीं किल्ल्याबाहेर बळी पडले तर कांहीं किल्ल्याच्या दरवाजांत हात टेंकून माघारे गेले; पण शत्रूकडील मुंगीलादेखील कधीं आंत रीघ मिळाली नाहीं. त्याच किल्ल्याचा दरवाजा एके दिवशीं एका अधमाधम म्हणून गाजलेल्या अविंधासाठीं एका क्षणांत सताड उघडा झाला व त्या अविंधाला आपल्या बरोबरच्या लढवय्या

---

* त्रिचनापल्ली एथें नायक राजे राज्य करीत असतां तेथील शेवटचा राजा विजयरंग हा इ. स. १७३१ त मृत्यु पावला व त्याच्या गादीविषयीं त्याची राणी मीनाक्षी आणि दुसरा वारस वंगारू तिरुमल यांच्यामध्यें तंटे सुरू झाले. ही उत्कृष्ट संधि साधून अर्काटच्या नवाबानें आपला मुलगा सफदरखान व जांवई चंदासाहेब यांस त्रिचनापल्ली एथील तंटा मिटविण्याकरितां पाठविलें. चंदासाहेबानें तेथें जाऊन मोठ्या युक्तीनें राणी मीनाक्षी हिला अनुकूल व वश करून घेतलें; आणि त्रिचनापल्लीचा किल्ला व फौज आपल्या ताब्यांत घेऊन त्या राजस्त्रीला विश्वासघातानें बंदिवासांत टाकलें. याप्रमाणें चंदासाहेब त्रिचनापल्लीचा स्वसत्ताधारी नवाब बनला आणि राणी मीनाक्षी ही बंदिवासांत दुःखाश्रू गाळीत आपल्या आयुष्याचे दिवस कंठूं लागली.. .. अशा प्रकारें इ. स. १७३६ मध्यें तंजावरच्या शेजारचें त्रिचनापल्लीचें प्राचीन हिंदु संस्थान चंदासाहेबाच्या ताब्यांत गेल्यामुळें त्याचें नांव दक्षिण हिंदुस्थानामध्यें प्रसिद्धीला आलें व तिकडील राजकारणामध्यें त्याचें महत्त्व फार वाढलें.

—इतिहाससंग्रह.

सैन्यासह हंसत खेळत किल्ल्यांत प्रवेश मिळाला! इतकेंच काय? पण तो अविंध आंत जातांच अनेक सुंदर व तरुण राजदासींचा ताफा त्याला पंचारत्या ओंवाळण्यासाठीं पुढें आला, व त्या दासीजनांनीं कुंकुमाक्षतादि मंगल चिन्हांनीं अलंकृत केलेल्या त्या अविंधाचें स्वागत करण्यासाठीं स्वतः राणी मीनाक्षी देखील सस्मित वदनानें किल्ल्यांतील राजमहालाच्या महाद्वारांत उभी होती!

असें कसें झालें? याचें कारण असें कीं, अर्काटचा नबाब दोस्तअल्ली हा तर अखिल भारतवर्षांतील हिंदवीला मूठमाती देऊन जिकडे तिकडे इस्लामी दुनियेचा जगड्व्याळ पसारा मांडण्यासाठीं हरयुक्तीनें झटणाऱ्या बादशाही सत्ताधारी यवनांत अग्रमालिकेंत शोभणारा. आणि तोदेखील बादशाही सत्तेच्या उत्कर्षासाठीं झटत नसून स्वतःच्या वैयक्तिक उत्कर्षासाठीं झटत होता. 'मी अर्काटचा नबाब आहें तो उभ्या कर्नाटकाचा नबाब होऊन स्वतंत्रपणें अपार राजवैभव कधीं उपभोगूं लागेन' ह्या महत्त्वाकांक्षेचें वेड त्याच्या अंगीं पुरेपूर बाणलेलें. तो कर्नाटकांतील सर्वच लहानमोठ्या हिंदु राजसत्तांना रात्रंदिवस पाण्यांत पहात होता. त्याचा जांवई चंदासाहेब हा तर आपल्या सासऱ्यालाही सहस्रवार बरा म्हणविणारा होता. त्याची तडफ व हिंदु राज्यें बुडवून सर्वत्र एकजात मुसलमानी सत्तेचा वरवंटा फिरविण्याची दुर्दम ईर्षा पाहूनच दोस्तअल्ली नबाबानें त्याला आपली मुलगी देऊन घरजांवई केलें होतें, व आपल्या दिवाणपदाचीं वस्त्रें देऊन त्याला मोठ्या मान्यतेला चढविलें होतें. नबाबाचा घरजांवई झाल्यापासून चंदासाहेबानें कर्नाटकांत जीं अनन्वित कृत्यें केलीं होतीं त्यांचा दुष्कीर्तिमय दुर्गंध नुसत्या कर्नाटकांतच नव्हे, तर जवळजवळ आसेतुहिमाचल दरवळूं लागला होता. हिंदु काय, मुसलमान काय किंवा इंग्रज–फरेंच वगैरे वणिग्वृत्तीच्या बुरख्याखालीं आपल्या राजसत्तेचें जाळें हिंदुस्थानभर फेंकण्याला टपून बसलेले परद्वीपस्थ लोक काय, सर्वांनाच चंदासाहेब हें एक सर्पाचें पिल्लूं आहे असें खात्रीपूर्वक वाटत होतें. अशा कलिपुरुषाला त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांत अनिरुद्धपणें प्रवेश मिळालेला पाहून कोणालाही आश्चर्य वाटणें अगदीं स्वाभाविक होतें.

पण ह्या प्रकारामुळें किल्ल्याबाहेरच्या लोकांना जितकें आश्चर्य वाटलें तितकें किल्ल्यांतल्या लोकांना वाटलें नाहीं. चंदासाहेबाला किल्ल्यांत

प्रवेश कां मिळाला हें त्या लोकांना माहित होतें. तेथली तरुण, विधवा व विलासप्रिय राणी मीनाक्षी चंदासाहेबाच्या मोहजालांत गुरफटली गेली आहे हें त्यांतील इंगीत किल्ल्यांतल्या बहुतेक लोकांना कांहीं दिवसांच्या प्रत्यक्ष अनुभवानें कळून चुकलें होतें. तेथला राजा विजयरंग हा मृत्यु पावल्या-दिवसापासून त्या तरुण राणीच्या वर्तनाविषयीं लोकांना संशय घ्यावयाला भरपूर अवसर मिळण्याजोग्या अनेक गोष्टींचा बोभाटा झाला होता. राजाच्या मृत्यूनंतर कांहीं काळ राणी मीनाक्षीच राज्य करीत होती. असा प्रकार कांहीं वर्षें चालल्यानंतर बंगारू तिरुमल या नांवाचा दुसरा एक वारस पुढें येऊन गादीसाठीं भांडूं लागला व ही भाऊबंदकी राज्याचें अंतरंग दिवसें-दिवस चांगलेंच पोंखरून खाऊं लागली. ही संधि तें राज्य गिळंकृत करण्याला फार नामी आहे असें पाहून नबाब दोस्तअल्लीनें चंदासाहेबाला त्रिचनापल्ली-कडे तिऱ्हाइती करून तेथली भाऊबंदकी मिटवण्याच्या मिषानें पाठविलें. नवाब मोठा धूर्त व अनुभवी माणूस होता. विजयरंगाच्या मृत्यूपासून पुढें चांगलीं पांचसात वर्षें त्यानें त्या राज्यांतील घडामोडींकडे डोळ्यांत तेल घालून लक्ष ठेवलें होतें. त्यामुळें तरुण राणीची विषयांधता व वृत्तिचांचल्य आणि तिला प्रतिस्पर्धी म्हणून पुढें आलेल्या तिरुमलाची असहायता त्याला चांगली माहीत झाली होती. चंदासाहेबाची स्त्रियांच्या बाबतींतील नैसर्गिक अधम वृत्तीदेखील नबाबाच्या पूर्ण परिचयाची होती. असें असतां पांचसात वर्षांपावेतों नबाबानें ह्या बाबतींत कांहींच हालचाल केली नाहीं याचें कारण राणी व तिरुमल यांपैकीं कोणता घांस आपणाला दांत लावण्याचे देखील श्रम न घेतां घशांत टाकतां येईल याचा अचूक अंदाज त्याला मिळाला नव्हता. राणी कशी झाली तरी बायको माणूस, तिच्या अंगीं राज्यकर्तृत्व तें काय असणार! तिचा प्रतिस्पर्धी तिला आज ना उद्यां बाजूला लोटून स्वतः राजा होण्याइतका चतुर व कर्तबगार होता. न जाणो, आज त्याला दुखवन राणीला पाठीशीं घालावें, आणि उद्यां त्याचीच सरशी झाली तर! ह्या भीतीस्तव नबावाच्या मनांतून तिरुमलालाच शक्य तों आपल्या पंखाखालीं ओढावयाचें होतें. परंतु जाणूनबुजून शत्रूच्या जबड्यांत शिरून तेथें झोंपीं जाण्याइतका तिरुमल भोळा नाहीं असें आढळून येतांच राणीला व तिच्या निमित्तानें त्रिचनापल्लीच्या राज्याला घशांत टाकण्याचा त्याचा निश्चय

कायम होऊन त्यानें त्या कामगिरीवर आपला जांवई चंदासाहेब आणि मुलगा सफदरअल्ली यांची योजना केली. पैकीं चंदासाहेब रूप व बुद्धि ह्या दोन्ही बाजूंनीं सफदरअल्लीपेक्षां पुष्कळच उजवा असल्यानें राणीला वश करण्याच्या कुटिल कारस्थानांत तोच अखेर विजयी झाला व सफदरअल्लीला हिर-मुसल्या वृत्तीनें माघारें यावें लागलें.

चंदासाहेबानें आज उघडपणें त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांत प्रवेश करण्या-पूर्वींच परस्पर संन्याशाच्या हातून विंचू मारावा त्याप्रमाणें राणीकडून तिचा प्रतिस्पर्धी तिरुमल याला हद्दपार करविलें होतें. तिरुमलाला नवाब व चंदासाहेब यांच्या ह्या कृष्णकारस्थानाची चांगली ओळख पूर्वींच झाली असल्यानें त्यानें हद्दपार होण्यापूर्वीं एकदां राणीपाशीं त्याचा आपलेपणानें परिस्फोट करून तडजोडीची इच्छाही दर्शविली होती. पण कामांध राणीला ती आपल्या प्रियकराची वृथा निंदाशी वाटली, व तिनें तिरुमलाशीं तडजोड न करतां उलट त्याला हद्दपार केलें.

मात्र राणी जरी विषयांध होती तरी भोळी नव्हती. ती चंदासाहेबासारख्या प्रियकराच्या सहवाससौख्यासाठीं आपल्या राजवैभवावर लाथ मारायला तयार नव्हती. चोहोंकडून लोक चंदासाहेबाच्या कृष्णकारस्थानाविषयीं बोलूं लागले, त्याचा तिच्या मनावर मुळींच परिणाम झाला नाहीं असें नाहीं. पण मुसलमान लोक हे एरव्हीं लबाडी, फंसवाफंसवी व क्रूरपणा अशीं कितीही अनन्वित कृत्यें करायला तयार झाले तरी ते आपल्या धर्माशीं कधींच बेइमान होणार नाहींत, असा तिचा प्रामाणिक समज होता. तिनें चंदासाहेबाला किल्ल्यांत प्रवेश देण्यापूर्वीं एके दिवशीं एकान्तांत "तुम्ही किल्ल्यांत आल्यावर माझ्याशीं बेइमानी तर करणार नाहीं ना?" असें विचारलें व त्या निमित्तानें आपल्या कानांवर आलेले सारे लोकप्रवाद त्याच्या कानांवर घातले. चंदा-साहेबानें अर्थात् त्या सर्व आरोपांचा इन्कार केला. इतकेंच काय पण आपल्या निर्दोषतेचें नाटक यथावत् रंगावें म्हणून कुराणाच्या शपथेवर राणीशीं इमान राखण्याचें वचन देण्याला तो तयार झाला. त्याला वाटलें होतें कीं राणी त्या थराला प्रसंग आणणार नाहीं. पण राणीला तें पाहिजेच होतें. तिनें कुराणाची शपथ घ्यावयाला सांगतांच त्यानें आपल्या एका नोकराला अंमळ बाजूला घेऊन प्रथम हळुहळू कायसें त्याच्या कानांत पुटपुटून लगेच राणीला

ऐकू जाईल अशा मोठ्यानें त्याला कुराण आणावयाला सांगितलें. नोकरानें भरजरी बासनांत बांधून आणलेलें कुराण (?) हातीं घेऊन त्यानें राणीच्या देखत नतमस्तकपूर्वक शपथ वाहिली, " ह्या माझ्या पवित्र कुराणाला स्मरून मी आपणाला वचन देतों, राणीसाहेब! मी आपणाशीं आजन्म विश्वासानें वागेन व त्रिचनापल्लीची सारी राजसत्ता आपल्या हातीं अव्याहतपणें राहील अशी तजवीज मी करीन. "

त्याच वेळीं राणीनें पुढेंमागें आपल्या मांडीवर दत्तक घेऊन त्याच्या नांवानें राज्य चालविण्याचा आपला मनोदय व्यक्त केला,व त्या तिच्या धूर्त प्रियकरानें त्याही गोष्टीला कुराणाच्या शपथेनें संमति दिली. आतां राणीला अविश्वास बाळगण्याचें कारण कोठें उरलें ? इतकेंच काय पण राणीनें आपल्या सर्व कारभाऱ्यांनाही आपली ही सर्व मसलत कळविली व त्यांपैकीं बहुतेकांनीं तिच्याप्रमाणेंच भोळेपणानें चंदासाहेबाच्या शपथेविषयीं विश्वास दाखविला. ज्या थोड्या महत्त्वाच्या लोकांनीं याविषयीं अविश्वास दाखविला, त्यांच्या वाट्याला तुरुंगवास आला, व कांहींचा तर किल्ल्याच्या तटावरून कडेलोटही करण्यांत आला.

इतक्या खुल्या दिलानें एकमेकांच्या आणाभाका झाल्यावर त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांत चंदासाहेबाला राजरोसपणें घरच्या मालकाप्रमाणें प्रवेश मिळाला यांत नवल तें काय ? पण किल्ल्याच्या आंत प्रविष्ट होतांच सूर्यास्ताच्या पूर्वींच चंदासाहेबानें आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. किल्ल्यावरील कोणते लोक आपणाला अनुकूल आहेत व कोणते प्रतिकूल आहेत हें त्याला इतक्या दिवसांच्या अनुभवानें चांगलें माहीत होतें. जे लोक अनुकूल होते, त्यांना त्यानें ज्याच्या त्याच्या अपेक्षेप्रमाणें खूष केलें. जे अर्धवट निश्चयाचे पण स्वार्थसाधू होते, त्यांनाही त्यानें हां हां म्हणतां आपल्या बाजूला वळवून घेतलें. मात्र जे विरुद्ध होते, त्यांची सर्रास कत्तल करून आपल्या प्रतिस्पर्धी पक्षाचा नायनाट करायला त्यानें कमी केलें नाहीं. राणीला हा अनर्थ पाहून अत्यंत विस्मय वाटला. तिनें त्याला त्या कृत्याचा जाबही विचारला, " माझ्यावर तुमचें प्रेम होतें, त्या प्रेमाचा हाच अर्थ काय ? "

यावर त्यानें खुनशीपणानें हंसून तिला उत्तर दिलें, " राणीसाहेब ! माझें प्रेम तुमच्या दौलतीवर होतें, तुमच्यावर नव्हतें. मला विलासविहारांची

आवड आहे खरी; पण माझ्या जनानखान्याला पुरून उरण्याइतक्या सुंदर व तरुण मुली तुमच्या राज्यांत मला मिळण्याजोग्या असतांना मी तुमच्या ठायींच कां म्हणून आसक्त राहूं ? रोज तीनत्रिकाळ ताज्या ताज्या सुवासिक फुलांची पखरण पायांवर पडावी इतका मी थोर भाग्यवान् असतांना निर्माल्यांतील कोमेजलेल्या फुलावर मीं संतोष कां म्हणून मानावा ? "

त्याच्या त्या परमावधीच्या निष्ठुर बोलांनीं बिचाऱ्या राणीच्या हृदयाचे शतशः तुकडे तुकडे केले. आपण फंसलों, ह्या विश्वासघातकी चांडाळानें आपला केंसानें गळा कापला, हें ती पक्कें ओळखून चुकली. तिनें त्याला काकुळतीला येऊन विचारलें, " विश्वासघातक्या, तूं माझ्याशीं बेइमान झालास तो झालास; पण आपल्या धर्माशींदेखील बेइमानी करतोस ! तूं अस्सल मुसलमान नाहींस. "

" मी अस्सल मुसलमान आहें. मीं माझ्या धर्माशीं बेइमानी केलीही नाहीं व मरेतों करणारही नाहीं. "

" तर मग तूं सकाळींच माझ्यापाशीं कुराण हातीं घेऊन शपथ घेतलीस त्याचा अर्थ काय ? " ज्या महालांत त्या दोघांची सकाळीं भेट होऊन शपथेचा खेळखंडोबा झाला होता, त्याच महालांत त्या दोघांचें आतांचें संभाषण चाललें होतें. सकाळचें तें भरजरी बासनांतलें कुराण अजून तिथेंच पडलें होतें. तें हातीं घेऊन राणीनें चंदासाहेबापुढें करून विचारलें, " ह्या तुझ्या पवित्र धर्मग्रंथाची तरी कांहीं लाज राख ! "

चंदासाहेबानें विकट हास्य करीत राणीच्या हातांतून तें बासन हिसकावून घेतलें व तें उलगडून तिच्यापुढें फेंकीत म्हटलें, "ज्या कुराणाची शपथ मीं सकाळीं घेतली तें हें कुराण पहा ! "

तें कुराण नव्हतें; ती जरीच्या बासनांत गुंडाळलेली मातीची वीट होती ! राणी तो प्रकार पाहून जास्तच खवळली व चंदासाहेबाला अगणित शिव्याशाप देऊं लागली. पण त्याचा परिणाम काय झाला? त्याच क्षणीं त्या विश्वासघातक्याच्या मुखांतून निघालेल्या हुकुमासरसा बिचारीच्या कपाळीं जन्माचा बंदिवास आला. शिपायी तिला धरून कैदखान्याकडे नेऊं लागले तेव्हां जखमेवर मिठाचें पाणी शिंपडावें त्याप्रमाणें त्या मदोन्मत्तानें आणखी उ गार काढले, " मूर्ख स्त्रिये, मला विरोध करणाऱ्या सर्व मर्कटांचा जसा

र्नी आज कडेलोट केला, तसाच तुझाही केला असता. पण ह्या एथली राज्यसत्ता एकतंत्री माझ्या हातीं येईपावेतों मला तुझी गरज आहे, म्हणून तुला जिवंत ठेवीत आहें."

अशा प्रकारें ती अभागी राणी आपल्या राजधानींत बंदिवान होऊन पडली; व दुसऱ्या दिवशीं सकाळीं सारे लोक पहातात तों किल्ल्यावर नायक राजवंशाचा झेंडा जो नेहमीं हवेंत फडकत असे, तो नाहींसा होऊन त्या जागीं अर्काटच्या नबाबाचा रंगीत झेंडा फडकूं लागला ! अवघ्या औट घटकांत त्या प्राचीन हिंदु राज्याचा असा विध्वंस झालेला पहाण्याचें सहस्ररश्मि सूर्याच्या जिवावर आलें म्हणूनच कीं काय, दुसऱ्या दिवशीं आकाशांत काळ्या कुट्ट ढगांचें काहूर उसळून एक प्रहरभर सूर्यदर्शनही झालें नाहीं !

# प्रकरण २ रें

## तंजावरची कहाणी

त्रिचनापल्लीच्या हिंदु राज्याची दुर्दशा करण्यांतच चंदासाहेबाचा प्रमुख हात होता असें नाहीं, तर जवळचेंच तंजावरचें हिंदु राज्यदेखील त्याच्या किंवा याहीपेक्षां स्पष्ट भाषेंत बोलावयाचें तर बांडगुळाप्रमाणें हिंदु समाजाच्या प्रचंड वृक्षाचा जीवनरस शोषण करून सामर्थ्यवान् झालेल्या अनेक सत्ताधारी मदोन्मत्त मुसलमानांच्या डोळ्यांत सलत होतें व हिंदवीचें निर्मूलन कोणत्या उपायांनीं करतां येईल याविषयीं जो तो डोळ्यांत तेल घालून झटत होता. या बाबतींत कोणताही पाशवी प्रयत्न करण्यांतदेखील त्या प्रांतांतील मुसलमान कोणाला हार जाणारे नव्हते, हें वाचकांना चंदासाहेबाच्या उदाहरणावरून आढळून आलेंच आहे. तसाच तंजावरच्या राज्याविरुद्धही ह्या मानवी प्राण्यांनीं कसा बेमालूम व्यूह रचिला होता व त्याचीं पाळेंमुळें किती खोल गेलीं होतीं, याचें यथावत् ज्ञान करून देण्यासाठीं एथें प्रथम तंजावरची कहाणी निवेदन करणें अवश्य आहे.

शिवशाहीच्या प्रथम चरणांत कर्नाटकांत मराठ्यांचा दरारा चांगलाच गाजला व शिवशाहींत छत्रपति म्हणून दिगंतीं प्रख्याति पावलेल्या भोंसले राजवंशांतील कांहीं पराक्रमी पुरुषांच्या हस्तें तंजावर एथें मराठी राज्याची स्थापना झाली. त्याबरोबरच इतर अनेक कर्तबगार मराठ्यांनींही अपार मान–धन–वैभवाची जोड संपादन करून त्या प्रांतीं वास्तव्य केलें. त्यांतच घोरपडे वंशाची प्रामुख्यानें गणना होते. मराठी अंमलाची ही भरभराट कर्नाटकांत संभाजी व राजाराम ह्या दोघां छत्रपतींच्या अमदानींत ओहोटीला लागली, व मराठ्यांच्या उद्योगाला आळा बसल्यानें कर्नाटकप्रांतीं बादशाही सत्तेला पुन्हा डोकें वर काढण्याला अवसर मिळाला. वस्तुतः मोंगलांचा कर्नाटकांतील उद्योग मराठ्यांच्या पूर्वींचा होता. फार प्राचीन काळापासून दक्षिण हिंदुस्थानांत अनेक प्रबळ हिंदु राजांची सत्ता होती, त्यावेळीं निरनिराळ्या ठिकाणीं जमाबंदीच्या वगैरे कामावर जे अंमलदार नेमण्यांत आले होते, ते तीं राज्यें नष्ट झाल्यावर देखील तेथेंच वंशपरंपरागत वतनें सांभा–

रूून राहिले. त्यांना पुढें पाळेगार अथवा संस्थानिक ही संज्ञा प्राप्त झाली. अवरंगजेब बादशहानें कर्नाटकावर बादशाही सत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. पण त्याला मराठ्यांनीं महाराष्ट्रांतच सर्व बाजूंनीं दे माय धरणी ठाय करून सोडल्यामुळें कर्नाटकांत आपला यथास्थित अंमल बसविण्याला त्याला पुरेसा अवसर मुळींच मिळाला नाहीं. तेथल्या पाळेगारांनीं त्याला मुळींच दाद दिली नाहीं. परचक्र आलें कीं तेवढ्यापुरती नम्रता दाखवून खंडणी वगैरे देऊन आपला बचाव करावयाचा व मागें आपलें ये रे माझ्या मागल्या आहेच. मराठ्यांनादेखील त्या प्रांतीं हाच अनुभव आला. त्यांनीं त्या प्रांतीं आपला दरारा बसविला खरा; पण तो अगदींच विस्कळित स्वरूपाचा होता. बादशाही अंमलाची वावटळ जरी त्यांनीं थोपविली, तरी बादशाही अंमलदार जे ठिकठिकाणीं आपले पाय रुजवून बसले होते, त्यांची उठावणी करण्याचें राहून गेलें. औरंगजेब बादशहाच्या पश्चात् मृत्युपंथाला लागलेल्या दिल्लीच्या बादशाही सत्तेंत नवजीवन ओतण्याचें कार्य निजामउल्मुल्कानें केलें. पण हां हां म्हणतां निजाम इतका बलाढ्य झाला कीं शेताची राखण करण्यासाठीं रोंवण्यांत आलेल्या कुंपणानेंच शेत खाऊं लागावें, त्यांतली अवस्था निजाम व दिल्लीची बादशाही सत्ता यांच्या परस्पर संबंधाची झाली. मोडकळीला आलेल्या बादशहातींत निजामानें सर्वसत्ताधारी होण्याच्या महत्त्वाकांक्षेनें प्रेरित होऊन आपला स्वतंत्र पंथ काढला व दक्षिणेंतील सहा बादशाही सुभ्यांचें राज्य त्याच्या ताब्यांत आलें.

पण निजामाचीही बरीच शक्ति थोरल्या बाजीरावाच्या कारकीर्दींत वर्धिष्णु मराठी सत्तेशीं झगडण्यांत खर्च होऊं लागली व त्याच सुमाराला दिल्लीच्या मध्यवर्ती राजकारणांत हात शिरकवण्याची संधि मिळाल्यानें निजामाचें बहुतेक सारें लक्ष तिकडे गुंतलें. त्यामुळें औरंगजेबाच्या अमदानींत दक्षिणेंत जे सुभेदार नेमिले होते त्यांच्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना प्राचीन हिंदु राज्यांतील पाळेगारांप्रमाणेंच आपापल्या हुकमतीखालील प्रदेशांत पाय रुजविण्याला फावलें. सुभेदारांच्या हाताखालील प्रांताधिकाऱ्यांना नबाब अशी संज्ञा होती. असे नबाब अर्काट, शिरें, कडपें, कर्नूल व सावनूर अशा पांच ठिकाणीं 'बळी तो कान पिळी' या न्यायानें जबरदस्त सत्ताधारी होऊन बसले. पैकीं अर्काटचा नबाब हा त्रिचनापल्ली व तंजावर ह्या हिंदु

राज्यांना अगदीं नजीक असून विशेष तडफदार, हिंदुत्वाचा द्वेष करण्यांत विशेष निढावलेला, विशेष महत्त्वाकांक्षी असा असून शिवाय त्याला चंदासाहेबासारख्या समस्वभावी, अनेकावधानी व चतुर अशा नातलगाची साथ मिळाली. मग त्यानें कर्नाटकांत पाणी जाळण्याला सुरुवात केली यांत नवल तें काय ?

चंदासाहेबांचें त्रिचनापल्ली एथील कुटिल कारस्थान जें पूर्वी निवेदन करण्यांत आलें आहे, त्या कारस्थानाच्या उभारणीपूर्वींच अर्काटच्या नबाबानें 'कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ' शोभणाऱ्या एका नीच वृत्तीच्या देशद्रोही मराठ्याला हाताशीं धरून त्याच्यामार्फत तंजावरचें राज्य घशांत टाकण्याचें एक कृष्णकारस्थान उभारलें होतें व त्याचें जाळें तंजावरच्या राजघराण्यांत अंतस्थ रीत्या अत्यंत खोलपावेतों पसरलें होतें. जशी त्रिचनापल्लीच्या नाशाला राणी मीनाक्षी कारण झाली, तशीच अपरूपा या नांवाची तंजावरची एक अवलक्षणी राणी आपल्या मतें त्या कारस्थानाची सूत्रधार पण वास्तविक सूत्रधारी नवाबाच्या हातांतील कळसूत्री बाहुली बनली होती. अपरूपा ही तंजावरचे राजे सरफोजी महाराज यांची एक राणी. सरफोजींना आणखीही कांहीं राण्या होत्या. पण त्या बिचाऱ्या सरळ वृत्तीच्या होत्या. पण दुधाच्या हंड्यांत मिठाचा खडा पडावा आणि त्या एका खड्यामुळें हांडाभर दूध नासून जावें, त्याप्रमाणें राणी अपरूपा ही एकटीच त्या राजघराण्यांत भाऊबंदकीचा वणवा पेटविण्याला पुरून उरली. सरफोजी राजांना तुकोजी या नांवाचा एक धाकटा भाऊ होता. त्याला ईशकृपेनें संततिसौख्य चांगल्याचेकीं होतें. आणि सरफोजी राजांना मात्र संतति कांहीं नव्हती. संतति नाहीं म्हणून जसें राजांना तसेंच त्यांच्या सर्व राण्यांनाही वाईट वाटणें साहजिक होतें. परंतु अपरूपा राणीप्रमाणें इतरांनीं कधीं तुकोजीच्या संततिसुखाबद्दल मत्सर केला नाहीं. अपरूपा राणी मात्र आपण राजमाता व्हावें ह्या महत्त्वाकांक्षेनें माथेफिरूसारखी वागूं लागली. दुर्दैवाची गोष्ट ही कीं ही राणी रूपवान व तरुण असल्यानें सरफोजी राजांची तिच्यावर फार मर्जी होती. त्या मर्जीचा उपयोग अपरूपा राणीनें सरफोजी व तुकोजी ह्या बंधूंत वितुष्ट आणण्याच्या कामीं करून घेतला, व तुकोजीला आपल्या कुटुंबपरिवारासह तंजावरपासून दूर महादेवपट्टण एथें जाऊन रहावयाला भाग पाडलें.

पण तुकोजीला घरभेदेपणानें दूर लोटणें राणीच्या हातीं होतें तसें राजमाता होणें कोठें होतें ? तरीही त्या बाबतींत देखील अजब कारस्थान रचण्याला तिनें कमी केलें नाहीं. राजवाड्यांतील व बाहेरच्या कांहीं दुष्ट स्त्रियांची संगत तिला होतीच. शिवाय तिचा माहेरकडून जवळचा आप्त कोयाजी घाटगे हाही तिचा पाठीराखा होता. ह्या कोयाजीला हाताशीं धरून अर्काटच्या नबाबानें तंजावरच्या नाशाचें कृष्णकारस्थान कसें रचिलें याचा उलगडा पुढें यथाकालीं होईलच. ह्या कारस्थानाच्या जाळ्यांत अपरूपा राणी गुरफटून गेली असतां कोयाजी घाटग्याच्या संमतीनें तिनें स्वतः राजमाता होण्याची शक्कल शोधून काढली. तिनें आपण गरोदर आहों असें कांहीं दिवस ढोंग करून नऊ महिने जाऊं दिले व नऊ महिन्यांनंतर प्रसूत झाल्याचा बहाणा करून एका कृत्रिम बालकाला 'जन्म' दिला. तंजावरच्या गादीला वारस निर्माण झाला याचा सर्वांना अत्यानंद झाला. राजधानींत व राज्यांत सर्वत्र आनंदोत्सव झाले. बारशाच्या दिवशीं अपूर्व समारंभ होऊन ह्या तान्ह्या राजपुत्राचें नांव 'सवाई शहाजी राजे' असें ठेवण्यांत आलें. परंतु थोड्या दिवसांनीं राणीचें हें कृत्रिम प्रकाशांत येऊन सरफोजी राजांनीं त्या तान्ह्यासह कोयाजी घाटग्याला हद्दपार करून राणीला प्रतिबंधांत ठेवलें.*

सरफोजी राजे कालवश झाले तेव्हां तुकोजी राजे गादीवर बसले. हे सरफोजी राजांपेक्षांही विशेष राजकारणपटु, धर्मनिष्ठ व विद्याभिलाषी

* सरफोजी राजांच्या अनेक राण्यांपैकीं अपरूपाराणी ही एक असून ती घाटगे वंशांतील होती. तिच्या उपरोक्त कारस्थानाचा स्पष्ट उल्लेख 'इतिहाससंग्रह' मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या 'तंजावरचें राजघराणें' नामक पुस्तकांत करण्यांत आला आहे. कोयाजी घाटगे हा तिचा ह्या कारस्थानांतील पाठीराखा होता. राजकारणांत—व तेंदेखील स्वतः अस्सल मराठे असून मराठ्यांच्या राजकाणांत-बिघाड करणारे अनेक पुरुष व स्त्रियादेखील ह्या घाटगे वंशांत उत्पन्न झाल्याचें इतिहास सांगतो. बाळाजी विश्वनाथ पेशव्यांच्या कारकीर्दींत प्रथमच चंद्रसेन जाधवाबरोबर फितूर होऊन मोंगलांना जाऊन मिळाणारा सर्जेराव घाटगे! पेशवाईच्या अखेरीला मराठशाहीच्या नरडीला फितुरीचें नख लावणारा त्याच वंशांतला दुसरा सर्जेराव घाटगे ! तसाच हा कोयाजी घाटगे ! शाहू महाराजांशीं स्पर्धा करून मराठशाहीचीं मुळांतच दोन शकलें करण्यांत देखील घाटगे रक्तच प्रभावी ठरलें ! !

होते. त्यामुळें दूरदूरचे विद्वान् पंडित व फकीर वगैरे त्यांच्या भेटीला येत व पुरस्कार घेऊन आनंदानें माघारे जात. असाच एक अवलिया फकीर एकदां त्यांच्या भेटीला आला. त्यानें राजांच्या सद्गुणांवर प्रसन्न होऊन त्यांना आपला प्रसाद म्हणून नागिणी व पद्मिनी अशा दोन तरवारी नजर केल्या. * त्या तरवारींच्या प्रभावाविषयीं त्या फकिरानें राजांना सांगितलें, "राजा, ह्या दोन तरवारी म्हणजे ऋद्धिसिद्धी आहेत असें समज. यांच्या अंगीं असें अचाट सामर्थ्य आहे कीं ह्यांचें वास्तव्य जेथें असेल, तेथें सामर्थ्य समृद्धि–शान्ति यांचें अखंड साम्राज्य नांदेल. परंतु ह्यांची पाळणूकही तशीच कठीण आहे. ह्या तरवारी धारण करणारा मनुष्य सदाचारी व धर्मात्मा असला पाहिजे; त्यानें सज्जनांचा प्रतिपाल व दुर्जनांचा संहार करण्याकडेच नीतिधर्मानें ह्यांचा उपयोग केला पाहिजे. ह्यांच्या अंगीं आणखी असा एक चमत्कार आहे कीं, मनांत दुर्बुद्धी धारण करून कोणी ह्या तरवारींना स्पर्श केल्यास ह्यांचें तेज व पाणी तत्काळ नष्ट होतें व त्या धारण करणाऱ्या माणसाचा कार्यनाश होतो. त्याप्रमाणेंच ह्या धारण करणारा किंवा संग्रहीं ठेवणारा माणूस दुर्मति असल्यास यांच्या प्रभावानें त्याचा समूळ नाश मात्र होईल. पण ह्या धारण करणाऱ्या माणसानें नीतिधर्माचें यथावत् पालन केल्यास त्याला यांचा वज्रकवचाप्रमाणें व कामधेनूप्रमाणें उपयोग होईल. अशी ही साक्षात् राजलक्ष्मी राजा, मी तुला आज अर्पण करीत आहें. हिचा तूं नीति-धर्मानें वागून वंशपरंपरेनें उपभोग घे. मात्र त्याबरोबर तूं हेंही लक्षांत ठेव कीं, कोणत्याही कारणानें ह्या तरवारींना तूं किंवा तुझा राजवंश मुकला, तर राजलक्ष्मी रुष्ट होऊन बाहेर गेली असें निश्चयपूर्वक समज; आणि म्हणूनच यांना तूं तुझ्या प्राणांपलीकडे जप."

* तंजावर एथें अशी एक दंतकथा प्रचलित आहे कीं कोणी अवलिया फकीर अरबस्थानांतून एकेवेळीं तुकोजीराजांच्या भेटीला तंजावर येथें आला. तो त्यांचे अनेक सद्गुण पाहून अत्यंत संतुष्ट झाला आणि त्यानें आपला प्रसाद म्हणून तुकोजीराजांना 'नागिणी' आणि 'पद्मिनी' अशा दोन तरवारी नजर केल्या. या तरवारींच्या अंगीं कांहीं अलौकिक शक्ति होती असें म्हणतात. ह्या तरवारी मद्रास येथील सरकारी पदार्थसंग्रहालया-मध्यें पुष्कळ वर्षें वास करीत होत्या. (Tanjore Mahratta Principality)

ह्या दोन प्रासादिक तरवारींच्या प्रभावामुळें व त्याला तुकोजीराजांच्या अंगच्या लोकोत्तर नीतिधर्म–प्रियतेची जोड मिळाल्यामुळें तुकोजी राजांची कारकीर्द चांगली भरभराटीची गेली. त्या तरवारींवर त्यांची इतकी जबरदस्त श्रद्धा होती कीं निश्चित पुराव्याच्या अभावीं एखादा न्याय करावयाचा झाला तर तो करण्याच्या कामीं त्यांनीं ह्या साधनाचा उपयोग करावा. फिर्यादी व आरोपी अथवा वादी व प्रतिवादी ह्या दोघांनाही ईशस्मरणपूर्वक ह्या तरवारी उचलण्यास सांगावें व ज्याच्या हातानें त्या काळ्या ठिक्कर पडतील त्याला अपराधी समजून शासन करावें.

परंतु तुकोजी राजांच्या ठायीं जी दानत होती, तिला त्यांच्या निधनाबरोबरच मूठमाती मिळून त्यांच्यामागें पुन्हां आपसांतील भाऊबंदकीनें डोकें वर काढलें. त्यांच्यामागें त्यांचा बराच मोठा परिवार होता. त्यांपैकीं वडील पुत्र बाबासाहेब हा व्यंकोजी हें नांव धारण करून गादीवर बसला. तो फार संशयी स्वभावाचा व भोळसर असल्यानें त्याच्या कारकीर्दींत राज्यांत फारच वजबजपुरी माजून स्वार्थपटु व मतलबी लोकांचें दरबारांत फार प्राबल्य झालें. त्या लोकांत सय्यद खान व सय्यद कासीम हे दोघे मुसलमान बंधु प्रमुख होते. त्यांनीं जवळजवळ सर्व राजसत्ता आक्रमण करून राजाला केवळ नामधारी बनवून ठेविलें होतें. व्यंकोजी राजाच्या पश्चात् त्यांना मूलबाळ वगैरे कांहीं नसल्यानें सय्यद बंधूंनीं तें राज्य पुढेंमागें आपल्या घशांत टाकण्याचा अंतस्थ डाव तडीला नेण्याचा उद्योग आरंभिला. पण राजवटीशीं एकनिष्ठेनें वागणारे व पराक्रमी असे इतर कांहीं कारभारी दरबारीं होते; त्यांत मानाजीराव जगताप हा वीस वर्षांच्या उमरीचा एक तडफदार मराठा सरदार असून शिवाय मल्हारजी गोडेराव या नांवाचा राजघराण्याचा आप्तसंबंधी प्रौढ सरदार व अण्णाप्पा शेटगे वगैरे कांहीं मंडळी होती. ह्या मंडळीनें सय्यद बंधूंची मसलत बेमालूमपणें बाजूला सारून व्यंकोजी राजांच्या राण्यांपैकीं सुजानबाई नांवाच्या तरुण, चतुर व सदाचारी राणीलाच गादीवर बसविलें. सय्यद बंधूंचा हा एक डाव फंसला तरी त्यांनीं नाउमेद न होतां गुप्तपणें नवे नवे डाव खेळण्याला सुरुवात केली. अपरूपाराणीचें ह्या कारस्थानांत शत्रूला पाठबळ मिळूं नये म्हणून मानाजीराव वगैरे कर्त्या मंडळीनें नव्या राणीच्या सल्ल्यानें जरी तिला सक्त बंदोबस्तांत ठेविलें होतें तरी कोयाजी

घाटगे मन मानेल तसे उपद्व्याप करण्याला मोकळा होताच. त्यानें एका बाजूनें सुजानबाईचा कारभार अयशस्वी करण्यासाठीं कंबर कसली; सय्यद बंधू दुसऱ्या बाजूनें कंबर कसून उभे होते. ह्या दोन प्रतिस्पर्धी शक्तींपुढें सुजानबाईचा नाइलाज होऊन तिला राज्याचीं अधिकारसूत्रें खालीं ठेवावीं लागलीं. शेवटीं सय्यद बंधूंचें राजकारणच यशस्वी होऊन त्यांनीं सयाजी या नांवाच्या तुकोजी राजांच्या दुसऱ्या एका मुलाला सामील करून घेतलें व त्याला तंजावरचा नामधारी राजा बनवून सर्व राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं. कलहाचा नवा वणवा पेटण्याला आणखी काय पाहिजे?

# प्रकरण ३ रें

## तंजावरची कहाणी ( पुढें चालू )

सय्यद बंधूंचा हा उपद्व्याप मानाजीराव वगैरे तंजावरच्या राजवटींतील निष्ठावंत मंडळीला मुळींच मान्य नव्हता. आणि राज्यांतील बहुजन समाजाचा ओढाही त्यांच्याकडेच होता. त्यामुळें त्यांनीं कांहीं बेमालूम नवी योजना मनाशीं ठरवून लौकरच तुकोजीराजांची अन्नपूर्णाबाई या नांवाची एक सुशील व सदाचारी प्रियतमा होती, तिला व तिच्यामार्फत प्रतापसिंह या नांवाच्या तिच्या तरुण पुत्राला आपल्या बाजूला वळवून घेतलें. प्रतापसिंह आपल्या मातापितरांप्रमाणेंच सदाचारी, चतुर व सुविचारी होता, व तुकोजीराजांच्या इतर पुत्रांच्या अंगीं न चमकणारें अनन्यसामान्य राजतेज त्याच्या अंगीं चमकत होतें. तो वयानें जरी तेव्हां पंचविशीच्या आंत होता, तरी त्यानें जनतेची प्रीति चांगलीच संपादन केली होती. त्याच्या नेतृत्वाखालीं मानाजीराव वगैरे मंडळीनें राज्यप्राप्तीचा जो डाव रचिला, तो सर्वांच्या कल्पनेबाहेर फलद्रूप होऊन जनतेनें मानाजीरावाच्या नेतृत्वाखालीं तंजावरचा राजमुकुट प्रतापसिंहालाच अर्पण केला. सय्यद बंधूंनीं—विशेषतः सय्यद खानानें 'हा दासीपुत्र, याला राजा कसा करावयाचा' वगैरे अपवादांच्या झाडीआडून विरोधाच्या गोळ्या झाडण्याची शिकस्त केली; पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं.

याप्रमाणें प्रतापसिंह तंजावरच्या गादीवर आला; व त्यावरून आतांतरी आपल्या राज्याला बरे दिवस येतील असें मानाजीराव, मल्हारजी गाडेराव वगैरे मंडळीला वाटूं लागलें. पण सय्यद खान वगैरे मंडळीचा अंतस्थ रीत्या विरोध सुरूच होता. इतकेंच काय पण सय्यद खान हा तर दुखावलेल्या विषारी नागाप्रमाणें मनांत दावा धरून प्रतापसिंह व त्याचा पक्ष यांचें समूळ उच्चाटण करण्यासाठीं गुप्तपणें भगीरथ प्रयत्न करीत होता. हें प्रतापसिंहाला माहीत होतें व प्रतापसिंह आपणाला ओळखतो हें सय्यद खानाला माहीत होतें. मानाजीराव, मल्हारजी, अप्पाण्णा वगैरे मंडळी प्रतापसिंहाच्या

पदरीं आहेत, ते आपलें आज ना उद्यां उच्चाटण केल्याखेरीज रहाणार नाहींत हेंही त्याला माहीत होतें. तरीही तो राज्यलोभ सोडावयाला तयार नव्हता. मानाजीराव वगैरे मंडळी सामान्य नव्हती, व प्रतापसिंहाशीं त्या मंडळीचा पूर्ण मिलाफ होता. पण एक तर मधल्या बजबजपुरीचा सय्यद खानानें सर्व सत्ता आपल्या मुठींत आणण्याच्या कामीं भरपूर उपयोग करून घेतला होता, व प्रतापसिंहाच्या हीनकुलोत्पन्नतेची हाकाटी करून त्या जोरावर जनतेचीं मनें कलुषित करण्याचा त्याचा उद्योगही अत्यंत गुप्तपणें आणि तितक्याच यशस्वितेनें सुरू होता. तेथें राजवंशाचा एकतर्फी दुरभिमान बाळगणाऱ्या लोकांचीही अगदींच वाण होती अशांतली गोष्ट नाहीं. शिवाय अंपरूपाराणीचा पक्ष अधिकारारूढ होण्यासाठीं इरेला पडून काय पाहिजे त्या भल्याबुऱ्या गोष्टी करावयाला हा लोककंपू एका पायावर उभा होता. अशा लोकांना सय्यद खानाचा मोठा पाठिंबा मिळाला; व त्यांनीं राज्यक्रान्तीचा एक व्यूहही रचिला. कांहीं वर्षांपूर्वीं सरफोजी राजांच्या कारकीर्दींत त्यांचा अर्थात् अपरूपाराणीचा पुत्र म्हणून पुढें आलेला व कृत्रिम राजपुत्र ठरल्यामुळें कोयाजी घाटग्याबरोबरच हद्दपार झालेला बालक* तिकडे कोयाजी घाटग्याच्या कृपाछत्राखालीं वाढून लहानाचा मोठा झाला होता. तो आतां सुमारें वीस वर्षांचा तरणा बांड गडी शोभूं लागला होता. त्यालाच सय्यद खानानें कोयाजी घाटग्याच्या

* सुजानबाईच्या कारकीर्दींत गादीसाठीं प्रयत्न करणारे अनेक शत्रू निर्माण झाल्यामुळें तिला राजपदाचा अधिकार फार दिवस उपभोगितां आला नाहीं. तिची कारकीर्द पुरीं तीन वर्षें झाली नाहीं तोंच सवाई शहाजी या नांवाचा कोणी इसम कोयाजी घाटगे या नांवाच्या सरदाराच्या साहाय्यानें तंजावरच्या गादीचा हक्क सांगण्याकरितां तोतया निर्माण झाला; आणि त्यानें तंजावर येथील किल्लेदार सय्यद खान यास फितवून तंजावरची गादी बळकावली. तंजावरच्या इतिहासांत काटराजा या नांवानें हा तोतया प्रसिद्ध आहे. त्यानें इंग्रज व फरेंच लोकांस द्रव्य देऊन त्यांचें सैन्य आपल्या मदतीस बोलावलें व तंजावरच्या गादीचे आपण अस्सल वारस आहों असा सर्वांच्या मनांत भ्रम उत्पन्न केला. परंतु हा काटराजा रूपी नामक बटकीचा एक मुलगा असून याचा तंजावरच्या गादीशीं कांहींही संबंध नाहीं, अशी तंजावरचा किल्लेदार व मुख्य सरदार यांची लवकरच खात्री झाली. यामुळें त्यांनीं या ढोंगी काटराजास तात्काळ काट दिला. —इतिहाससंग्रह.

नामधारी पुढारीपणाखालीं स्वतः बाह्यतः अगदीं नामानिराळा राहून, तंजावरच्या गादीचा खरा वारस सरफोजीराजांचा औरस पुत्र म्हणून पुढें आणण्याचा उद्योग आरंभिला होता. अपरूपाराणी तर ह्या कारस्थानांत गुप्तपणें सामील होतीच; कारण तिला त्या निमित्तानें राजमातेचा अपूर्व मान मिळणार होता. पण राजघराण्यांतील बाकीचे बहुतेक जवळचे अगर दूरचे वारस व त्यांचे अलबतेगलबते सुद्धां, सय्यद खानासारख्या सामर्थ्यवान् माणसानें राजा होऊं घातलेल्या ह्या नव्या वारसाचा पक्ष धारण केल्याचें पाहून त्यालाच अखेर यश मिळणार असें धोरण बांधून त्याचे पक्षपाती बनले होते. हा कट हां हां म्हणतां इतक्या परिपक्व दशेला पोंचला कीं प्रतापसिंह राजे, मानाजीराव वगैरे मंडळीला त्याचा सुगावा लागून देखील त्याचा नायनाट करण्याचा कांहीं उपाय सांपडेना.

त्याच सुमाराला चंदासाहेबानें त्रिचनापल्लीचें राज्य बेमालूम कपट-कारस्थानाच्या जोरावर कसें घशांत टाकलें, याच्या रसभरित वार्ता सर्वत्र रूढ झाल्या होत्या, व तो गवगवा तंजावरपर्यंत आपोआपच येऊन पोंहोंचला होता. इतकेंच काय; पण चंदासाहेबाचीं एकाहून एक कपटप्रचुर कृत्यें पाहून किंवा ऐकून हा महाकारस्थानी पुरुष हळुहळू आपल्या आंगच्या कृष्ण-कारस्थानपटुतेच्या जोरावर सर्व कर्नाटक आपल्या कह्यांत आणणार असेंही जाणते लोक बोलूं लागले होते. न जाणो, पुढेंमागें त्याची वक्रदृष्टि तंजा-वराकडे वळली तर आपली धडगत लागावयाची नाहीं, हा कयास बांधून सय्यद खानानें त्यालाच आपला दोस्त बनविण्याचें व नंतर आपल्या कपट-कारस्थानांत त्याची हक्कानें मदत घेण्याचें धोरण आंखून आपली मुलगी त्याच्या मुलाला देऊं केली. याच्या उलट चंदासाहेबानेंही तंजावरच्या राजकारणांत हात शिरकविण्याला व त्रिचनापल्लीचें राज्य निश्चितपणें अलग घशांत टाकण्याला सय्यद खानाची आपुलकी पुष्कळच उपयोगी पडेल असा दूरवर विचार करून त्या सोयरिकीला तेव्हांच रुकार दिला.

याप्रमाणें एक ठक व दुसरा महाठक अशी ही गट्टी जमल्यावर तंजावरच्या राज्याची इतिश्री होणार हें जवळजवळ निश्चितच होतें. परंतु ह्या अरि-ष्टांतून तरी तें राज्य वांचावें अशी विधिघटना असल्यामुळें म्हणा, किंवा आजवर आपलें राज्य टिकलें तें त्या दोन प्रासादिक तरवारींच्या दैवी बलावर

टिकलें अशा विश्वासानें प्रतापसिंहराजांनीं सदाचारपूर्वक त्या अमोघ आयुधांचें आपल्या प्राणापलीकडे रक्षण चालविल्यामुळें म्हणा, सय्यद खानाच्या कटांत फूट पडण्याला एक आकस्मिक कारण घडून आलें. महाभारतकालीं मदोन्मत्त होऊन देवादिकांनाही त्राहि त्राहि करून सोडणाऱ्या सुंदोपसुंदांचा नाश करण्यासाठीं ईश्वरी प्रेरणेनें एक मोहिनी जशी उत्पन्न झाली व तिच्या अभिलाषानें ते मदांध दैत्य आपसांत भांडून जसे एकमेकांच्या नाशाला कारण झाले, तशीच मोहना* या नांवाची एक सुंदर कुमारिका राजधानीच्या लगतच्या श्रीरंगाच्या देवालयांत देवसेवेसाठीं येऊन वास्तव्य करूं लागली. तिच्या सौंदर्याची ख्याति हां हां म्हणतां सर्वत्र पसरली, व दोघेही सय्यदबंधू तिच्यावर एकदम आषक झाले. दोघांनींही आपापल्या परीनें त्या मोहनेसाठीं प्रियाराधनाची शिकस्त केली. पण ती सच्छील कुमारिका त्या दोघांपैकीं कोणालाच वश होईना. अखेर सय्यद खानानें देवालयांत शिरून तिला बलात्कारानें भ्रष्ट करून आपल्या वाड्यांत नेऊन ठेविलें. ह्या अतिप्रसंगामुळें सर्व हिंदु जनता तर त्याच्यावर मनस्वी चिडलीच; पण सय्यद कासीमही बिथरून त्याच्या कटांतून फुटला व गुप्तपणें प्रतापसिंहराजांच्या पक्षाला जाऊन मिळाला. चंदासाहेब व सय्यदखान यांचीं कसकशीं कारस्थानें चाललीं आहेत याची बित्तंबातमी प्रतापसिंहराजांना सय्यद कासीमपासून मिळतांच त्यांनीं मोठ्या युक्तीनें सय्यद खानाला जगांतून नाहींसा करण्याच्या कामीं त्या बातमीचा उपयोग करून घेतला. सय्यद कासीमदेखील आज आपल्याला सामील झाला तरी तो सुद्धां आज ना उद्यां आपल्या वडील भावाच्या वळणावर खास जाणार हें ओळखून त्याचाही गुप्तपणें अचानक वध करण्यांत आला. अशा प्रकारें सय्यद बंधूंचा नायनाट झाल्यामुळें त्यांचें कारस्थान तेवढ्यापुरतें तरी फिसकटलें. त्या दोघांप्रमाणेंच त्यांच्या अनुयायांनाही गांठून ह्या जगांतून नाहींसे करण्यासाठीं मानाजीराव वगैरे मंडळीनें शिकस्त केली व कांहीं लोक सांपडले त्यांची तशी वासलात लावलीही. परंतु कोयाजी घाटगे व त्यानें निर्माण केलेला राजपुत्र ह्या दोन व्यक्ती कांहीं केल्या त्यांच्या हातीं लागल्या नाहींत. व तशांत अपरूपाराणीनें साळसूदपणें रडून, ओरडून ह्या कारस्थानांत आपलें मुळींच अंग नव्हतें असें भासविल्यामुळें, आणि

*इतिहाससंग्रह—"तंजावरचें राजघराणें."

त्यांतल्या त्यांत अब्रूला भिऊन प्रतापसिंहराजांनीं तिला कोणत्याही प्रकारें शासन करण्याचें नाकारलें. सय्यद बंधूंचा मात्र समूळ निर्वंश करण्याचा त्यांचा मानस होता. परंतु त्याच्या कुटुंबांतील सर्व मंडळीला चंदासाहेबानें ऐनवेळीं गुप्तपणें त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांत आपल्या कृपाछत्राखालीं नेऊन ठेविल्यामुळें ती सर्व मंडळी बचावली. बिचाऱ्या मोहनेची स्थिति मात्र त्यामुळें आगींतून उठून फुफाटयांत पडल्याप्रमाणें झाली; चंदासाहेबाच्या जनानखान्यांत त्याची विलासदासी होऊन रहाण्याचें तिच्या नशिबीं आलें!

आपला पक्ष सय्यदबंधूंच्या नाशामुळें दुबळा झाला, म्हणून हातपाय गाळून स्वस्थ बसणारा कोयाजी घाटगे नव्हता. त्यानें पुन्हां अर्काटच्या नबाबाशीं संधान बांधलें. अपरूपाराणीची त्याला आंतून भरपूर फूस होतीच. नबाबालाही तंजावरच्या राजकारणांत हात शिरकवण्याला अशा कोणातरी घरभेद्याचें साहय पाहिजेच होतें. त्यानें आपल्या जांवयाला—चंदासाहेबाला त्या कामगिरीवर नेमलें. त्रिचनापल्लीच्या राज्याचा घांस दांतदेखील न लावतां घशांत टाकण्यांत चंदासाहेबानें जें अपूर्व कुटिल कर्तृत्व दाखविलें होतें, त्यामुळें धर्मवेडया मुसलमानी समाजांत त्याची फारच चहा होऊं लागली होती; व अर्काटच्या दरबारांतही त्याचें चांगलेंच वजन वाढलें होतें. "हिंदु लोक भोळे; त्यांना आपण आपल्या करांगुलीच्या टोंकावर नाचवूं शकतों; आपण कितीही अत्याचार केले तरी ते ते लोक निमूटपणें सहन करतात; आणि त्यांना धर्मभ्रष्ट करण्याची कामगिरी इतकी सोपी आहे कीं कोणीं फाटक्या मुसलमानानेंदेखील भराभर हवे तेवढे हिंदु बाटवावे" वगैरे स्वानुभवाचा आत्मविश्वास चंदासाहेबाच्या ठायीं व त्याच्या निमित्तानें नबाबाच्या ठायींही उत्पन्न झाला होता. "हिंदु राजे काय, आम्ही पटावरील सोंगटयांप्रमाणें मनाला मानेल तसे नाचवूं. दिल्लीची मध्यवर्ती राजसत्ता आम्हां मुसलमानांची असतांना ठिकठिकाणीं उगाच चिरीचिरि करणाऱ्या ह्या तळहाताएवढ्या हिंदु संस्थानांचा नायनाट करण्याला आम्हांला कोण आडकाठी करणार आहे?" अशा प्रकारच्या घमेंडीनें नबाबही अगदीं फुगून गेला होता. त्यानें तंजावरचें राज्य पादाक्रान्त करण्याची कामगिरी चंदासाहेबाला सांगितली व कोयाजी घाटग्याशीं त्याची गांठ घालून दिली. या बाबतींत नबाब, कोयाजी व चंदासाहेब यांचे आपसांत कांहीं संकेत व करार-

मदार ठरले होते. परंतु त्यांची त्या तिघांशिवाय चौथ्या कोणालाही दाद नव्हती.

प्रतापसिंह व मानाजीराव वगैरे त्याच्या पक्षाची मंडळी यांना इकडे समाधान वाटलें; आपण पाताळयंत्री सय्यदबंधूंचा नायनाट केला आतां आपलें राज्य निर्वेध झालें. कोयाजी वगैरे मंडळी बाकी होती; पण त्याची अवस्था पंख कापलेल्या पक्ष्यांप्रमाणें झाली आहे, ते राजवटींत काय बखेडा करणार!—अशा भोळ्या आत्मविश्वासानें त्यांच्याकडे दरबारी मंडळीनें दुर्लक्ष करून राज्याची अंतर्व्यवस्था लावण्याचें कार्य हातीं घेतलें.

ही व्यवस्था सुरू असतांच एके दिवशीं अपरूपा राणीला माहेरीं जाण्याची इच्छा झाली. तिच्या माहेरीं जाण्यांत प्रतिपक्षाचें कांहीं राजकारण निगडित झालें असेल अशी शंकादेखील कोणाला आली नाहीं; इतकें तिचें राजवाड्यां-तील वर्तन अलीकडे चोख, प्रेमळपणाचें व सलोख्याचें दिसत असल्यानें प्रतापसिंह राजांनीं तिला कोणत्याही प्रकारें माहेरीं जाण्याला विरोध केला नाहीं. त्याच्या पक्षाच्या मंडळींत मानाजीराव महा धूर्त होता; त्याला कशी न कळे, राणीच्या ह्या माहेरवासाबद्दल शंका उत्पन्न झाली. परंतु कशी झाली तरी ती राणी पडली, तिच्याविषयीं मानाजीरावानें तरी भलताच संशय पुराव्याखेरीज कसा बोलून दाखवावा? अपरूपा राणीनें आपल्या मायावी प्रेमळपणाच्या जोरावर राजांना आपलेंसें करून घेतलें होतें, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. ती त्या उभयतांची आपुलकी अलीकडे तर इतकी वाढली होती कीं राणी राजांना आपलाच पुत्र मानूं लागली होती, व राजांनाही तिला 'आईसाहेब' असें संबोधण्यांत संतोष वाटत असे. इतकेंच काय पण राणीनें राजांच्या नांवाला जन्माचा चिकटलेला अकुलीनतेचा डाग कायमचा धुवून टाकण्यासाठीं त्यांना दत्तक घेण्याचेंही ठरविलें होतें, व राजांना त्याप्रमाणेंच मानाजीरावांखेरीज इतर कारभाऱ्यांना तो विचार संमतहि होता. मानाजीराव मात्र प्रथमपासूनच सर्वांना कानींकपाळीं ओरडून सांगत होता कीं "राणीचें हें सारें वर्तन मायावी आहे, तिच्यावर विश्वास ठेवणें सुरक्षितपणाचें नाहीं" पण मानाजीराव पडला पोरसवदा. त्याचे बोल इतर प्रौढ अनुभवी कारभाऱ्यांना कसे पटावे? व राजांनीं तरी त्या अनुभवी साहचकाऱ्यांच्या विरुद्ध कसें वागावें?

असे कांहीं दिवस गेल्यावर एके दिवशीं अपरूपाराणीनें कांहीं दिवसांसाठीं माहेरीं जाण्याची इच्छा दर्शविली. तिला नको म्हणण्याचें कोणालाच कांहींच कारण नव्हतें. असें असतां मानाजीरावाला मात्र कां न कळे, संशय आला कीं हिच्या माहेरीं जाण्याच्या मुळाशीं कांहींतरी कारस्थान शिजत असलें पाहिजे. पण ती राणी, राजांच्या मर्जींतली व सर्वांच्या आदराला पात्र झालेली, तिच्याविषयीं मानाजीरावानें मुद्देसूद पुराव्याशिवाय अविश्वास बोलून तरी कसा दाखवावा!

पण कांहीं झालें तरी मानाजीरावाची संशयनिवृत्ति कांहीं केल्या होईना. त्यानें एकदां राणीच्या कारस्थानाचा अचूक छडा लावून ह्या वाढत्या थोतांडाचा सोक्षमोक्ष करण्याच्या निर्धारानें चौकशीसाठीं बाहेर जावयाचें ठरविलें व राजांना आपला बेत कळविला. स्वतःला मातेप्रमाणें पूज्य असणाऱ्या राणीविषयीं मानाजीरावानें अजूनही असा संशय घेणें राजांना रुचलें नाहीं हें तर खरेंच. पण तो सहजासहजीं उपेक्षा करण्याइतका सामान्य माणूस नसल्यानें परस्पर स्वानुभवानें त्याचा संशय फिटलेला बरा असा विचार करून त्यांनीं त्याला तसें करण्याला मोकळीक दिली.

# प्रकरण ४ थें

## प्रसादचिन्हांची चोरी

मानाजीरावाप्रमाणेंच अपरूपा राणीविषयीं संशयी वृत्तीनें वागणारी आणखी एक व्यक्ति राजवाड्यांत होती. ती प्रतापसिंह राजांची धाकटी पत्नी करुणाराणी होय. करुणा वयानें तेव्हां अठरा वर्षांची असून रूपानें इतकी सुंदर होती कीं तिच्या सौंदर्याचें वर्णन करतांना वर्णनकाराला आपल्या कल्पकतेचीं लेणीं त्या सौंदर्यावर चढविण्याची कांहींच आवश्यकता नव्हती. आणि ती राणी झाली तीही केवळ आपल्या सौंदर्याच्या जोरावरच झाली. नाहींपेक्षां ती एखाद्या सामान्य अकुलीन मराठा सरदाराच्याच गळ्यांत पडावयाची. याचें कारण ती तेव्हां अज्ञात मातापितरांची मुलगी होती. अर्काटजवळच्या एका लहानशा जहागिरदारानें आपल्या आतेबहिणीच्या दोन जुळ्या मुली मातृ-पितृनिधनामुळें अनाथ होऊन उघड्यावर पडलेल्या आणून पाळल्या, त्यांतली एक मुलगी ही करुणा होय. जशी करुणा तशीच तिची बहीणही रूपवान् होती असें लोक सांगत. तिचा कोणालाही पत्ता नव्हता. लोक बोलत त्यावरून कांहीं कांहीं लोकांना माहीत कीं त्या दोन मुलींचा बाप अर्काटच्या नबावाच्या पदरीं शिलेदार होता. त्याची बायको अर्थात् करुणेची आई वासंती या नांवाची होती तीही करुणेसारखीच सुंदर होती. तेव्हांचा कर्नाटकचा नबाब सादतुल्लाखान अत्यंत स्त्रैण होता व वासंतीचा पति दौलतराव हा त्याच्या पदरीं शिलेदार होता. दौलतराव एकदां दूर लढाईंत गुंतला असतां इकडे नबाबानें त्याच्या घरावर छापा घालून बलात्कारानें वासंतीला नेऊन आपल्या जनानखान्यांत ठेवलें. यानंतर त्या दोन मुली त्या जहागिरदाराच्या पदरीं कशा आल्या याविषयीं कोणाला कांहीं माहिती नव्हती. त्या जहागिर-दाराचें नांव बुवासाहेब असें होतें. तोही कोणाला फारसा माहीत नव्हता. कांहीं वर्षांपूर्वी राजद्रोहाच्या आरोपावरून नबाबानें त्याला पकडून हत्तीच्या पायांखालीं देऊन ठार मारलें व या मुलींच्या कल्याणाचा भार झुंझारराव ह्या विश्वासू सेवकावर येऊन पडला. त्यांपैकीं करुणा एकटीच झुंझाररावाच्या

हातीं सांपडली. तिच्या बहिणीचें त्या संकटांत काय झालें तें परमेश्वराला माहीत ! असा तिचा वृत्तान्त मानाजीराव सांगे व तोही आपल्या वडिलांच्या एका गरीब लंगोटीयार मित्राच्या तोंडून ऐकलेला म्हणून ! मानाजीरावाला त्या गोष्टीचें एवढें महत्त्व वाटण्याचें कारण प्रतापसिंह राजांशीं करुणेचें लग्न होण्यापूर्वी तिचें मानाजीरावाशीं लग्न व्हावें अशी वाटाघाट चालली होती. झुंझारराव व मानाजीरावांचे वडील हे अत्यंत जिव्हाळ्याचे दोस्त असल्यानेंच त्या दोस्तीस पुढेंही अढळ स्थान मिळावें यास्तव झुंझाररावानें करुणा मानाजीरावाला देऊं केली होती. परंतु करुणा ही झुंझाररावाची केवळ पाळलेली मुलगी. बुवासाहेब सांगे म्हणून तिला त्याच्या बहिणीची मुलगी मानावयाचें इतकेंच. बरें; करुणेची आई यवनांच्या हातीं भ्रष्ट झाल्यामुळें तो कधींही न पुसला जाणारा डाग तिच्या कपाळीं लागलेला ! अशा स्थितींत मानाजीरावाच्या पित्यानें त्या मागणीला रुकार दिला नाहीं यांत कांहीं नवल नाहीं. झुंझाररावानें देखील एरव्हीं ह्या सोयरिकीचा प्रश्न काढण्याचें धाडस केलें नसतें. पण मानाजीराव व करुणा यांचें एकमेकांवर मुग्ध प्रेम असल्याचें त्याला नक्की आढळून आल्यामुळेंच त्यानें एवढें धाडस केलें होतें.

परंतु मानाजीरावाच्या पित्यानें त्या संबंधाला नकार दिला, तेवढ्यावरच तो प्रश्न लौकिक दृष्ट्या संपला. करुणा व मानाजीराव यांना त्याबद्दल अत्यंत खेद वाटला. पण त्याची पर्वा कोणाला? सुदैवानें प्रतापसिंह राजे गादीवर आल्यावर करुणेचें भाग्य उदयाला आलें. आपणां उभयतांच्या नशिबीं विवाहग्रंथीनें बद्ध होऊन संसारसुख भोगावयाचें नाहीं तर नाहीं, करुणा कोणीकडून तरी सुखी झाली कीं तेंच आपलें सुख, असें मानून खुद्द मानाजीरावानेंच करुणेला पदरांत घेण्याविषयीं राजांना एकदां विनंति केली, व करुणेचें सौंदर्य पाहून राजांनींही तत्काळ त्या विनंतीला मान्यता दिली. अर्थात् राजे हे दासीपुत्र असल्यामुळेंच संशयित जन्माच्या करुणेला त्यांनीं पदरीं घेतलें हें सांगणें नकोच. या प्रकारें करुणा तंजावरची राणी झाली होती. त्यानंतर मानाजीरावाच्या नाशावर टपलेल्या कांहीं मंडळीनें करुणा व मानाजीराव यांच्या एकमेकांवरील प्रेमाचा विकृत अर्थ करून ती दुर्वार्ता राजांच्या कानांवर जाईल अशी तजवीज केली. परंतु राजांनीं तें मुळींच मनावर घेतलें नाहीं. दुधाच्या पेल्यांत खडीसाखर घालावी त्याप्रमाणें करुणेच्या ह्या सुखमय

जीवनांत परमेश्वरानें लौकरच एका नव्या परमसुखाची भर घातली. ती अलीकडे गर्भवती होती; त्यामुळें ती राजांची अगदीं जीव कीं प्राण होऊन बसली होती. तिच्या पोटीं राजपुत्र यावा अशी सर्वांचीच इच्छा होती; व तो राजपुत्र आपणापेक्षांही परमभाग्यशाली व्हावा यासाठीं राजांनीं मुद्दाम तिला त्या दोन प्रासादिक तरवारींची पूजा करावयाला सांगितलें होतें. त्यासाठीं त्या रत्नखचित पेटीच्या किल्ल्याही जामदारखान्याच्या किल्ल्यां-बरोबरच तिच्या स्वाधीन केल्या होत्या.

अपरूपाराणी जशी राजांवर आत्यंतिक प्रेम करी,तशीच ती आपल्या मतें करुणेला प्रेमानें वश करण्यासाठीं शिकस्त करीत होती. पण काय असेल तें असो, करुणा कांहीं तिच्या आहारीं गेली नाहीं. मानाजीरावानें तिला सांगून ठेविलें होतें; कीं, " करुणे, अपरूपाराणी ही राजा दशरथाच्या राणी कैकेयीप्रमाणें कुटुंबघात व राज्यघात करणारी आहे. महाराज तिच्या मोहपाशांत सांपडले आहेत हीं कांहीं बऱ्याचीं चिन्हें नाहींत. राजे माझा हिताचा शब्द ऐकायला तयार नाहींत; तिथें माझा नाइलाज झाला आहे. पण तूं तरी त्या मायाविनीच्या मोहजालांत सांपडूं नकोस. आणि राजांनाही त्या मोहापासून परावृत्त करणें हें त्यांची अर्धांगी या नात्यानें तुझें कर्तव्य आहे." करुणेला मानाजीरावाचा हा उपदेश सोळा आणे पटला होता; व त्याला अनुसरून तिनें राजांना हितबोध करण्याचा प्रयत्नही अनेक वेळ करून पाहिला. परंतु पालथ्या घागरीवर पाणी ओतल्याप्रमाणें त्या बोधाची अवस्था होती. राजे उलट आपणालाच संशयी व कुढचा मनाची ठरवून अपरूपाराणीची थोरवी आपल्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करतात, प्रसंगविशेषीं "असले घरभेदेपणाचे विचार यापुढें तरी तूं माझ्यापाशीं कधींच बोलून दाखवूं नकोस" असेंही किंचित् रागाचा आविर्भाव आणून सांगतात; त्याप्रमाणेंच मानाजी-रावाचें असेंच मत आहे असें सांगतांच त्याच्यावरही आपल्या रागाची आग पाखडावयाला कमी करीत नाहींत, असें पाहून तिनें अलीकडे तो नाद सोडून दिला होता. राजांची जरी ती जीव कीं प्राण होती आणि राजे एरव्हीं प्रत्येक बाबतींत जरी तिचा एकही शब्द खालीं पडूं देत नसत, तरी ह्या एका बाबतींत ते आपलें कधींच ऐकणार नाहींत व आपण त्यांना सावध करण्याचा जास्त प्रयत्न केला तर तो आपल्या संसारसुखाची माती करण्यालाही वेळीं

कारण होईल अशी खात्री झाल्यामुळें ती स्वतःशी फार भिऊन वागूं लागली होती.

परंतु विधिघटना थोडीच कोणाला कधीं टाळतां आली आहे, मानाजीराव बाहेरगांवीं गेला, त्याच्या दुसऱ्या दिवशीं झुंझाररावाकडून एक जासूद निकडीचें पत्र घेऊन राजांकडे आला. त्या पत्रांत पुढीलप्रमाणें मजकूर होताः

"मी आसन्नमरण स्थितींत आहें. ह्या आजारांतून मी जगेन असा मला व वैद्य–हकिमांनाही मुळींच भरंवसा वाटत नाहीं. ह्या आयुष्यांत माझी कोणतीही इच्छा उरलेली नाहीं; फक्त माझ्या करुणेची अखेरची दृष्टभेट व्हावी अशी इच्छा आहे. तरी आपण एवढी कृपा करावी अशी विनंति आहे."

राजे सदय अंतःकरणाचे होते. पण दयाळू माणसाला स्वार्थ नसतो असें थोडेंच आहे! करुणा त्यांची अत्यंत लाडकी असून ती आतां थोड्याच दिवसांत तंजावरच्या राजपुत्राला जन्म देणार होती. ही पहिलीच वेळ असल्यानें पहिलारू गर्भवतीप्रमाणें तिलाही नाना परींच्या डोहाळ्यांनीं बरेंच हैराण केलें होतें. अशा स्थितींत राजवाड्यांत सर्व सुखसोईंत देखील तिची प्रकृति नीट राखणें अवघड जात असतां प्रवासांत–आणि म्हाताऱ्याच्या आजारीपणांतील प्रत्यक्ष दुःखभरांत तिची प्रकृति नीट रहाणें शक्यच नाहीं. तिला तिकडे कशी पाठवावी?–ह्या प्रश्नाचें नकारार्थी उत्तर राजांना मनोमय मिळालें व त्यांनीं तेथें कोणी माणूस नसतांही स्वतःशीं विचार करतां करतां नकारार्थी मान हलविली. तोंच अपरूपाराणी अकस्मात् तिथें आली.

"झुंझारराव फार आजारी आहेत ना?" तिनें विचारलें. राजांच्या मनांतून तें पत्र तसेंच गुप्त राखावयाचें होतें, "आपण आपल्या राजवैद्याला तिकडे पाठवूं, झुंझाररावांच्या प्रकृतीची अन्य प्रकारें जेवढी काळजी घेतां येणें शक्य आहे तेवढी घेऊं. त्यांना अंमळ आराम पडल्यावर इकडेच आणवूं, म्हणजे अनायासें करुणेची व त्यांची भेटही होईल, आणि करुणा एथल्याएथें राहूनही दोघांचा काळ सुखांत जाईल. बरें; दुर्दैवानें ह्याच दुखण्यांत त्यांचा शेवट झाला तर ईश्वरी इच्छा! त्यापुढें कुणाचा काय इलाज! मग करुणेला ही बातमी कळवणेंच भाग आहे.–" असे विचार त्यांच्या मनांत घोळत होते. पण अपरूपाराणीला ती बातमी कळली, आतां ती गुप्त रहाणें शक्यच नव्हतें.

"मग करुणेला पाठवायला पाहिजेच नाहीं का?"

"ती जाऊन तरी काय करणार ? ती त्यांच्या आयुष्याची दोरी जास्त बळकट करणार आहे कीं काय ? "

"ही काय माणसाची बोलण्याची रीत झाली ? सोन्यासारखा दुबळा जीव उघड्यावर पडला होता, त्याला त्यांनीं स्वतःच्या जिवापलीकडे जपून वाढवून लहानाची मोठी केली. त्यांना मरणघटकेला तिची दृष्टभेट घेण्याचा देखील अधिकार नाहीं कीं काय? आतां, तुम्ही राजे आहां व ते एक सामान्य माणूस आहेत हें खरें; पण राजे लोकांनीं झालें तरी माणुसकीला सोडून वागावें असें कोणत्या शास्त्रांत सांगितलें आहे ? तें कांहीं नाहीं. करुणा जाऊन त्यांना भेटून आलीच पाहिजे."

आईसाहेबांचा हुकूम झाल्यावर त्याविरुद्ध वर्तन करण्याचें धैर्य राजांच्या अंगीं मुळींच नव्हतें. तरी पण त्यांनीं धाडस करून करुणेच्या डोहाळ्यांचा पुरुषी भाषेंत शक्य तेवढा आडपडदा ठेवून अर्थात् 'करुणा आतांशा आजारी आहे ' असा चांचरत चांचरत उल्लेख केला.

राणी त्यावर पूर्ववत् अधिकारयुक्त वाणीनें उत्तरली, "त्या आजारी-पणाची परीक्षा तुम्हां पुरुषांपेक्षां आम्हां बायकांना जास्त असते. आणि झुंझाररावांची दृष्टभेट देखील झाली नाहीं तर तिच्या मनाला तरी बरें वाटेल का ? तें कांहीं नाहीं. तिला गेलेंच पाहिजे."

झुंझाररावाच्या आजारीपणाची बातमी करुणेला नुक्तीच राणीकडून कळली होती व त्या क्षणापासून तिच्या डोळ्यांवाटे गंगायमुना वाहूं लागल्या होत्या. राजे आपल्याला विशेषतः ह्या गरोदरपणांत किती जपतात हें तिला स्वानुभवावरून माहीत असल्यानें ते या वेळीं आपल्या पालक पित्याची व आपली भेट होऊं देतील अशी तिला मुळींच आशा नव्हती. परंतु अपरूपा-राणी कनवाळूपणानें आपल्या पदरानें तिचे अश्रू पुसून तिच्या वतीनें अधि-कारयुक्त वाणीनें राजांना दोन शब्द सांगावयाला इकडे आली, तेव्हां तिला आशा वाटूं लागली कीं आपणाला आपले पिताजी भेटणार. त्या उत्सुकतेच्या भरांत करुणा तशीच घाईघाईनें राणीच्या पाठोपाठ येऊन अंतर्महालांतील दरवाजाबाहेर उभी होती. तिनें त्या दोघांचें संभाषण ऐकलें तेव्हां तिला कधींहि वाटला नव्हता इतका आपलेपणा अपरूपा राणीविषयीं वाटला. आपली बाजू राणीनें उचलून धरल्या कारणानें तिला धीरहि आला होता व

राणीविषयीं बराच आदरही वाटूं लागला होता. तशा विमनस्क स्थितींतदेखील 'सासूबाईंची मनोवृत्ति निवळत चालल्याचें हें गमक आहे' अशी खूणगांठ आपल्या मनाशीं मारून ठेवावयाला ती चुकली नाहीं. ती आंत गेली ती पदरानें डोळे पुशीतच गेली. राणीनें तिला जवळ घेऊन 'वेडीसारखी रडतेस काय? झुंझाररावांना लौकर बरें वाटेल, कांहीं काळजी करायचें कारण नाहीं. तूं आजच्या आज त्यांना भेटायला जा.' असें तिचें शांतवन केलें व राजांकडे वळून पुन्हा विचारलें, "हिला आज पाठवणार ना?"

"जाऊं द्या. पण जरा जपून वागा म्हणजे झालें." राजे म्हणाले.

* * *

करुणाराणी त्याच दिवशीं प्रहर दिवसाला माहेरीं निघून गेली. जातांना तीं प्रासादिक् खड्गें ठेवलेल्या देवघरांतील रत्नखचित पेटीची किल्ली तिनें अपरूपाराणीपाशीं दिली. राजे त्यावेळीं जवळ उभे होतेच. राणीनें ती किल्ली तशीच राजांच्या स्वाधीन करून म्हटलें, "नीट जपून ठेवा."

करुणा माहेरीं गेली, व राणीनें दुसऱ्या दिवशीं माहेरीं जाण्याचा बेत ठरविला. जातांना एकदां त्या प्रासादिक तरवारीचें दर्शन घ्यावें अशी इच्छा तिला झाली; म्हणून तिनें राजांना पूजेच्या वेळीं तसें सांगितलें. राजांनीं पूजेच्या वेळीं पुजाऱ्यापाशीं किल्ली देऊन पेटी उघडण्याला सांगितलें. पुजाऱ्यानें त्यांच्यादेखत पेटी उघडली. तों काय? पेटी रिकामी! तिच्यांत त्या तरवारी नाहींत!

# प्रकरण ५ वें

# कठोर राजाज्ञा

मस्तकावर एखादा कडा कोसळून पडावा तसें सर्वांना त्यावेळीं वाटलें. राजांची तर कंबरच खचल्यासारखी झाली. ते शून्य दृष्टीनें राणीच्या तोंडाकडे पाहूं लागले, व राणी त्यांच्याकडे पाहूं लागली. पुजारी तर देवासमोर बळी द्यावयाला नेण्यांत आलेल्या अजापुत्राप्रमाणें भीतीनें थरथर कांपत होता. तरीही त्यांतल्या त्यांत तो स्वतःशीं समाधान मानीत होता, "माझें नशीब थोर, म्हणून ती पेटी उघडतांना महाराज समक्ष हजर होते. त्यांच्या गैरहजेरींत ती पेटी उघडली असती आणि असा प्रकार आढळून आला असता तर माझें मुंडकें कांहीं जाग्यावर राहिलें नसतें."

"तुम्हीं किल्ली कालपासून बेसावधपणें कुठें ठेवली होती?" राणीनें विचारलें.

"ती माझ्यापाशींच होती" राजे उत्तरले.

"मग हा प्रकार असा कसा झाला?" राणीनें पुन्हां विचारलें.

सांगण्याचें तात्पर्य काय कीं ही जी ठिणगी पडली, तिचा हां हां म्हणतां साऱ्या राजवाड्याभर वणवा भडकला. सर्व दासदासांची कसून चौकशी सुरू झाली. आपसांत एकमेकांचें वैमनस्य करण्याऱ्या रोगापासून राजवाड्यांतील दासदासीवर्ग अलिप्त होता अशांतला प्रकार नाहीं. उलट ह्या राजवाड्यांत तर त्या प्रकाराचा कळस झाला होता. त्यांतल्या विघ्नसंतोषी लोकांपैकीं ज्यांचें साधलें त्यांनीं आपल्या प्रतिस्पर्ध्यावर सूड घेण्यासाठीं ह्या वाहत्या गंगेच्या लोंढ्यांत हात धुवून घेण्याला कमी केलें नाहीं. कांहीं लोक नोकरीवरून काढून टाकण्यांत आले, कांहीं जे पक्के वहिमी ठरले त्यांच्या वांट्याला तुरुंगवास येऊन चोरीचा तपास लावण्यासाठीं त्यांचा अमानुषपणें नाना प्रकारें छळ सुरू झाला, कांहींच्या घरादारांवरून तर गाढवांचा नांगर फिरला. इतकें सारें झालें, दोन दिवस हा धुडगूस चालला, तरी चोरीचा यत्किंचितदेखील तपास लागेना. आणि खरा गुन्हेगार शासन झालेल्या किंवा कैदेंत हाल भोगीत असलेल्या अभागी लोकांतच होता किंवा अगदीं

नामानिराळा राहिला होता, याचा तरी काय नेम ?

इतक्या अतिचिकित्सेबरोबरच कांहीं शंकेखोरांच्या मनांत असाही विचार आला कीं करुणा राणीच्या ताब्यांत ज्याअर्थीं इतके दिवस किल्ली होती, त्याअर्थीं तिनें तर त्या तरवारी बरोबर नेल्या नसतील किंवा अन्य उपायानें लांबविल्या तर नसतील ? ह्या शंकेचा विस्तार होतां होतां ती राजांच्या कानांपावेतों जाऊन पोंचली. त्याबरोबर त्यांनाही वाटलें, "करुणेचा ग्रह आईसाहेबांविषयीं अनुकूल नाहीं. त्यांच्याविषयीं माझें मन कलुषित व्हावें एवढ्यासाठीं करुणेनें तर हा एखादा डाव आरंभिला नसेल? करुणेनें जातांना ती किल्ली मुद्दाम अपरूपाराणीच्याच स्वाधीन केली, त्याची राजांना आतां नेमकी आठवण झाली. त्यांनीं राणीपाशीं जाऊन ही शंका बोलून दाखविली. राणीनें त्याला मान्यता दिली नाहीं. परंतु "खरें खोटें काय असेल तें देव जाणे. पण त्यावेळीं तिथल्या तिथें ती किल्ली तुमच्या स्वाधीन करण्याची बुद्धि मला सुचली, ती सुवेळीं सुचली म्हणावयाची" एवढें मात्र म्हणावयाला कमी केलें नाहीं. ह्या बाबतींत त्या मानलेल्या मायलेंकरांचें असें संभाषण चाललें आहे, तोंच द्वाररक्षकानें राजांच्या नांवचें आणखी एक पत्र आणून दिलें. राजांनीं तें राणीच्यादेखत उघडून वाचलें. त्यांत पुढीलप्रमाणें मजकूर होता.

"महाराज, मानाजीराव हा आपल्या राजवैभवाला त्याप्रमाणेंच संसाराला लागलेला भुंगा असून त्यानें आपल्या संसाराची घडी तर केव्हांच बिघडवली आहे व राजवैभवाचा डोल्हारादेखील आंतून इतका पोंखरला आहे कीं तो केव्हां आपल्या मस्तकावर कोसळून पडेल याचा नेम नाहीं. करुणा राणीशीं आपला विवाहसंबंध जुळवून आणण्यांत मानाजीरावानें पुढाकार घेतला तो कां, करुणा त्याच्यावर इतकें प्रेम कां करते, त्या दोघांचें एकमेकांवरील प्रेम खरोखरच बहीण-भावंडांच्या प्रेमाप्रमाणें शुद्ध आहे कीं काय, वगैरे गोष्टींची वाच्यता मी करीत नाहीं. तें ज्यानें त्यानें आपल्या मनाशीं ओळखावें. परंतु आपल्या आजवरच्या भाग्योदयाला कारण असणाऱ्या व आपल्या राज्याच्या भरभराटीला कारण अशा आपल्या दोन्ही तरवारी करुणाराणीमार्फत आजच मानाजीरावाच्या स्वाधीन झाल्या असून त्या तरवारींच्या

आधारावर मानाजीराव तंजावरचें राज्य कसें बळकावतां येईल ह्या घालमेलींत गुंतला आहे, यावरून आपण काय धोरण बांधावयाचें तें बांधा. राणीच्या विश्वासघातकीपणाचा आणखी पुरावा आपणाला पाहिजे असेल, तर मी आपणाला सांगतों, राणी आपल्या पित्याच्या आजारीपणामुळें माहेरीं आली हें निव्वळ खोटें. आपण याचा कसून तपास करा; आणि सावधपणानें वागा."

ह्या पत्राखालीं 'आपला एक हितकर्ता' एवढीच सही होती. हा 'हितकर्ता' कोण ह्या प्रश्नाला अर्थात् फारसें महत्त्व नव्हतें. प्रश्न त्या पत्रांतील मजकुराच्या खरेखोटेपणापुरताच होता. मानाजीराव व करुणा यांची करुणेच्या लग्नापूर्वीपासून मैत्री होती हें राजांना माहीत होतें, व एकदां त्या दोघांचें लग्न ठरूं पहात होतें असेंही त्यांना ओझरतें ऐकू आलें होतें. मानाजीराव व करुणा यांचें एकमेकांवर प्राणापलीकडे प्रेम आहे याचा त्यांना प्रत्यक्ष अनुभव होता व सख्या बहीणभावंडांत देखील इतकें निर्व्याज प्रेम जगांत क्वचितच पहावयाला मिळतें अशी ते आपण होऊन प्रशंसा करीत असत. त्या प्रेमाच्या पवित्र पाटवाला त्या दोघांच्या दुर्वर्तनाचे डाग पडलेले राजांना आतां स्पष्ट दिसूं लागले. त्यांची मनस्थिति अगदीं भांबावल्यासारखी झाली. तशा स्थितींत 'आपण ताबडतोब करुणा व मानाजीराव यांना पकडून आणून शासन करावें' असाही विचार त्यांना सुचला, व त्याची अंमलबजावणी करण्यासाठीं ते आपल्या महालाबाहेर पडतात तोंच माहेरीं जावयाला निघालेली अपरूपाराणी त्यांचा निरोप घ्यावयाला आली. राजांनीं त्या निनांवी पत्राचा वृत्तान्त तिच्या कानावर घातला, त्याबरोबर तिनें तोंडांत बोटें घातलीं.

"माझी तर ह्या पत्रावरून अशी ठाम कल्पना झाली आहे कीं देवघरांतील चोरीच्या मुळाशीं करुणा आणि मानाजीराव यांचें अंग मुख्यत्वें असावें." राणी यावर कांहीं उत्तर न देतां जणूं काय एकंदर घटनेविषयीं—विशेषत: त्या पत्राविषयीं आश्चर्यसागरांत बुडून गेली होती. तिचें आपणाकडे लक्ष वेधण्यासाठीं राजे किंचित् मोठ्यानें पुढें म्हणाले, "मीं ह्या दोन्ही गुन्हेगारांना ताबडतोब शासन करण्याचा निश्चय केला आहे."

"पण अपराधाची शाबिती होण्यापूर्वींच शासन ?"

"अपराधाची शाबिती व्हावयाची आणखी काय बाकी आहे! त्या

दोघांचें एकमेकांवर किती प्रेम व किती विश्वास आहे, हें तुम्हीदेखील पहातच आहां. मानाजीराव परवां जो बाहेरगांवीं गेला तो तिच्याशीं संगनमत ठरवूनच गेला असला पाहिजे; आणि त्याच्या मागोमाग ही मुलुखभवानी काल गेली. झुंझारराव खरोखर आजारी आहेत कीं नाहीं याचीदेखील मला आतां शंका येऊं लागली आहे. आणि जातांना त्या कुलटेनें तुमच्या गळयाला फांस लावण्याचा कसा बेमालूम बेत केला होता पाहिलात ना? तिनें किल्ली मुद्दाम तुमच्या स्वाधीन केली. तुम्हीं ती लगेच माझ्यापाशीं दिली व तेव्हांपासून ती माझ्यापाशींच होती म्हणून ठीक; नाहींपेक्षां हा आरोप तुमच्यावर यावा व तुमच्या माझ्यांत वितुष्ट यावें असा तिचा बेत होता."

"करुणा इतकी पाताळयंत्री असेलसें मला नाहीं वाटत. भाबडी मुलगी, तिला इतके डावपेंच कुठचे सुचायला? आतां, मानाजीरावाविषयीं मात्र कांहीं खात्री देववत नाहीं. त्याचें तिच्यावर वजन आहे, ती पुष्कळदां त्याच्या तंत्रानें वागते, हें मात्र खरें. पण त्यानेंच तिच्या भोळेपणाचा फायदा घेऊन तिला फंसवलें असेल! .. .."

"हें पत्र सांगतें कीं तीं दोघेंही आमचा विवाह होण्यापूर्वीपासून पापें पुजीत आहेत." राजांनीं तें पत्र राणीच्या पुढयांत आदळून आवेशानें म्हटलें. त्यावेळची त्यांची तप्त मुद्रा पाहून पहाणाराला भीतीनें कांपरें भरलें असतें. पण राणी शांतपणानें म्हणाली, "हें पहा, पदरीं पडलें आणि पवित्र झालें.— माझ्या मतें करुणा तशी नाहीं. पण माणसाच्या पोटांत कोण रिघूं शकणार? ती कशी असली तरी आतां राणी झाली आहे, आणि उद्यां राजमाता व्हायची आहे. तिच्याविषयीं असे अनुदारपणाचे उद्‌गार काढणें आणि तिला शासन करणें म्हणजे आपलीं गृहछिद्रें आपणच दिव्यावातीनें दुसऱ्याला दाखवून देण्यासारखें आहे. तरुणपणाच्या पहिल्या जोरांत अपराध अनेकांच्या हातून घडतात. मात्र ती त्या कारस्थानांत कितपत मानाजीरावाच्या आहारीं गेली आहे, त्याप्रमाणेंच त्या तरवारी तिनेंच खरोखर नेल्या कीं काय—"

"शंकाच नको. तिनेंच नेल्या असल्या पाहिजेत."

"तिनें नेल्या असल्या तरी त्या तिनें खरोखरच मानाजीरावाच्या स्वाधीन केल्या किंवा कसें याचा अगोदर तपास करायला हवा. उगाच एखाद्या माथेफिरूप्रमाणें त्या निनांवी पत्रावर विश्वास ठेवून कसें चालेल? मला

तरी वाटतें कीं कुणींतरी केवळ सूडबुद्धीनें तें पत्र लिहिलें आहे. ”

“ तें सूडबुद्धीनें लिहिलें असो कीं प्रेमबुद्धीनें लिहिलें असो. त्यांत ग्राह्यांश असेल तेवढा आपण घेतलाच पाहिजे. ”

“ पण त्या माणसाला तरी इतकी लावालावी करायची काय गरज होती? ज्याचा अपराध असेल त्याला शासन झालें पाहिजे आणि होईलही. इतक्या उजेडांत आलेल्या भानगडी मधल्यामध्यें जिरत नाहींत खास. पण असलीं चुगलखोर माणसें कोणत्याही परिस्थितींत घातकच. आपल्या रामराज्यांत असल्या आगलाव्या लोकांचा सुळसुळाट मला नको आहे. ह्या चुगलखोराचा प्रथम तपास करून त्याला शासन झालें पाहिजे. ”

राणी आपल्या मतें राजाचें शांतवन करण्याचा प्रयत्न करीत असली तरी राजांच्या मनावर क्षणोक्षणीं त्याचा विपरीत परिणाम घडून येत होता. राणी करुणेच्या अन्यायावर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करीत आहे असा राजांचा पक्का ग्रह झाला होता. ते पूर्ववत् कडर्या स्वरांत तिला म्हणाले, “आईसाहेब, दया, ममता, आपलेपणा हे सद्गुण खरे; पण त्यांचा अस्थानीं उपयोग केल्यानें सद्गुणी मनुष्याला त्याचे दुष्परिणाम भोगावे लागतात. तुम्ही करुणेविषयीं ममताळूपणा दाखवीत आहां तो असाच अस्थानीं आहे. तेव्हां तुम्हांला माझी विनंति आहे कीं ह्या बाबतींत तुम्ही कांहीं बोलूं नका; आणि राज्याची आबादानी राखण्यासाठीं मला कांहीं कांहीं बाबतींत थोडेंफार निष्ठुर व्हावें लागलें तरी त्याबद्दल मला दोष देऊं नका. ”

“ आतां तुम्ही कर्तेसवरते झालां. तुम्हांला मी यापेक्षां जास्त काय सांगूं? हो! मुलांनीं शब्द मानला तर बरें; नाहींपेक्षां वडीलमाणसांची शोभाच व्हायची! त्यापेक्षां जास्त कांहीं न बोललेलें बरें—बाकी, तुमचादेखील जीव कळवळला तो उगाच नाहीं. त्या तरवारी चोरीला गेल्या हा राज्याला केवढा मोठा अपशकून ! काय वाटेल तें करून चोरीचा तपास लावलाच पाहिजे. ” असें म्हणून राणीनें आपल्या भाषणाचा समारोप केला. व माहेरी जाण्यासाठीं राजांचा निरोप घेतला. आणखी अंमळशानें ती आपल्या थोर पदाला साजेशा लव्याजम्यासह माहेरीं जावयाला निघाली.

त्याच दिवशीं सूर्यास्ताच्या सुमाराला चंदासाहेबाकडून एक निर्वाणीचा

खलिता येऊन धडकला. त्या खलित्यांत पुढील आशयाचा मजकूर होता:—

" तुम्हीं तंजावरची गादी अनधिकारानें बळकावली आहे अशाबद्दल तुमच्या प्रतिस्पर्धी मंडळींतील गादीच्या योग्य वारसाकडून आमच्याकडे बरेच दिवस तक्रारी येत आहेत. तुम्ही उघड उघड दासीपुत्र असून गादीवर बसल्यानें गादीचा अक्षम्य अपराध झाला आहे. शिवाय तुम्ही आमचे व्याही व तुमचे कर्तबगार दिवाण सय्यदखान यांचा विश्वास-घातानें खून केला आहे. तुमच्या व कर्नाटकांतील इतर हिंदू राज्यांवर वास्तविक बादशहाची सत्ता असून तुम्हीं बळजबरीनें त्या सत्तेचें तुमच्या राज्यापुरतें अपहरण केलें आहे. ह्या तुमच्या अक्षम्य गुन्हेगारीबद्दल बादशाही सत्तेचे प्रतिनिधि व आमचे श्वशूर नबाब दोस्तअल्ली यांनीं तुमची चौकशी करून न्याय करण्याची कामगिरी आम्हांला सांगितली आहे.

" यास्तव ह्या हुकुमान्वयें आम्ही तुम्हांला असें फर्मावितों कीं तुम्हीं आमच्याशीं आम्ही सांगूं त्याप्रमाणें तह करून गादीवरील आपला हक्क सोडून देण्याला तयार व्हावें व तसें आम्हांला तीन दिवसांचे आंत कळवावें. तुम्हीं शरण येऊन सामोपचाराचें धोरण राखल्यास तुम्हांला मान्यता-पूर्वक सरदारी बहाल करण्यांत येऊन तुमच्याशीं दोस्तीचा तह करण्यांत येईल. त्याप्रमाणेंच तुमच्या गादीवर तुमच्या मागाहून येणाऱ्या वारसा-पासून किंवा त्याच्या वतीनें हरकोणापासून तुम्हांला उपद्रव होणार नाहीं अशीही तजवीज करण्यांत येईल. याप्रमाणें वर्तन तुमच्याकडून तीन दिवसांच्या आंत न घडल्यास मात्र लगेच आमच्या सैन्याचा तुमच्या राजधानीसभोंवार वेढा पडेल व ह्या प्रकरणाचा जो काय आम्हांला योग्य वाटेल तो निकाल आम्ही तरवारीच्या जोरावर तात्काळ करून घेऊं, याची तुम्हांला दखलगिरी असावी ... "

* * * *

राजांचा नेहमींचा परिपाठ असा कीं असें कोणतेंही महत्त्वाचें राजकारण उपस्थित झालें कीं प्रथम आपल्या विश्वासांतील सर्व कारभारी मंडळींचा विचार घ्यावयाचा व मग काय तो बेत नक्की ठरवून त्याची अंमलबजावणी करावयाची. इतकेंच काय पण कोणाला एखाद्या अपराधाबद्दल जबाबदार

धरून शासन करावयाचें झालें अथवा कोणाला एखाद्या उपयुक्त कामगिरीबद्दल कोणत्याही महत्पदाला चढवावयाचें झालें तरी सहकारी मंडळींचा विचार घेतल्यावाचून त्यांनीं कांहींदेखील करूं नये. ह्यामुळें मानाजीराव, मल्हारजी, सखोजी नाईक वगैरे मंडळी प्रत्यक्ष राजशक्तीचे घटक बनून गेली होती. मानाजीरावाविषयीं तर बोलावयालाच नको. त्यानें स्वतःच्या अंगच्या लोकोत्तर गुणांमुळें सर्व दरबारी मंडळीला—खाशा कारभाऱ्यांनादेखील मागें टाकलें होतें. सखोजी नाईक हा दिवाण ना; पण मानाजीरावाचें एवढें प्रस्थ राजांपाशीं माजलेलें पाहून त्यालादेखील जेव्हां तेव्हां अंमळ भिऊन वागणें भाग पडे. सखोजी व मानाजीराव हे अगदीं जीवश्च कण्ठश्च स्नेही खरे. परंतु सखोजीलाही मानाजीरावाची एवढी चलती पाहून—आणि कदाचित् दुसऱ्या कोणीं सांगितल्यामुळेंही असेल—संशयात्मक धास्ती वाटूं लागली होती कीं, मानाजीराव स्वार्थाला वळी पडून मित्रद्रोहाचें पाप जोडण्याला तर उद्युक्त होत नसेल ना? अशा संशयानें मनुष्याला एकदां पछाडलें, कीं त्या मनुष्याच्या हातून मित्रद्रोहाचें पापदेखील त्याला स्वतःला नकळत घडूं शकतें. मात्र एवढें खरें कीं, मनदुबळेपणाची मऊ मऊ भुसभुशीत जागा सांपडल्याशिवाय कोणाच्याही मनांत संशयाचें बीज कधींच रुजत नसतें. सखोजी असा कांहींसा मनदुबळा होता.

आज राजांनीं तें पत्र वाचावयाला व सखोजी तेथें यावयाला एक गांठ पडली. वास्तविक सभोंवारच्या सहाय्यक मंडळींत राजांना सल्ला—मसलत देण्याचा पहिला मान मानाजीरावाला मिळावयाचा, व मग मानाजीरावानें इतर मंडळींना पाचारण करून पुढील विचारविनिमय करावयाचा, असा अलीकडील परिपाठ होता. पण एकतर आज मानाजीराव राजधानींत नव्हता व दुसरें, आजच तो तरवारीची चोरी झाल्याविषयींच्या संशयामुळें राजांच्या अवकृपेला पात्र झालेला असल्यानें तो जरी वेळीं जवळ असता तरी राजांनीं त्याचा विचार प्रथम घेतलाच असता असें नाहीं.

सखोजी तेथें येतांच राजांनीं त्याला चंदासाहेबाचें तें निर्वाणीचें पत्र दाखविलें. आंत येतांच राजांची गंभीर व चिंताक्रांत चर्या पाहून असा कांहींसा संशय सखोजीला आलाच होता, त्याला त्या पत्रानें दुजोरा मिळाला. तो पत्र वाचूं लागला तेव्हां राजे एकसारखे त्याच्या चर्येकडे टक लावून पहात

होते. पत्र वाचून होतांच त्यानें त्यांच्याकडे वळून म्हटलें, " चंदासाहेबाचा असा कांहींतरी दुष्ट बेत चालल्याबद्दलचा सुगावा मला लागला व तें महाराजांच्या कानांवर घालण्यासाठीं मी आलों होतों. तों ह्या पत्रानें खात्रीच करून दिली."

" मानाजीचें ह्यांत कांहीं अंग असूं शकेल का ?" राजांनीं विचारलें. वस्तुतः त्यांची तशी खात्रीच होती. पण इतका आपल्या गळ्यांतला ताईत मानाजीराव, त्याच्यावर एकदम भयंकर आरोप आपण केल्यास लोक काय म्हणतील ह्या भयानें ते कांहीं हातचे राखून बोलत होते.

सखोजीची जरी मानाजीराव अपराधी असल्याबद्दल यत्किंचित् खात्री नव्हती, आणि जरी तो स्वार्थासाठीं काय पाहिजे तें भलेंबुरें करण्याला धजण्याइतका बेरड वृत्तीचा नव्हता, तरी कावीळ झालेल्याच्या डोळ्यांना सर्वच पिवळें दिसतें त्याप्रमाणें त्याला मानाजीराव दोषी असावा असें वाटलें. एखाद्याला कोणत्याही कारणानें जें मनुष्य नावडतें झालें असेल, त्याच्याविषयीं उण्या गोष्टी बोलण्याकडे आणि करण्याकडे एखाद्याचा कल स्वाभाविकतःच असतो. सखोजीनें त्या वहात्या गंगेंत हात धुवून घेतले. तो म्हणाला, " महाराजांना तसा कांहींतरी नक्की सुगावा लागला असल्याशिवाय आपल्या आवडत्या मानाजीविषयीं महाराजांच्या तोंडून असे उद्‌गार कसे निघतील? पण त्याच्या हातून अज्ञानानें एखादी चूक घडली असली तरी तिकडे महाराजांनीं कानाडोळा करावा. माणसें तोडतां फार लौकर येतात पण जोडावयाला महा सायास पडतात. तशांत तो अजून हूड आहे.." बोलतां बोलतां सखोजीनें राजांच्या दृष्टीला दृष्टि भिडविली. त्यांच्या दृष्टींत निश्चयपूर्ण संतापाचें पाणी खेळत असलेलें पाहून तो जरा दचकून बोलावयाचा थांबला. खाई त्याला खवखवे या न्यायानें त्याच्या मनांत अशीही शंका आली कीं, महाराजांनीं आपल्या आवडत्या मानाजीविषयीं माझें मत पहाण्यासाठीं हा संदिग्ध प्रश्न टाकला असावा; व आपण कोणत्याही पुराव्याच्या अभावीं निष्कारण होला हो ठोकून दिल्यामुळें त्यांचा गैरसमज होऊन घुस्सा झाला असावा !

परंतु दुसऱ्याच क्षणाला सखोजीची संशयनिवृत्ति झाली. राजांनीं आवेशाच्या भरांत त्यांना आज्ञा केली, " बस्स! तुम्ही आतांच्या आतां मानाजीराव व राणी ह्या दोघांना पकडून आणण्यासाठीं माणसें रवाना करा."

यावरून सखोजीची खातरजमा झाली कीं महाराज खरोखरच मानाजी-रावावर रागावले आहेत. त्याला पकडन आणण्याची महाराजांची आज्ञा सखोजीला तितकीशी विस्मयजनक वाटली नाहीं. पण राणीलाही पकडून आणण्याविषयीं महाराजांचें फर्मान सुटलेलें ऐकून मात्र त्याच्या अंत:करणाला धक्का बसल्यासारखा झाला. कारण त्याच्या स्वत:च्या मतें राणी ही तंजावरच्या राज्यांतील मूर्तिमन्त राजलक्ष्मी होती; तिच्याच पुण्यप्रभावानें राज्यांत आबादीआबाद चालली आहे असा तिच्या ठायीं एकटचा सखोजीचाच नव्हे तर अनेकांचा पूज्य भावाचा विश्वास होता. सखोजीच्या मनांत त्याच-क्षणीं असेंही आलें कीं आपण राजांना हिताचे दोन शब्द सांगून त्यांना राणीच्या छळापासून निवृत्त करावें. परंतु दुसऱ्याच क्षणाला राजांच्या मुखांतून पूर्वीच्याहूनही निश्चित अशी आज्ञा उच्चारली गेली," आणि राणी व मानाजी-राव यांच्याविषयीं ज्या कोणाच्या मनांत आदर वसत आहे असें आढळून येईल अशा सर्व वहिमी मंडळीलाही पकडून आमच्यासमोर घेऊन या. आमच्या-विरुद्ध उभारण्यांत आलेल्या ह्या राजकारस्थानाचा पाळांमुळांसह शेवट आम्हांला वेळींच केला पाहिजे.. जा प्रथम आतांच्या आतां राणी व मानाजी-राव यांना पकडून आणण्याची तजवीज करा, व काय तजवीज केली तें ताबड-तोब इकडे येऊन कळवा."

"महाराज, मी जरा स्पष्ट बोलतों याबद्दल क्षमा असावी. पण आपण शत्रूचें पारिपत्य करण्याचा विचार प्रथम करावयाचा सोडन हें भलतेंच काय आरंभिलें आहे?" सखोजीनें मनाचा हिय्या करून विचारलें.

राजे यावर निग्रहपूर्वक उद्गारले, "ह्या घरभेद्यांपाशींच शत्रुकारस्था-नाचें मूळ आहे. त्यांचें निर्मूलन केल्याशिवाय त्या शत्रुकारस्थानाला आळा बसावयाचा नाहीं. तुम्हांला राणीविषयींची माझी आज्ञा ऐकून चमत्कारिक वाटलें असेल–" राजे क्षणभर थांबून पुन्हा म्हणाले, "पण राणीचें नशीब! तिला भिकेचे डोहाळे आठवले; त्याला कोणाचा काय इलाज ? "

सखोजी दिवाण झाला तरी तो राजांचा नोकर ! राजांच्या आज्ञेपुढें त्याच्या सारासार विचाराला कसली किंमत?

# प्रकरण ५ वें

# चंदासाहेब आणि मोहना

सभोंवारच्या जगांत एथवरच्या घडामोडी होईतों सुमारें तीन वर्षांचा काळ लोटला. एवढ्या काळांत त्रिचनापल्लीच्या राज्यांत पुष्कळच उलथापालथ झाली होती. सर्प गाईच्या पायांना वेटोळीं घालून पाय घट्ट बांधून मनसोक्त दुग्धपान करतो त्याप्रमाणें चंदासाहेबाचा कारभार त्रिचनापल्लींत चालला होता. मीनाक्षीराणी मात्र विचारी त्या बंदिवासांतच खितपत पडली होती. मात्र तिच्यामुळें तिचा रंगमहाल—जेथें तिनें मनोविकारांना बळी पडून चंदासाहेबासारख्या यवन नराधमाच्या संगतींत दुराचाराचीं पापें पुजलीं तो रंगमहाल तिच्या गैरहजेरीमुळें रिकामा पडला होता असें नाहीं!

मग काय? चंदासाहेबाच्या बेगमेला तो रंगमहाल लाभला होता ?—नाहीं. चंदासाहेबाच्याच काय पण दिल्लीश्वराच्या बेगमेलाही भूषवील इतका मीनाक्षीराणीचा तो रंगमहाल सर्व प्रकारच्या विलासोपयोगी साहित्यानें सुसज्जित व वैभवसंपन्न असा होता. त्याच्या वैभवाचें वर्णन करावयाचें तर त्याला थोड्याशा फरकानें पांडवकालीन मयसभेचीच उपमा द्यावी लागेल. मीनाक्षीराणी ही आपल्या पतीची अत्यंत लाडकी राणी, तिच्या हौशीप्रमाणें राजानें लक्षावधि रुपये, लाखों रुपये किंमतीचें सुवर्ण, हिरे—माणकें वगैरे रत्नें खर्चून तो नुसता एक रंगमहाल सजविला होता. असें असतांही मीनाक्षीराणीला बंदिखान्यांत कोंडल्यापासून आजवर एकदांही त्याच्या बेगमेला त्या रंगमहालांत घटकाभर विश्रांति घेण्याची संधि मिळाली नव्हती. परंतु बेगमेला त्याबद्दल नाराज होण्याचें कांहींच कारण नव्हतें. तिच्यासाठीं चंदासाहेबानें अडीच वर्षांपूर्वी म्हणजे मीनाक्षीराणी कैदेंत पडून त्रिचनापल्लीच्या राज्याचीं सर्व सूत्रें पूर्णपणें त्याच्या हातीं येतांच राजप्रासादाशेजारींच सुमारें पाव कोटि रुपये खर्चून व त्रिचनापल्लीच्या खजिन्यांतील बहुमोल रत्नें उपयोगांत आणून बेगममहाल या नांवाचा एक नवा रंगमहाल बांधला होता. तेव्हांपासून त्याच्या मुख्य बेगमेचें तेंच वास्तव्यस्थान होतें.

आणि मीनाक्षीराणीच्या रंगमहालाचा उपयोग काय? तेंही चंदासाहेबाचें विलासमंदिरच होतें; परंतु सहधर्मिणी बेगमांशीं विलासविहार करण्याचें तें स्थान नव्हे! तेथें फक्त नाटकशाळांना प्रवेश होता! आणि तो देखील सर्व नाटकशाळांना नव्हे, तर–शिव शिव! त्या गोष्टीचा उच्चार करतांना जिव्हा अडखळते व लेखणी थरथर कापूं लागते.– आपल्या पूर्वायुष्यांत पति-सेवापरायण म्हणून सर्वांना परिचित असलेल्या मीनाक्षीराणीसारख्या मान्य-तेच्या हिंदु महिलांना भ्रष्टवून आपल्या मुसलमानी धर्माची महति वाढ-विण्याचा त्या नरपशूला मोठा नाद! व त्या आपल्या अजब करामतीचें मूर्तिमंत स्मारक म्हणून त्यानें आपल्या तसल्या पापांची परवड रचण्यासाठीं तो रंग-महाल खास राखून ठेविला होता! त्या रंगमहालांत मीनाक्षीच्या मागाहून अनेक हिंदु महिलांच्या अब्रूची होळी पेटविली गेली असून तूर्त तेथें मोहना या नांवाच्या एका सोळासतरा वर्षांच्या रूपवती युवतीचें वास्तव्य होतें.

मोहना त्या महालांत नुक्तीच प्रविष्ट झाली होती, व प्रथम प्रथम तिनें चंदासाहेबाला वश होण्यांत आढेवेढे घेतले असले तरी आज ती पूर्णपणें त्याची विलासदासी बनण्याला मान्यता देऊन चुकल्यामुळें त्या दोघांच्या प्रणयी हितगुजाला आज नवा रंग चढला होता.

त्या रंगमहालाच्या सजावटींतील एथें विषयपरत्वें प्रामुख्यानें उल्लेखिण्या-सारखा विशेष म्हणजे तेथील सोनेरी मुलाम्याच्या नक्षीदार भिंतींवर व पलंगासभोंवार जरतारी रेशमी काढण्यांनीं टांगण्यांत आलेलीं भव्य तैल-चित्रें होत. त्या चित्रांत फक्त एकच चित्र पुरुषाचें होतें, व बाकीचीं यौवन–सौंदर्यसंपन्न स्त्रियांचीं होतीं. पुरुषाचें जें भव्य चित्र तेथें होतें, तें कोणातरी राजपुरुषाचें व तेंहि हिंदु राजपुरुषाचें असावें, त्याप्रमाणें इतर सर्व चित्रें हिंदु स्त्रियांचीं असावीं, असें वर वर पहाणाऱ्या कोणालाही कळून आलें असतें.

चंदासाहेबाच्या आग्रहानें मोहना त्या रात्रीं चार घटका रात्रीला त्या रंगमहालांत प्रविष्ट झाली, ती तेथील चित्रांकडे टकमक पहात उभी राहिलेली पाहून चंदासाहेबानें दोन पावलें पुढें होऊन तिच्या हनुवटीला हात लावून लाडक्या भाषेंत तिला विचारलें, "प्यारी, त्या चित्राकडे इतकी टक लावून काय पहातेस?"

चंदासाहेबाच्या हाताचा स्पर्श होतांच मोहनेचें सर्वांग विजेचा धक्का

बसल्याप्रमाणें थरारलें, व जाईच्या कोमल पुष्पाला आगीची झळ लागतांच तें कोमेजून जावें त्याप्रमाणें तिचें मुखकमल त्याच क्षणीं कोमेजून गेलें. परंतु कामांध चंदासाहेबाच्या तें मुळींच ध्यानीं आलें नाहीं; मग तिच्या अंतरंगांतील कालवाकालवीची त्याला काय कल्पना असणार ! बाकी, मोहनेच्या मनांत त्या क्षणीं कोणतेही विचार घोळत असोत, बाहेरून दिसावयाला ती त्या अतिप्रसंगाविषयीं तिरस्कार प्रदर्शित करीत आहे असें सहसा कोणाच्याही ध्यानीं आलें नसतें. चंदासाहेबानें तिच्या हनुवटीला हात लावला, तो उजव्या हातानें हलकेच दूर सारीत तिनें पुन्हां एकवार त्या चित्रमालिकेकडे निरीक्षून पहातां पहातां त्या राजपुरुषाच्या चित्राकडे अंगुलीनिर्देश करून विचारलें, "हें चित्र कोणाचें ?"

चंदासाहेब मोहनेच्या स्कंधावर वाढत्या लडिवाळपणानें हात ठेवून उद्गारला, "मला वाटलेंच होतें तूं मला असाच कांहीं तरी प्रश्न विचारशीलसें." तिचें लक्ष तेथल्या चित्रमालिकेकडे पूर्णपणें वेधलें गेलें असून तिची तीक्ष्ण दृष्टि मधुपानाला आतुर होऊन ह्या पुष्पावरून त्या पुष्पावर झडप घालणाऱ्या भ्रमराप्रमाणें तेथील मानिनींच्या चित्रांकडे क्रमाक्रमानें वेधली जात आहे हें तेव्हांच त्याच्या ध्यानी आलें. तो पुढें म्हणाला, "त्याबरोबरच हीं इतकीं सुंदर स्त्रियांचीं चित्रें इथें टांगण्याचें कारण काय असाही प्रश्न तुझ्या मनांत उत्पन्न झाला असेल नाहीं ?"

"आपण एखाद्याच्या मनांतली गोष्ट अचूक ओळखण्यांत मनकवड्यासारखे वाकबगार आहां, हें मला माहीत नव्हतें !" मोहना किंचित् अधोमुख होऊन आपली दृष्टि एखाद्या सर्व दिशांना चकाकणाऱ्या पाचूप्रमाणें नेत्रांच्या एका कोंपऱ्यांतून ओझरती चंदासाहेबाकडे वळवून पहात म्हणाली.

"त्यांत एवढें अचंबा करण्याजोगें काय आहे ? स्त्रीस्वभाव हा इथून तिथून सारखाच आहे. चंदासाहेब मुसलमान असून आपल्या धर्माचा कट्टा अभिमानी आहे, व इतर धर्मांचें ज्या ज्या उपायांनीं खंडन करतां येईल त्या त्या उपायांनीं तें करण्यांत तो सदा तत्पर असतो, ही गोष्ट सूर्य-चंद्राइतकी स्पष्ट आहे. त्याच्या रंगमहालांत हीं अशीं हिंदुधर्मीय व्यक्तींचीं चित्रें पाहून कोणालाही आश्चर्य वाटणारच. हा रंगमहाल तुला नवीन आहे; व तुझ्याप्रमाणेंच ह्या चंदासाहेबाच्या प्रेमाला पात्र ठरलेल्या प्रत्येक स्त्रीला ह्या रंगमहालांतील

प्रथमप्रवेशाच्या वेळीं तुझ्याप्रमाणेंच आश्चर्य वाटलेलें मीं पाहिलें आहे. आणि एथला हा एकंदर देखावाही आश्चर्य वाटण्याजोगा आहे खरा." तो प्रथम त्या राजपुरुषाच्या चित्राकडे बोट दाखवून म्हणाला, "हें चित्र ह्या देशाच्या अखेरच्या राजाचें. ह्याच्याच रूपवती मीनाक्षीराणीला मीं माझ्या प्रेमपाशांत गुरफटून टाकून माझी नाटकशाळा बनवून सोडलें, व अखेर तिला कैदखान्यांत डांबून एथल्या राजसिंहासनावर आरूढ झालों. हा पहा रत्नखचित सुवर्ण-पर्यंक व हें विलासोपयोगी बहुमोल साहित्य पहा! हें सारें एथलें राजैश्वर्य—त्याचा भोक्ता आतां मी आहें. त्याप्रमाणेंच इथें ह्या इतक्या सौंदर्यसंपन्न हिंदु युवती तैलचित्रांच्या रूपानें वास करीत आहेत ह्या साऱ्या माझ्या विलास-दासी शोभून गेलेल्या आहेत. एखादी मानिनी हिंदु सुंदरी ह्या रंगमहालांत प्रविष्ट होतांना रुष्ट झालेली असली किंवा लाजत असली तर मी तिला एथें आणून हा देखावा दाखवितों व अभिमानपूर्वक तिला विचारतों, 'ह्या पहा तुझ्या देशांतील थोरामोठ्यांच्या लेंकी—सुना—बायका! यांच्या हिंदुत्वाचा व पावित्र्याचा दिमाख जर इथें चालला नाहीं, तर तुझा तरी रुष्ट होऊन कसा निभाव लागणार ?' त्याप्रमाणेंच एखाद्या सुंदरीला नीतिधर्माचें भय वाटूं लागलें व त्या भयामुळें लज्जा उत्पन्न झाली तर तिला मी ह्या चित्राकडे बोट दाखवून विचारतों,"—तो त्या चित्रमालिकेमधील राजपुरुषाच्या चित्रा-शेजारीं टांगलेल्या भव्य व सुंदर चित्राकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाला, 'ही पहा राणी मीनाक्षी. ही राणी देखील जिथें माझी विलासदासी होण्याला लाजली नाहीं, तिथें माझी विलासदासी होण्याला तूं कशाला लाजतेस?' ह्या सर्व स्त्रिया मीं मोहित करून किंवा बलात्कारानें हरण करून आणल्या असून जेव्हां जेव्हां त्यांच्या पुरुषांनीं मला विरोध केला, तेव्हां तेव्हां त्यांची कत्तल करण्यांत मीं मुळींच दिरंगाई केलेली नाहीं."

"यांच्याच पंक्तींत आज मी बसत आहें, असाच ना याचा अर्थ ?" मोह-नेनें चर्या गोरीमोरी करून विचारलें.

"होय. असेंच म्हणेनास !" चंदासाहेब निर्भयपणें उत्तरला.

"आणि राणीची जी गत झाली तीच इतर स्त्रियांची झाली असेल नाहीं ?"

"नाहीं. राणीची गोष्ट निराळी आणि त्यांची निराळी. राणीची मला

अजून माझ्या कार्यासाठीं आवश्यकता आहे. त्रिचनापल्लीच्या राज्याचा घांस जरी माझ्या गळ्याखालीं गेला असला, तरी तेवढ्यावरून तो पचनीं पडला असें म्हणवत नाहीं. तो पूर्णपणें पचनीं पडेपावेतों मला राणीची गरज आहे. म्हणूनच राणीच्या अब्रूला लौकिकांत धक्का लागूं नये यासाठीं मीं तिला बंदिवासांत कोंडून ठेवलें आहे. पण इतर स्त्रियांपैकीं कांहीं दासी बनून माझ्या बेगमेची सेवा करीत आहेत, कांहीं अब्रूसाठीं आत्महत्या करून मरून गेल्या, आणि कांहींचीं मीं बळजबरीनें हाताखालच्या मुसलमानांशीं लग्नें लावून दिलीं."

"मग ह्या पंक्तींत माझें स्थान कोणतें ?"

"तें आतां तुझें तूं ठरवावयाचें आहे. स्त्रीजातीवर–इतकेंच काय पण त्यांतल्या निवडक मानवती व रूपवती स्त्रियांवर विजय मिळवून त्यांना माझ्या विलासमंदिराचीं भूषणें बनवून सोडण्यांत मी किती भाग्यवान् आहें याचा पुरावा हा पहा–ह्या सौंदर्यसंपन्न स्त्रियांच्या चित्रांच्या रूपानें तुझ्यापुढें उभा आहे. ह्या सर्व स्त्रियांहून जरी तूं जास्त रूपवान् नाहींस तरी तूं जर माझी मर्जी राखलीस, तर तुला मी माझी मुख्य बेगम करावयाला तयार आहें." तूं माझ्या पदरीं आलीस त्याच दिवशीं माझ्या मर्जीप्रमाणें वागावयाला तयार झाली असतीस तर आज हा 'जर' 'तर' चा प्रश्नच उत्पन्न झाला नसता. पण अजूनही वेळ गेलेली नाहीं! अजूनही तूं मनांत आणशील तर माझी मर्जी संपादन करूं शकशील."

"मीं आपल्या इच्छेप्रमाणें आपल्या सेवेंत रुजू होण्याचें मान्य केल्यावर माझा दोष कोणता शिल्लक राहिला ?"

"माझी सेवा करावयाला तूं राजी आहेस हें एका परीनें फार चांगलें झालें. पण तसें करण्यांत तूं माझ्यावर कांहीं उपकार करीत आहेस असें मात्र मला मुळींच वाटत नाहीं. समज, तूं अखेरपावेतों माझ्या इच्छेप्रमाणें वागण्याला कबूल झाली नसतीस किंवा अजूनही कबूल झाली नाहींस, तर सत्तेच्या जोरावर स्वतःची इच्छा पूर्ण करून घेण्याला मी समर्थ आहें. ह्या इतक्या खुबसूरत प्यारी माझ्या विलासदासी झालेल्या तुला आढळून येतात, ह्या सर्व मला स्वसंतोषानें वश झाल्या असें नाहीं. परंतु ज्यांनीं माझ्या खुषीच्या मागणीची पायमल्ली केली, त्यांना मीं सक्तीनें माझ्या पायांशीं नमविलें. हें माझें

अमोघ सामर्थ्य नाकबूल करण्याची तुझी छाती आहे का ? बोल. ”

“ नाहीं. नाहीं. साक्षात् कृतान्तकाळालाही चळचळ कांपविणारे आपण; आपल्या सामर्थ्याविषयीं मी शंका कशी घेईन ? पण मी स्वखुषीनें आपल्या सेवेंत रुजू झाल्यावर आणखी काय करायचें बाकी राहिलें कीं, तें केल्यावर आपण मला पूर्णपणें प्रसन्न व्हाल ? ” मोहनेनें भयचकित वृत्तीनें कांपत विचारलें. बोलतां बोलतां तिचा स्वरहि कांपत होता, इतकें तिला चंदासाहेबाचें भय वाटत होतें.

चंदासाहेब तिची ती केंविलवाणी स्थिति पाहून तिच्या मनांतील भय घालविण्यासाठीं तिला जवळ ओढून आपल्या हृदयाशीं धरून सौम्य शब्दांत उद्गारला, “ प्यारी, अशी भिऊं नकोस. मी काय बोलतों तें नीट ऐकून घे. ”

“ आपण मला असें तरवारीच्या धारेवर धरल्यावर मला भय वाटणार नाहीं तर काय होईल? जाईच्या कोमल फुलाचा सुवास घ्यावयाचा तर तें हलक्या हातानें तोडावें लागतें.” मोहना अश्रू पुशीत गद्गद् कंठानें उद्गारली.

“ तें मला कळतें. म्हणूनच मी हें जाईचें फूल असें नाजूक हातानें खुडून अलग हृदयाशीं धरीत आहें. ” चंदासाहेब तिला हृदयाशीं उत्कटतेनें बिलगून धरीत म्हणाला, “ पण प्यारी, तूं चतुर आहेस; तुला एवढें कळावयाला पाहिजे कीं मीं तुला जी मुद्दाम माझ्या सासुरवाडीहून सासऱ्याच्या जनानखान्यांतून इकडे आणली, ती केवळ विलास–विहारांच्या लालसेनें आणलेली नाहीं. मला माझा हा रंगमहाल शृंगारावयाचा झाला तर ह्या अफाट राज्यांत लावण्यवति युवतींना दुष्काळ नाहीं. मी ह्या राज्याचा धनी आहें, माझ्या प्रजाजनांतील तुझ्याहून कैकपटीनें सुंदर अशा कोणाही स्त्रीला ह्या रंगमहालांत ओढून आणण्याचें मीं मनांत आणलें तर मला विरोध करणारा कोण आहे ?”

“ मग मला इकडे आणण्यांत आपला हेतु तरी काय ? ”

“ अशी नीट ताळ्यावर येऊन विचार. तंजावरच्या राजवाड्यांत माझ्या व्याह्याचा अर्थात् तुझ्या प्रियकराचा खून झाला, खरें ना ? ”

“ खरें. ”

“ त्या खुनाची भरपाई करून घेण्यासाठीं मला तंजावरचें राज्य धुळीला मिळवावयाचें आहे; तें जिंकून मला तेथल्या सिंहासनावर आरूढ व्हावयाचें आहे. तूं बरेच दिवस माझ्या व्याह्याच्या पदरीं असल्यानें तंजावरच्या सर्व

अंतर्गत राजकीय घडामोडी तुला माहीत असल्या पाहिजेत. त्या मदान्ध प्रतापसिंह राजानें माझ्या सय्यदखानाचा विश्वासघातानें खून केला, याची चीड जेवढी मला आहे त्यापेक्षांही तुला जास्त चीड असली पाहिजे. कारण खान माझा नुसता व्याहीच होता पण तुझा जिव्हाळ्याचा प्रियकर होता. एवढी कामगिरी तूं केलीस तर मी तुझा नुसता प्रियकर व्हावयालाच काय पण धर्माच्या साक्षीनें तुझें पाणिग्रहण करून तुला त्रिचनापल्ली व तंजावर ह्या संयुक्त राज्याची स्वामिनी—माझी मुख्य बेगम करावयाला तयार आहें."

विचारी व सावधानचित्त माणसाला चंदासाहेबाच्या उपरोक्त भाषणांतील ढोंगीपणा तेव्हांच कळून चुकला असता. मोहनेला आपल्या प्रियकराच्या हत्येचा सूड घ्यावयाला सांगतांना तिला आपली प्रियतमा होण्याची विनंति त्यानें केली. ती ऐकून मोहना सय्यदखानाची खरोखरच प्रियतमा असती तर तिला संताप आला असता. परंतु तिच्या चर्येवर तसा कोणताच भाव त्यावेळीं तरी उमटलेला चंदासाहेबाला दिसून आला नाहीं. मग काय? मोहनेचें तिच्या प्रियकरावर खरें प्रेम नव्हतें? किंवा चंदासाहेबाच्या संगतींत तिला त्या दुःखाचा विसर पडून चंदासाहेबाचा लळा लागला होता?

मोहनेच्या मनाची त्यावेळीं काय स्थिति होती तें एक ती जाणे व दुसरा परमेश्वर जाणे. त्या गूढावर त्या वेळेपुरता तरी पडदा पडावा असा योगायोग असल्यामुळेंच चंदासाहेबाच्या तोंडून निघालेल्या प्रश्नवाचक उद्गारांना मोहनेकडून उत्तर मिळण्यापूर्वीच एक दासी आंत येऊन चंदासाहेबाला नम्रतापूर्वक अभिवादन करून म्हणाली, "कोणी एक मुसलमान सरदार सरकारांच्या भेटीसाठीं बाहेर तिष्ठत उभा आहे."

त्या दासीनें आपला प्रणयभंग केला असें चंदासाहेबाला वाटलें. तो रागारागानें तिच्यावर खेंकसून म्हणाला, "दिलावर, यावेळीं तूं मरायला इकडे कशाला आलीस?"

दिलावर भीत भीत हात जोडून उद्गारली, "सरकार, मीं त्या सरदाराला पुष्कळ समजावून सांगितलें कीं यावेळीं सरकारांची भेट व्हायची नाहीं, उद्यां सकाळीं ये. खुदादादनें त्याला अशा रात्रींच्या वेळीं आंत प्रवेश दिला म्हणून त्याला देखील मी पुष्कळ रागें भरल्यें. पण तो सरदार आपणाला भेटल्याशिवाय माघारा जायला तयार होईना, व खुदादादनें मला अंमळ बाजूला

घेऊन माझ्या कानांत सांगितलें, "–बोलतां बोलतां दिलावर मोहनकडे पाहून चपापली.

"त्यानें काय सांगितलें ?" चंदासाहेबानें विचारलें.

"सरकारांनीं अंमळ बाजूला यावें म्हणजे सांगतें." दिलावर मोहनेकडे संशयित मुद्रेनें पहात म्हणाली.

"माझी अडचण वाटत असेल तर मी बाहेर जातें." असें म्हणून मोहना अंतर्महालांत जाऊं लागली.

दिलावरच्या मनांत आलेली शंका अस्थानीं नव्हती. रंगमहालांत येणाऱ्या स्त्रिया आपल्या धन्याच्या विश्वासाला पात्र नसतात हें तिला माहीत होतें. चंदासाहेबालाही मोहनेविषयीं अजून तितका विश्वास वाटत नव्हता. इतकेंच काय पण ती त्या रंगमहालांत विलासविहारांची वांटेकरीण किंवा धनीण झाल्यावर आणि तिनें त्याच्या अपेक्षेप्रमाणें त्याला तंजावरकडील महत्त्वाच्या गुप्त वातम्या पुरविल्यानंतरदेखील त्यानें तिच्यावर कितपत विश्वास टाकला असता हाही एक प्रश्नच होता. परंतु मोहनेकडून त्याचा कार्य-भाग अजून साध्य व्हावयाचा होता; तोंपर्यंत तरी तिला न दुखवण्याइतकी खबर-दारी घेणें त्याला प्राप्त होतें. गाईच्या सडांतून दूध काढून घ्यावयाचें तर तिला प्रसन्न करूनच तें काढून घेतलें पाहिजे हें तो ओळखून होता. मोहनेच्या मनांत दिलावरच्या बोलण्यामुळें विकल्प आला आहे असें पाहून व तिच्याकडून तंजावरकडील बातम्या अजून काढून घ्यावयाच्या आहेत ह्या पुढील साधना-कडे दृष्टि देऊन तो दिलावरला म्हणाला, "मोहना कोणी परकी नाहीं, ती तुझी उद्यांची धनीण आहे. लौकरच ती माझी मुख्य बेगम व्हावयाची आहे. तिच्यादेखत बोलावयाला तुला कोणतीच हरकत नाहीं."

चंदासाहेबाच्या तोंडचे हे उद्‌गार मोहनेला नवीन असल्यानें ती ते ऐकून आनंदित झाली. मग तो आनंद चंदासाहेब आपल्या खासा मुठींत आला अशा कावेबाज अर्थाचा असो, कीं आपलें भाग्य उदयाला आलें–आपण आतां खरोखरच एवढ्या मोठ्या राजपुरुषाची अर्धांगी होऊन एथल्या राजविला-सांची धनीण होणार अशा अर्थाचा असो. पण चंदासाहेबाची ही देखत-भुलीची भाषा दिलावरच्या पूर्ण परिचयाची होती. मोहना त्या रंगमहालां-तील नवीन उतारू होती, पण अशा कैक मोहना तेथें येऊन गेलेल्या दिलावरनें

पाहिल्या होत्या. अशा प्रत्येकीला वश करून आपला कार्यभाग साधण्याच्या कामीं चंदासाहेबाची बुद्धि किती चलाखीनें चालते याचे अनेक दाखले तिनें आजवर पाहिलेले असल्यानें प्रस्तुतच्या त्याच्या बोलण्याबद्दल तिला मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. पण तिला त्याच्या अंतःकरणांतील कारस्थानांशीं काय करावयाचें होतें ? आपल्यावर त्याचा घुस्सा होऊं नये एवढ्यापुरती खबरदारी तिनें घेतली, तिचा कार्यभाग झाला. 'इतक्या स्त्रिया आजवर फंसल्या त्यांतील ही एक एवढी मनाशीं खूणगांठ मारून ती चंदासाहेबाला म्हणाली, "तंजावरच्या राजकारणाविषयीं आपणाशीं चर्चा करण्यासाठीं तो सरदार आलेला आहे असें खुदादाद मला म्हणाला."

"तंजावरचें राजकारण!.....आणि त्याविषयीं माझ्याशीं चर्चा करण्यासाठीं येणारा तो मुसलमान सरदार कोण बरें असावा ?" असा स्वतःच्या मनाशीं प्रश्न विचारून चंदासाहेब क्षणभर स्तब्ध राहिला. त्यावेळीं त्यानें मोहने-कडे वळून पाहिलें नाहीं म्हणून! तें पाहिलें असतें तर तोच प्रश्न त्याहीपेक्षां जास्त उत्कटतेनें तिच्या मनांत घोळत असल्याचें तिच्या चर्येवरून त्याला हटकून अजमावतां आलें असतें. त्यानें लगेच दिलावरला आज्ञा केली, "त्या सरदाराला आंत पाठवून दे जा."

"मी आंत जात्यें." दिलावर बाहेर जातांच मोहना म्हणाली.

चंदासाहेबानें स्मितहास्यपूर्वक तिला म्हटलें, "ठीक आहे. उद्यांच्या आमच्या बेगमसाहेबा तुम्ही, यास्तव एवढा गोषा राखणें तुमच्या थोर पदवीला भूषणदायकच आहे."

मोहना यावर जास्त कांहीं न बोलतां अंतर्महालांत निघून गेली व तो सरदार आंत आला. ती दरवाजावरील पडद्याआडून पहात सावधपणें उभी होती. त्या सरदारानें आंत येतांच चंदासाहेबाला प्रथम लवून मुजरा करून विचारलें, "आपण मला ओळखलें नसेल!"

चंदासाहेबानें खरेंच त्या सरदाराला ओळखलें नाहीं. तो आश्चर्यचकित मुद्रेनें त्याच्याकडे पहात उभा होता. मोहनाही त्या सरदाराला पहातांच बुचकळ्यांत पडली. तिला चेहरा ओळखीचा तर वाटे. पण हा तर मुसलमान आहे. असें कसें ?—हा प्रश्न सोडवितां सोडवितां ती जास्त लक्षपूर्वक भेदक दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागली.

"मीं तुम्हांला ओळखलें नाहीं. तुम्ही आमच्या खानसाहेबांच्या परिवारा-कीं कोणी आहां काय ?" चंदासाहेबानें विचारलें.

"सांगतों. पण अगोदर मला थोडा खुलासा पाहिजे आहे. मोहना ातां आपल्या महालांत होती ना ?"

"होय. कां बरें ?"

"ती कुठें आहे ?"

"कां? आंत आहे. ती तुमच्या परिचयाची आहे काय ? तिच्याविषयीं ांहीं वाटाघाट करण्यासाठीं तर तुम्ही आलां नाहीं?" असें म्हणून त्यानें ागें वळून पाहिलें. तों अंतर्महालाचा दरवाजा लावलेला होता. त्यानें उठून ा अर्धवट उघडून आंत डोकावून पाहिलें. मोहना तेवढ्यांत बाजूला पली. पण तिची दृष्टि दरवाज्याच्या फटींतून पड्यापलीकडे त्या सर-राच्या चर्येकडे खिळून बसली होती व तिचे टंवकारलेले कान पुढील संभाषण कण्याची आतुरतेनें वाट पहात होते. कोणीं तिला तेव्हां पाहिलें असतें र ती संतापानें लाल झालेली दिसली असती. कां बरें ?

# प्रकरण ६ वें

# कोयाजी घाटगे

तो कोयाजी घाटगे होता, एवढें सांगितल्यावर वाचकांना त्याचा निराळा परिचय करून देण्याचें कारणच नाहीं. मोहना तेथें नाहीं असें कळल्यावर कोयाजी म्हणाला, "मीं मोहनेविषयीं संशय घेतल्याचें पाहून आपणाला कदाचित् विस्मय वाटला असेल. पण तिचा आम्हांला जेवढा अनुभव आहे तेवढा आपणाला खास नाहीं. विलासदासी ह्या नात्यानें त्या स्त्रीरत्नानें आपल्या रंगमहालाला अपूर्व शोभा आणली असेल व आपलें चित्त तिच्या ठायीं पूर्णपणें रिझत असेल. परंतु आपण एवढें विसरतां कामा नयें कीं ती एक जलाल नागीण आपल्या उशाशीं आहे."

चंदासाहेबाला त्या गोष्टी नवीन नव्हत्या, व तो कोयाजीला वाटला तितका बेसावधही नव्हता. तो त्या वेळीं मनांत म्हणाला, "प्रत्यक्ष अल्लावर देखील वाजवीपेक्षां जास्त विश्वास न टाकणाऱ्या मला हा दीडशहाणा व्यवहारज्ञानाच्या गोष्टी शिकवतो आहे! पण म्हणावें बेटचा, तूं देखील कामापुरता मामा आहेस असेंच मी धरून चालतों हें तरी तुला कुठें माहीत आहे !" ही अर्थात् त्याच्या मनांतली भाषा झाली. पण त्याचे दाखवावयाचे दांत निराळे होते आणि खावयाचे निराळे होते. "तुम्हीं मला ही बहुमोल सूचना दिलीत, याबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. बरें; आणखी काय खबरबात?"

"आणखी खबरबात आहे. ती इतकी महत्त्वाची व आनंदाची आहे कीं ती आपणाला निवेदन करण्यापूर्वी आपण मला एक वचन दिलें पाहिजे."

"काय वचन दिलें पाहिजे ?"

"पहिली गोष्ट, तंजावर आपल्या हातीं आल्यावर मला त्या राज्याचा मुख्य प्रधान केलें पाहिजे."

"तुमच्या ह्या गोष्टी मला शक्य कोटींतील वाटत नाहींत. तंजावरचें राज्य इतक्या सहजगत्या बुडवितां येण्याजोगें तकलुपी आहे असें मानण्याइतका मी भोळा नाहीं."

" म्हणूनच मी एवढी मागणी आगाऊ करीत आहें. आपणाला ज्या गोष्टी असाध्य वाटतील, त्या साध्य करून दाखविण्याचें बळ त्या श्रीरंगानें ह्या कोयाजीला दिलें आहे. मीं करावयाची ती सारी सिद्धता केली आहे. आतां निमित्तमात्र कांहीं गोष्टी केल्या पाहिजेत व कांहीं बाबतींत लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकली पाहिजे. तें सर्व करण्याला मी समर्थ आहें. हें कार-स्थानाचें मंदिर मीं मोठ्या हिंमतीनें उभारलें आहे. आतां त्यावर कळस चढवावयाचा आहे; तो आपल्या हातून चढवावयाचा."

" एकूण तुम्हांला वचन पाहिजे म्हणतां ? "

" होय. मला तंजावरच्या उद्यांच्या अधिपतीचें वचन पाहिजे आहे. "

" हें घ्या वचन. " चंदासाहेबानें कोयाजीच्या हातावर हात देऊन सांगितलें, " आतां सांगा तुम्हांला काय सांगावयाचें तें. "

" बाजीराव पेशवे वारले* ही हकीगत आपणाला कळलीच असेल. "

" काय, पेशवे वारले ? " चंदासाहेब हर्षातिरेकानें उद्गारला, " फार छान झालें. एकूण खुदाची आमच्यावर मेहेरनजर आहे म्हणावयाची. उभ्या हिंदुस्थानांत आम्हां मुसलमानांना आजकाल खरा विरोध करणारा व दिल्लीच्या बादशाही सत्तेलादेखील पायांखालीं तुडवून पुढें जाणारा गाजी जर कोणी असेल तर तो एकटा बाजीराव पेशवा. तो खलास झाला, त्याच्या बरोबरच उगवती हिंदुपदपादशाही खलास झाली असें म्हणावयाला हरकत नाहीं. "

एखाद्या कसलेल्या वीरानें आपला भरधांव वारू समोर एखादें अरिष्ट पाहून एकदम आवरावा त्याप्रमाणें चंदासाहेबानें त्याच क्षणीं आपली जीभ आवरली. परंतु चोराचीं पावलें चोरानें ओळखावीं त्याप्रमाणें कोयाजीनें त्याचा अर्थ ओळखून म्हटलें, " सरकार, सरकार, आपणाला संशय उगीच आला. "

" नाहीं. मला संशय आला नाहीं. "

" हें पहा, असली लपवालपवीची भाषा ह्या कोयाजी घाटग्यापाशीं

---

* थोरले बाजीराव पेशवे ता. २६ एप्रील सन १७४० रोजीं नर्मदा कांठीं रावेरखेड नांवाच्या गांवीं मरण पावले. त्या प्रसंगावरची 'पेशवाईवरील गंडान्तर' ही कादंबरी पहा.

बोलावयाचें कांहींच कारण नाहीं. आपल्या तोंडून पेशव्यांविषयीं व हिंदु-पदपादशाहीविषयीं कठोर उद्गार निघाले, ते मला रुचणार नाहींत अशी भीति आपल्या मनांत उत्पन्न झाली आहे. खरें ना ?" यावर चंदासाहेब कांहींच बोलला नाहीं. कोयाजी पुढें म्हणाला, "ती आपली भीति अस्थानीं आहे. इतर मराठ्यांविषयीं मी कांहीं बोलूं शकत नाहीं. पण घाटगे हे प्रथमपासूनच पेशव्यांचे हाडवैरी व बादशाही सत्तेचे दोस्त आहेत, व ते आजपर्यंत माथेफिरूप्रमाणें कधींच वागलेले नाहींत. आपणाला कदाचित् माहीत नसेल तर आठवण करून देतों, बाळाजी विश्वनाथ पेशव्यांच्या शिर-जोरपणाला विटून सेनापति चंद्रसेन जाधवाबरोबर थेट मोंगलांना जाऊन मिळणारे दुसरे निधड्या छातीचे वीर सर्जेराव घाटगेच होत. घाटग्यांना मराठेशाहीपेक्षां मुसलमानशाहीच जास्त प्रिय व जास्त जवळची आहे. इतकेंच काय, पण पेशव्यांच्या हातून हिंदुस्थानचें रेंसभरदेखील कल्याण न होतां उलट वाटोळेंच होईल व त्या अनर्थापासून हिंदुस्थानाला वांचविणारी बादशाही सत्ताच होय, असा माझा प्रामाणिक ग्रह आहे. तंजावरचें राज्य आम्हां मराठ्यांचें ना, पण तेथेंही मराठेपणाचा अभिमान न धरतां आपली सत्ता तेथें प्रस्थापित करण्यासाठीं काया–वाचा–मनें करून झटणाऱ्या माझ्या-इतका एकनिष्ठ मित्र आपणाला उभ्या कर्नाटकांतील मराठ्यांत दुसरा सांपडणार नाहीं. बाजीराव पेशव्यांच्या निधनामुळें त्यांच्याबरोबरच हिंदुपदपादशाहीचें थोतांड आतां आपोआपच कमी होणार यांत मलादेखील मनापासून आनंद आहे. याउप्पर आपला माझ्यावर विश्वास बसो अगर न बसो."

"तुमच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. तुमच्यासारखे जिगरदोस्त मिळाल्यावर त्यांच्या बळावर मी तंजावरचें राज्य जिंकीन; इतकेंच काय पण दिल्लीचें सिंहासनदेखील साध्य करूं शकेन."

"त्या दूरच्या गोष्टी आहेत. आपणांला तूर्त तंजावरपुरता विचार करा-वयाचा आहे. पेशवे निधन पावल्यामुळें आम्हां सर्वांचेंच काम फार हलकें झालें आहे. या बाबतींत आमच्या थोरल्या राणीसाहेब व मीं मिळून जो बेत ठरविला आहे, त्याला मूर्त स्वरूप देण्याच्या कामीं आम्हांला आपली मदत पाहिजे आहे. येऊन जाऊन आपल्या वाटेंतील मुख्य अडचण रघूजी भोंसले

आणि मुराराव घोरपडे यांची. पैकीं रघूजी भोंसले पेशव्यांच्या निधनाची वार्ता ऐकून ताबडतोब साताऱ्याकडे रवाना झाले."*

"काय रघूजी भोंसले इकडील मोहिमेचें काम अर्धवट टाकून निघून गेले ?"

"होय."

"ते कां म्हणून ?"

"त्यांना पेशवा होण्याची हांव सुटली आहे."

"म्हणजे?"

"बाजीराव पेशव्यांच्या पश्चात् आपणाला पेशवाईचीं वस्त्रें मिळावीं अशी त्यांची अपेक्षा आहे, व तीं साध्य होण्याचीं चिन्हेंही दिसत आहेत. आज बरींच वर्षें त्यांचा पेशवाईपदावर डोळा आहे.† पेशव्यांचा आप्त बाबूजी नाईक बारामतीकर हा घालमेल्या गृहस्थ त्यांचा साथीदार असून शाहूमहाराजांच्या दरबारांत त्याचें चांगलें वजन आहे. शिवाय शाहूमहाराज आणि भोंसले हे साडू असल्यानें महाराजांच्या राणीकडून देखील त्यांचा चांगलाच वशिला लागण्याचा संभव आहे.ह्या उलाढालींत कदाचित् असेंही होण्याचा संभव आहे, बाबूजी नाईक पेशवे होतील व रघूजी भोंसल्यांच्या पुत्राला शाहूमहाराजांच्या मांडीवर दत्तक देऊन छत्रपति बनवितील. कांहीं झालें तरी नाईक आणि भोंसले ही राहु–केतूंची दुक्कल एकदां पेशवाईच्या राशीला बसली आहे ती पेशवाईचें समूळ उच्चाटन केल्याशिवाय स्वस्थ बसणार नाहीं खास. आपला त्याच्याशीं अर्थाअर्थीं फारसा संबंध नाहीं. आपणाला तूर्त एवढेंच पहावयाचें कीं कर्नाटकावर आलेलें मराठ्यांचें अरिष्ट देवाच्या दयेनें दूर झालें आहे; व आतां पेशवाईच्या अधिकाराबाबत मराठ्यांत लाथाळी लागणार असल्यानें त्यांना इकडील राजकारणांत लक्ष घालावयाला अवसर

---

*थोरले बाजीराव पेशवे मृत्यु पावल्यावर त्यांचीं पेशवाईचीं वस्त्रें बाळाजी बाजीराव यांना न मिळतां बाबूजी नाईक बारामतीकर यांना मिळावीं असा रघूजी भोंसले यांचा मानस होता. त्यामुळेंच बाजीरावाची निधनवार्ता ऐकतांच ते ताबडतोब कर्नाटकांतील मोहीम अपुरी सोडून मराठ्यांच्या सैन्याचा तळ शिवगंगा येथें देऊन साताऱ्यास परत आले.

—इतिहाससंग्रह.

† 'पेशवाईवरील गंडांतर' पहा.

मिळणार नाहीं. तोंवर आपणाला आपली ढांसळती सत्ता मजबूत करतां येईल. एक तंजावरचें राज्य आपल्या हातीं आलें कीं आपण अर्काटच्या नबाबाचेही नबाब झालां असें समजा. मग आपणांला दिल्लीदरबारांत देखील एवढा मान मिळेल कीं त्या शिरजोर निजामाला देखील आपल्या कृपेची अपेक्षा करावी लागेल. आपणाला माझें आणि अपरूपाराणीसाहेबांचें साहृय असल्यावर आणखी काय पाहिजे ? " चंदासाहेब स्वतःशीं विचार करीत असलेला पाहून कोयाजी पुढें म्हणाला, " आपण कदाचित् म्हणाल कीं सर्व सत्ता प्रतापसिंहाच्या हातीं असतांना व मराठे त्याचेच पक्षपाती असतांना हें कसें शक्य होईल. खरें ना ? "

" तुमच्यासारखे धोरणी पाताळयंत्री तुम्हीच, ही अडचण दूर करण्याचा मार्गदेखील तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणाला दाखवितां यावयाचा नाहीं."

" तो मार्ग निश्चित करून नंतरच मी आपणापाशीं आलों आहें. प्रतापसिंहाची आज जी एवढी घडी बसलेली दिसते, ती कशाचा परिणाम हें आपणाला माहीत आहे ? "

" नाहीं. पण तुमच्यासारख्या कर्त्या पुरुषांचें त्यांना पाठबळ असून थोरल्या राणीसाहेबांचीही आतांशा त्यांच्यावर कृपादृष्टि आहे असें ऐकतों. "

" आपण ऐकतां तें एका अर्थीं खरें आहे. आम्हीं उभयतांनीं आमचा कार्यभाग बिन्बोभाट साधावा यासाठीं तसें वातावरण निर्माण केलें आहे खरें. आपणाला माहीतच आहे कीं आपणाला काशीला जावयाचें असेल तर रामेश्वराकडे जात असल्याचा मारे बोभाटा करावा, कीं आपला शत्रू रामेश्वराच्या रस्त्यानें आपल्या पाठोपाठ धावूं लागतो व आपण सुखरूपपणें काशीला जाऊन पोंचतों. "

" इतकेंच काय; पण शत्रु रामेश्वराच्या वाटेला लागला कीं मागाहून त्याच्यावर चाल करून त्याचा बीमोड करणें देखील आपणाला फार सोपें जातें."

" आतां कसें आपण ओळखलें! तरवारीनें गळा कापण्यापेक्षां केंसानें गळा कापण्यांत खरें कौशल्य व कमी धोका असतो. आम्ही आजवर प्रतापसिंहाचा नक्षा उतरला जावा व त्याला गादी सोडणें भाग पाडावें यासाठीं कसा व्यूह रचिला आहे हें आपण ऐकाल तर आश्चर्यानें थक्क होऊन जाल. "

" सांगा तर खरें ! "

"सांगतों. पण त्यापूर्वी आपणाकडून खुलासा पाहिजे आहे. समजा, यशाचा राजमार्ग आपणाला आम्हीं दाखवून दिला, तर आपण आमच्या मागण्या पूर्ण करावयाला तयार आहां का ?"

"अलबत्‌ ! हें काय विचारणें! तंजावर माझ्या हातीं येतांच तुम्हांला त्या राज्याचे मुख्य प्रधान करावयाचें एवढीच ना तुमची मागणी ?"

"ती माझी एकट्याची मागणी झाली. परंतु थोरल्या राणीसाहेबांच्या साहचाशिवाय आपलें कांहीं चालावयाचें नाहीं हें आपण जाणतांच. यास्तव त्यांना प्रसन्न राखणें हें आपलें पहिलें काम आहे."

"त्यांना प्रसन्न राखण्यासाठीं मीं काय केलें पाहिजे ?"

"राजा होण्यापेक्षां राजांचा राजा होणें आपणाला जास्त आवडेल कीं नाहीं?"

"अर्थात्‌ !"

"झालें तर. थोरल्या राणीसाहेबांची इच्छा राजमाता म्हणून मिरवण्याची आहे."

"पण त्यांना पुत्र नाहीं ! मग त्या राजमाता कशा होणार ?"

"कोण म्हणतें त्यांना पुत्र नाहीं म्हणून? त्यांनीं एकवार ज्याचा पुत्र म्हणून स्वीकार केला, तो त्यांचा पुत्रच झाला. दत्तक पुत्र तरी निराळा काय असतो? आपणापाशीं म्हणून हा खरा प्रकार मीं सांगितला. एरव्हीं जगांत आम्ही तो औरस राजपुत्र असेंच सांगत असतों व म्हणूनच त्या राजपुत्राला राज्यावर बसविण्याचा आमचा बेत एकदां जरी फंसला तरी आम्ही त्या कामीं निराश झालों नाहीं. रयतेपैकींही बऱ्याच जणांचा आम्हांला पाठिंबा आहे, व त्या पाठिंब्याच्या जोरावर आम्ही राज्यक्रांति देखील घडवून आणूं शकूं. पण आपला व आमचा सलोखा पूर्वीपासूनचा आहे. आपण आम्हांला पाठीशीं घातल्यास सर्व गोष्टी बिन्‌बोभाट पार पडणार आहेत. आपण आमच्या राजपुत्राला तंजावरच्या गादीचा खरा वारस मानावयाला व त्याला न्याय मिळवून द्यावयाला तयार व्हा. मी त्या राजपुत्राच्या व थोरल्या राणीसाहेबांच्या वतीनें बोलत आहें असें समजा. आपली सार्वभौम सत्ता आम्हांला मान्य आहे व आपणाकडे आम्ही दाद मागण्यासाठीं आलों आहों. राजपुत्र सयाजीरावाला एकदां राज्याभिषेक झाला असतांना प्रतापसिंहाच्या

कारवाईनें त्याला राज्यभ्रष्ट व्हावें लागलें; त्यालाच पुन्हा तंजावरच्या गादीवर आणण्याचें आपण कबूल करीत असाल तर सांगा, कीं आम्ही—थोरल्या राणीसाहेब आणि मी आपल्या साहृचार्थ सिद्ध आहों."

"तुम्ही म्हणतां त्या सर्व गोष्टींना माझी पूर्ण अनुमति आहे." चंदासाहेब मान तुकवीत म्हणाला. त्याच वेळीं तो मनांत म्हणत होता, "अपरूपा राणी काय, बोलून चालून स्त्री. मीनाक्षीसारख्या चतुर स्त्रीला देखील मी पुरून उरलों, तो ह्या राणीला थोडाच जुमानतों! तसाच हा थेरडा, आणि ह्यानें निर्माण केलेला तो सयाजीराजा! अपेक्षित वैभवशिखराच्या मार्गानें जातांना मार्गांतील कांटे पायांना बोंचू नयेत यास्तव तेवढ्यापुरतीं पायीं घालावयाचीं पादत्राणें हीं! आपलें कार्य झालें कीं तीं फेंकून दिलीं!"

"नुसती अनुमति देऊन चालावयाचें नाहीं. माझ्याबरोबर चला, आणि मशिदींत उभे राहून मला अगोदर तसें वचन द्या." चंदासाहेबाची चर्या ते अपमानकारक शब्द ऐकून कांहींशी कडवट झालेली पाहून कोयाजी पुढें म्हणाला, "केवळ एवढ्याचसाठीं आपण वाहेर यावें असें मी म्हणत नाहीं. प्रतापसिंहाच्या यशाचें मर्म कशांत आहे हें मीं अजून आपणाला सांगितलेलें नाहीं. त्याच्यापाशीं दोन प्रासादिक तरवारी आहेत व त्या तरवारींच्या प्रभावानेंच तो आजवर निर्भयपणें राजवैभव भोगीत आहे हें मीं आपणाला मागेंच सांगितलें होतें तें आठवतें का?"

"हो! आठवतें."

"त्या तरवारी घेऊन थोरल्या राणीसाहेब आपल्या भेटीला आलेल्या आहेत. त्या नगराबाहेरील एका गुप्त ठिकाणीं सध्यां थांबल्या आहेत. त्यांची मी आपणाला भेट करून देणार आहें व त्या तरवारी स्वतः राणीसाहेब आपणाला अर्पण करणार आहेत. परंतु आपण प्रथम मशिदींत माझ्याबरोबर येऊन शपथ घेतली पाहिजे. आपलें ठरल्यावर ह्या कारस्थानाला आरंभ कोठून करावयाचा याविषयींही आमचा नक्की बेत ठरला असून तो बेतही आपणाला थोरल्या राणीसाहेब कळवतील."

शपथा घेणें आणि शपथा मोडणें हा चंदासाहेबाच्या हातचा मळ होता. तो कोयाजीच्या शब्दाला तेव्हांच कबूल झाला व तसाच त्याच्याबरोबर निघाला.

दोन प्रहर रात्रीच्या सुमाराला चंदासाहेब माघारा आला. मोहना अर्थात् तोंवर जागी होती. ती अंतर्महालांतील एका मऊ मऊ पण पायांतळच्या गालिच्यावर पहुडल्या पहुडल्या विचार करीत होती. चंदासाहेबाला वाटलें, ती आपलीच मार्गप्रतीक्षा करीत आहे. ती आपल्या विचारांत इतकी गढून गेली होती कीं चंदासाहेब आंत केव्हां आला याचीदेखील तिला दाद नव्हती. त्यानें आंत येतांच तिला गालिच्यावर पहुडलेली पाहून तिच्या जवळच गुडघ्यांवर बसून तिचा उजवा हात आपल्या उजव्या हातीं घेऊन आपल्या गळ्यापाशीं नेत तिला विचारलें, "प्यारी, तूं इतका वेळ माझी वाट पहात जागी राहिलीस ?"

मोहना उत्तरली, "आम्ही बायका. वेलीचें वृक्षासाठीं अडतें, तसें वृक्षाचें वेलीसाठीं कुठें अडतें !"

"पण तूं अशी खालीं झोंपलेली कां ? हा रंगमहाल आतां तुझा आहे. हा पर्यंक तुझ्यासाठीं आहे ! त्याचा उपभोग तूं नाहीं घ्यायचा तर दुसऱ्या कोणीं घ्यायचा ?" चंदासाहेबानें तिचा हात आपल्या गळ्यांत घालून तिच्या गुलाबी गालांना हाताचा स्पर्श करीत विचारलें.

ती उत्तरली, "खाविंद, पूजापात्रांतलें पूजासाहित्य देवाची पूजा करण्यासाठीं असतें, स्वतःची पूजा बांधून घेण्यासाठीं नसतें. मी आपली दासी आहें. आपणांपूर्वीं मीं एकटीनें ह्या शय्येचा उपभोग घेतला तर मीं आपला आणि त्या शय्येचादेखील अपमान केल्यासारखें होईल."

एवढें त्या दोघांचें संभाषण चाललें आहे तोंच खुदादादनें भरजरी मखमली म्यानांनीं वेष्टित अशा दोन तरवारी तेथें आणून ठेवल्या.

मोहनेनें थोड्या वेळापूर्वीं कोयाजीच्या तोंडून तरवारींविषयीं वृत्तांत ऐकला होताच. परंतु तिनें पुन्हां चंदासाहेबाला विचारलें, "ह्या तरवारी कसल्या ?"

"प्यारी, मला कर्नाटकचा बादशहा आणि तुला बादशाहीण बनवून सोडणारीं हीं प्रसादचिन्हें आहेत. तूं सय्यदखानाच्या पदरीं असतांना अनेक वेळां यांच्या प्रभावाविषयीं ऐकलें असशील."

"होय. पण त्या आपणाला कशा मिळाल्या ?"

चंदासाहेबानें अपरूपाराणी व कोयाजी यांच्याशीं तंजावरच्या राजकारणा-

बाबत झालेल्या वाटाघाटी मोहनेला निवेदन केल्या. त्यावरून अपरूपा राणी व कोयाजी ह्या दोघांनीं गफलतीनें त्या तरवारी तंजावरच्या राजवाड्यांतून चोरून आणून चंदासाहेबाच्या स्वाधीन केल्या हें तिला कळून आलें. त्याविषयीं तिला मनांतून कांहीं का वाटेना ! बाह्यात्कारीं ती एवढें मात्र म्हणाली खरें, " एकूण माझा पायगुण इतका शुभकारक आहे ! "

" आहे खरा. ही वेळाच एकंदरींत शुभ वेळा आहे, म्हणूनच माझ्या कर्नाटकांतील साम्राज्यस्थापनेच्या महत्त्वाकांक्षेला मूर्तस्वरूप देण्याला व त्या अनुरोधानें राजकारणाचे डाव खेळण्याला याच मुहूर्तापासून मी प्रारंभ करणार आहें. पेशवे मेले, त्याबरोबरच आमच्या सर्व अडचणी मेल्या असें मानावयाला हरकत नाहीं. कारण त्यामुळें रघूजी भोंसले इकडील मोहिमेची आवराआवर करून सातान्याकडे निघून गेला, आणि आम्हांला कर्नाटकचें सारें रान मोकळें सांपडलें. नाहीं म्हणावयाला मुराररराव घोरपडे तेवढा शिरजोर आहे. त्याला एकदां जाळ्यांत अडकवून नेस्तनाबूत करून सोडला कीं काम झालें. "

" पण त्याला अडकवणें हेंच तर महाकर्म कठीण आहे. आपणाला वाटतो तितका तो भोळा नाहीं. "

" त्याला अडकवण्याची बेमालूम युक्ति अपरूपाराणी व कोयाजी यांच्या विचारानें मीं शोधून काढली आहे. " चंदासाहेब लगेच बाहेर जाण्यासाठीं उठतां उठतां म्हणाला, " मीनाक्षी राणीला मीं आजवर जिवंत कां ठेवली यांतलें रहस्य प्यारी, तुला मी आणखी एका घटकेनें सांगतों. "

चंदासाहेब एवढें बोलून बाहेर निघून गेला. मोहना मात्र तेथेंच विचार करीत स्वस्थ बसली. बराच वेळपावेतों ती तशा स्थितींत विचार करीत बसली होती. तिला कळेना कीं चंदासाहेब अशा अपरात्रीं मीनाक्षी राणीकडे कशासाठीं गेला असेल !

# प्रकरण ७ वें

# मीनाक्षी राणाचा बंदिवास

कपाळीं बंदिवास आल्या दिवसापासून तीं तीन वर्षें मीनाक्षी राणीनें किती हालअपेष्टांत काढलीं असतील, तें तिचें तीच जाणें! चंदासाहेबाचे—तिच्या विश्वासघातकी प्रियकराचे पाय त्रिचनापल्लीच्या किल्ल्याला अधिकृत रीत्या लागले, त्याच दिवशीं सूर्यास्ताच्या सुमाराला त्या दोघांची जी भेट झाली, त्या दिवसापासून पुढें तीन वर्षांत चंदासाहेबानें तिचें मुखावलोकन देखील केलें नव्हतें. रयतेनेंही त्या दुराचारी स्त्रीची फारशी चौकशी पुढें केली नाहीं. कैदेंत असतांना ती सर्व प्रकारच्या राजोपचारांना सर्वस्वीं मुकली होती. इतकेंच काय पण तिला जरूरीपुरत्या अन्नवस्त्रासाठीं देखील अत्यंत आबाळ सोसावी लागे. अशा हालअपेष्टांत मला कुजत ठेवण्यापेक्षां एकदां गोळी घालून ठार तरी करा अशी तिनें अन्नपाणी द्यावयाला येणाऱ्या नोकरांच्या हातीं चंदासाहेबाला अनेकवार विनवणीही केली. पण त्या विनवणीचा देखील कांहीं उपयोग झाला नाहीं. ती चंदासाहेबासारख्या यवनाच्या प्रेम-पाशांत सांपडून पतित झाली होती, ही एक गोष्ट बाजूला ठेवली, तर ती एरव्हीं फार देवभोळी होती. किल्ल्यांतील एका अत्युच्च शिलाखंडाच्या अग्रपृष्ठावर नायक राजांच्या कोणा शिवभक्त पूर्वजानें एक सुंदर शिवमंदिर बांधलें होतें; त्या मंदिरांत रोजच्या रोज शिवदर्शनाला जाण्याचा तिचा नियम होता, व ती अपरिहार्य कारणाखेरीज तो नियम कधींही मोडीत नसे. घाईच्या वेळीं ती दुरून तरी शिवमंदिराच्या शिखराचें तरी दर्शन घेत असे. पण बंदिवासांत पडल्या दिवसापासून ती त्या शिवदर्शनाला आंचवली होती. तरी त्यांतल्यात्यांत तिचें सुदैव एवढेंच कीं तिला शिवमंदिराजवळच किंचित् पायथ्याशीं असलेल्या पुरातन राजवाड्यांत बंदिवासांत ठेवण्यांत आलें होतें; व तेथें कैदखाना म्हणून जी एक लहानशी खोली तिच्या वांटचाला आली होती, त्या खोलीला असलेल्या झरोक्यांतून तिला शिवमंदिराचा सुवर्णाचा कळस दिसत असे. त्या कळसाकडे पहात तिनें रोजच्या रोज त्या झरोक्याशीं बसावें,

व प्रहरचे प्रहर घळघळा अश्रु ढाळावे. पण त्या अश्रुपातांतही तिला समाधान ए वढेंच वाटे कीं आपण मोहवश होऊन एका अविवाधमाच्या संगतीनें बाटलों व देशाचा सर्वस्वीं नाश होण्याला कारण झालों, त्या महत्पापाचा आपल्या चारित्र्यावरचा डाग धुवून काढण्यासाठींच परमेश्वरानें आपणाला अशा कैदेंत तीन त्रिकाळ रडत वसविलें आहे!

अशा प्रकारें राणी मीनाक्षी तीन वर्षांनंतर एके दिवशीं मध्यरात्रीच्या सुमाराला त्या झरोक्यांतून चांदण्याच्या प्रकाशांत त्या महादेवाच्या* शिखराचें दर्शन घेत बसली असतां एकाएकीं तिच्या बंदिखान्याच्या दरवाजाची कडी वाजली. इतक्या अपरात्रीं आपणाकडे कोण आलें असें मनाशीं म्हणून मीनाक्षी एकदम दचकून दरवाजाकडे पाहूं लागली. प्रथम तिला वाटलें कीं या वेळीं अशा अपरात्रीं आपणाकडे कोण येणार? कांहींतरी भास झाला असेल. त्याच वेळीं दुसऱ्याच क्षणाला पिशाच्चलीलेची कल्पना तिच्या डोक्यांत येऊन तिला भयही वाटलें. तेवढ्यांत दरवाजाच्या फटींतून बाहेरील प्रकाश आंत डोकावूं लागलेला पहातांच तिची ती भीति दूर झाली. पण तेवढ्यांत त्याहूनहि दारुण अशी नवी भीति तिच्या मनांत उत्पन्न झाली, "त्या चांडाळ नरपशूनें माझा घात करण्याचें तर योजिलें नाहीं ना? एरव्हीं इतक्या अपरात्रीं माझ्याकडे कोण येणार?"

मीनाक्षीची ही भीति अगदींच अयथार्थ होती असें नाहीं. चंदासाहेबानें यापूर्वीं आपल्या कांहीं प्रतिस्पर्ध्यांचा कडेलोट केला होता तो अशा मध्यरात्रीच्या वेळींच केल्याचें तिला माहीत होतें. तिला ज्या महालांत कोंडून ठेवण्यांत आलें होतें, त्याच महालांत आणखीही कांहीं राजवंदी पूर्वीं होते. त्यांपैकीं कांहीं स्वतः तिनें कैदेंत कोंबलेले होते, व कांहींना चंदासाहेबानें ती शिक्षा दिली होती. त्यांपैकीं दरएकाला कैदखान्याबाहेर काढण्यांत आलें तें अशा मध्यरात्रीच्या वेळींच काढण्यांत आल्याचें तिला माहीत होतें, व तितक्या सर्वांचा उजाडण्यापूर्वीं कडेलोट झाल्याचेंही तिनें रोज अन्नपाणी द्यावयाला येणाऱ्या दासदासींकडून ऐकलें होतें. त्यांच्या कडेलोटाविषयीं यापेक्षां जास्त कांहीं माहिती तिला नव्हती. परंतु कैदखान्यांत कोंडण्यांत आलेलीं

*त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांत मध्यभागीं एक प्रेक्षणीय खडक उंचच्या उंच उभा असून त्या खडकावर पुराणप्रसिद्ध असें हें महादेवाचें मंदिर आहे.

सारीं नररत्नें अतुल स्वार्थत्यागी व परम राष्ट्रनिष्ठ होतीं हें तिला माहीत होतें. अशा पुण्यशील जीवांच्या कपाळीं कडेलोटाची शिक्षा आली, ती त्यांच्या अढळ राष्ट्रनिष्ठेमुळेंच होय, अशी मीनाक्षीचीच काय पण कोणाचीही स्वाभाविकपणें कल्पना झाली असती.

तेच दुर्धर भोग आपल्या वांटचाला आले कीं काय असें वाटून मीनाक्षी भयचकित मुद्रेनें दरवाजाकडे पहाते, तोंच दरवाजा उघडला गेला. त्याबरोबर दरवाजाच्या आंत पाऊल टाकणाऱ्या व्यक्तीकडे ओझरतें पाहून ती स्वतःच्या मनाशीं म्हणाली, "आला—काळ आला !"

तो काळ—नव्हे, कर्दन काळ एका काळीं मीनाक्षीचा प्रियकर असलेला चंदासाहेब ! होता मीनाक्षीला त्याचें मुखावलोकन देखील करूं नयेसें वाटलें, म्हणून तिनें तोंड बाजूला फिरविलें. चंदासाहेबानें तें पाहिलें. पण त्या-विषयीं मनाशीं मुळींच पर्वा न करतां बेदरकारपणें तो आपले दोन्ही हात कमरे-वर ठेवून आढ्यतेनें दरवाजांत उभा राहून हंसत हंसत म्हणाला, "मीनाक्षी, आज तीन वर्षांनंतर प्रथमच अशा रात्रीच्या वेळीं मी तुझी भेट घेत आहें, हें पाहून तुला आश्चर्य वाटत असेल, नाहीं ?" ह्यावर मीनाक्षी कांहीं बोलते किंवा कसें तें पहाण्यासाठीं तो कांहीं क्षण स्तब्ध राहिला. पण मीनाक्षी कांहीं न बोलतां जास्तच तिरस्कारानें त्याच्याकडे पाठ फिरवून उभी राहिली तें पाहून तो चार पावलें पुढें जाऊन पूर्ववत् हंसतमुखानें म्हणाला, "मीनाक्षी, तुला त्या प्रसंगापासून माझ्याविषयीं संशय वाटूं लागला असेल व माझा तुला रागही आला असेल. तुला मीं एकाएकीं ह्या तुरुंगवासांत डाम्बून तुझ्याशीं विश्वासघात केला हें कांहीं अंशीं खरें आहे. पण तो प्रसंगच असा होता कीं मला त्यावेळीं तसें करण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. माझा सासरा किती कडवा मुसलमान होता हें तुला माहीत आहे. दक्षिणेंतील सर्व हिंदू राज्यें नामशेष करून आपली एकतंत्री सत्ता दक्षिणेंत स्थापन करावयाची, ह्या महत्त्वा-कांक्षेच्या भरीं पडूनच त्यानें त्रिचनापल्लीच्या राजकारणांत माझा हात शिरकवून दिला होता. त्यावेळीं जर मी तुझ्या तंत्रानें वागलों असतों, तर त्या क्रूरानें मला जबरदस्त शासन करून वर आणखी तुझ्या राज्याचीं पाळें-मुळें खणून काढण्याला कमी केलें नसतें. इतकेंच काय पण तुला देखील त्यानें आपल्या जनानखान्यांतली बटिक बनवून सोडलें असतें. मी प्रारंभापासूनच

त्रिचनापल्लीच्या हिंदु राज्याचा पुरस्कर्ता आहें अशी त्याची खात्री असल्या-मुळेंच त्यानें एथील घडामोडींच्या बाबतींत माझ्यावर सर्वस्वीं विश्वास न टाकतां आपल्या मुलाला सफदरअल्लीला माझ्याबरोबर पाठविलें होतें. तो मेहुण्याचा कांटा मीं माझ्या वाटेंतून दूर सारला. पण नबाबापुढें माझा नाइलाज झाल्यामुळें मला तुझ्या बाबतींत आजवर इतकें निष्ठुर व्हावें लागलें. अल्लाच्या कृपेनें तोही कांटा मराठ्यांनीं परस्पर माझ्या वाटेंतून दूर केला आहे. आतां माझ्याशीं शत्रुत्व करावयाला सफदरअल्ली तेवढा जिवंत आहे. पण मराठ्यांच्या हातीं त्याची देखील परस्पर चांदी आटेल अशी तजवीज करण्या-साठींच मी एथें आलों आहें. एवढें माझें कारस्थान सिद्धीला गेलें, कीं अर्काटचें राज्य त्रिचनापल्लीच्या हुकमतींत आणून मी तुला त्या संयुक्त राज्याची मुख्य राणी करावयाला व तुझ्या हुकमतींत तुझा मांडलिक या नात्यानें दोन्ही राज्यें सांभाळावयाला माझी तयारी आहे. हे सर्व मनोरथ तडीला जाणें अथवा न जाणें आतां केवळ तुझ्यावर अवलंबून आहे." लगेच त्यानें आपल्या अंगरख्या-च्या खिशांतून एक कागद काढून तिच्या हातीं देण्यासाठीं पुढें करीत म्हटलें, "ह्या कागदावर मला तुझी स्वदस्तुरची सही पाहिजे आहे."

मीनाक्षीचें मन चंदासाहेबाविषयीं आतां मुळींच अनुकूल नव्हतें. तशांत त्यानें आपल्या सासऱ्याच्या नाशाविषयीं संतोष प्रदर्शित केला, व मेहुण्याच्या नाशाचा नवा व्यूह रचण्याच्या बेतांत तो आहे असें त्याच्या तोंडून कळतांच तर ती मनांत म्हणाली, हा मनुष्य आहे कीं राक्षस आहे? परंतु तिनें तो कागद वाचून पाहिल्यावर स्त्रीच ती, आणि ईश्वराच्या घरचा योगा-योगही तसाच होता, त्यासरसा तिला मोह पडला कीं यांतच आपलें खरें कल्याण आहे. ती तो कागद वाचूं लागली तेव्हां चंदासाहेब मशालजीच्या हातांतील मशाल आपल्या हातीं घेऊन तिच्यापाशीं उभा राहिला; व वाचतां वाचतां मधून एकदोन वेळां तिनें वर मान करून त्याच्याकडे पाहिलें तेव्हां त्यानें अशा कांहीं स्नेहपूर्ण—प्रेमपूर्ण कोमल नजरेनें तिच्याकडे पाहिलें कीं त्यासरशी मोहिनी तिच्या मनावर पडूं लागावी. पण ती आपल्या मतें फार सावधानचित्त रहाण्याचा प्रयत्न करीत होती. आपण एकवार त्या विश्वास-घातकी अविंधाच्या मायावी बोलांना व विषारी सौंदर्याला भुलून फंसलों, त्यामुळें आपल्या राज्याची—अब्रूपरी अब्रूची—सर्वस्वाची राखरांगोळी होऊन

ह्या तुरुंगवासांत कुत्र्याच्या मोतीनें आयुष्य कंठणें आपल्या नशिबीं आलें, याचा तिला विसर पडणें तर शक्यच नव्हतें. त्या अनुभवाचा उपयोग करूनच पुढें वागावयाचें हा सावधगिरीचा विसर त्या क्षणालाही तिच्या डोक्यांत घोळत होता. तशा स्थितींत तिनें तो कागद वाचला, तेव्हां आपण आजवर अविचारानें केलेल्या अक्षम्य चुकांचें अंशत: तरी परिमार्जन होण्याला हा उपाय चांगला उपयोगी पडेल व आपणाला आजवर सर्वस्वीं बुडविणाऱ्या नराधमाला यथायोग्य शासन देखील देवदया झाली तर आपण करूं शकूं अशी आशा तिला वाटूं लागली. माणसाच्या मनांतील विचाराचें प्रतिबिम्ब त्याच्या चर्येवर उमटलेलें अनेकवार आढळून येतें, व चंदासाहेबासारख्या धूर्त माणसाला तर तें अचूक ओळखतां येत असे. मीनाक्षीची समाधानवृत्ति तिच्या चर्येवर प्रतिबिम्बित झालेली तो आपल्या तीक्ष्ण नजरेनें लक्ष्यपूर्वक पहात होता. त्यावरूनच त्यानें आपल्या मनाशीं खूणगांठ मारली कीं आपलें काम झालें; भोळी राणी पुन्हां आपल्या मोहजालांत सांपडली यांत संशय नाहीं. जर राणीवर आपला पगडा बसला नाहीं तर तिचा त्याच घटकेला कडेलोट करण्याची त्याची तयारी होती, व बहुश: आपणाला त्या प्रसंगाला तोंड द्यावें लागणार अशा भावनेनें त्यानें कडेलोटाच्या कामांत निढावलेल्या बेरड शिपायांनाही आपल्याबरोबर आणलें होतें. परंतु आतां आवश्यकता नसल्यामुळें त्यानें त्या शिपायांना रजा दिली. तेवढ्यांत मीनाक्षीनें तो कागद वाचून संपविला व ती त्याची घडी करीत होती त्यावरून अंदाजून त्यानें तिला विचारलें, "माझी ही योजना तुला मान्य आहे ना ? "

दगडाखालीं सांपडलेला हात मोकळा करून घेणेंच श्रेयस्कर असतें, हा व्यवहारशास्त्रांतील सामान्य नियम मीनाक्षीला त्या वेळीं अचूक आठवला. तिनें मागील साऱ्या गोष्टी विसरून चंदासाहेबाला होकार दिला.

" तर मग त्या पत्रावर स्वाक्षरी करायला तुला कांहीं हरकत नाहींना! "

" मी एक य:कश्चित दुबळी बायको माणूस. माझ्या विनंतीला मुरारराव घोरपड्यासारखा कर्तबगार व चतुर रणझुंझार कितपत मानील याचा माझा मलाच भरंवसा वाटत नाहीं. त्यापेक्षां तुम्ही थोर, ते थोर ! तुम्ही सत्ताधीश, ते सत्ताधीश! तुम्हींच त्यांच्याशीं सालोख्याची भाषा काढली तर त्याचा जास्त उपयोग होईल असें मला वाटतें "

"खरें; पण मुराररराव घोरपडे हा उघड उघड मराठ्यांचा पक्षपाती आहे, व सर्व मराठे अर्काटच्या नबाबाचे प्रतिस्पर्धी असल्यानें स्वाभाविकपणेंच ते माझाही द्वेष करतात. ते माझ्या शब्दावर विश्वास कसा ठेवतील? तुझ्या मध्यस्थीनें त्याचा व माझा विश्वास एकवार पटला कीं मगच्या गोष्टी सोप्या आहेत. तोंवरच काय ती खरी अडचण आहे."

यावर मीनाक्षीनें जास्त आढेवेढे घेतले नाहींत. चंदासाहेबानें स्वाक्षरी करण्याचें साहित्य बरोबर आणविलेंच होतें, तें घेऊन तिनें स्वाक्षरी केली.

"या क्षणापासून तूं तत्त्वत: बंधमुक्त झाली आहेस." तो कागद काळजीपूर्वक आपल्या ताब्यांत घेऊन म्हणाला, "परंतु राजकारणाच्या दृष्टीनें तुला बंधमुक्त करण्याची वेळ अद्यापी न आल्यानें मी तुला आणखी कांहीं दिवस प्रतिबंधांत ठेवूं इच्छितों."

"म्हणजे ?" मीनाक्षीनें विस्मयचकित दृष्टीनें त्याच्याकडे पहात विचारलें, "मीं तुमचे इतके अपराध सहन करून देखील तुमच्यावर विश्वास ठेवला आणि तुमच्या हातांतील कळसूत्री बाहुलीप्रमाणें तुमच्या शब्दावरहुकूम वागल्यें, त्याचें हें फळ वाटतें !"

"मीं तुला एकवार सांगितलें ना; हें राजकारण आहे. राजकारणाचे अवघड डाव अशाच डावपेचांनीं खेळावे लागतात. तुझा नेम काय ? पुन्हां तूं माझ्यावर उलटून माझ्या शत्रूशीं सलोखा करून माझ्या नाशाचीं कारस्थानें उभारणार नाहींस कशावरून ? यास्तव तुला डरेला घालून माझ्या सर्व प्रतिस्पर्ध्यांचा मोड माझ्या हातून होईपावेतों आणि त्रिचनापल्ली, अर्काट व तंजावर ह्या तिन्ही राज्यांवर माझा एकतंत्री अंमल प्रस्थापित होईपावेतों तुझी मुक्तता होणार नाहीं."

मीनाक्षी त्या क्षणीं खवळलेल्या वाघिणीसारखी चंदासाहेबाच्या अंगावर चवताळून गेली. त्या आवेशाच्या भरांत तिनें वेळीं त्याच्या नरडीलाही हात घातला असता इतकी ती संतापली होती. पण चंदासाहेबानें तिकडे यत्किंचित् देखील लक्ष न देतां बाहेर जाऊन आपल्या सेवकांना आज्ञा केली, "कोठडीचा दरवाजा पूर्ववत् बंद करून घ्या."

शिपायांनीं त्याच क्षणीं कोठडीचा दरवाजा बंद करून त्याला कुलूप ठोकलें, व किल्ल्या चंदासाहेबाच्या हातीं दिल्या. चंदासाहेब लगेच तेथून निघून

राजवाड्यांत गेला. मीनाक्षी ह्या दैवदुर्विलासाबद्दल त्या अंधारकोठडींत दरवाजाला डोकें टेंकून कितीतरी वेळां ओकसाबोकशी रडत होती. चंदासाहेबानें आपला कांट्यानें कांटा काढण्याच्या कामीं मोठ्या धूर्तपणानें उपयोग करून घेतला असें तिला आतां कळून आलें. पण तें ठेंच लागल्यानंतरचें शहाणपण होतें. ठेंचाळण्याच्या वेदना हलक्या करण्याच्या कामीं त्याचा थोडाच उपयोग व्हावयाचा होता !

त्या यातनामय बंदिवासांत देखील निद्रा घेण्याची संवय जरी मीनाक्षीला गेल्या तीन वर्षांत झाली होती, तरी आज तिला उभी रात्र झोंप कशी ती आली नाहीं. बराच वेळपावेतों ती आपलीं पूर्वकर्मे व त्यांचे परिणाम आठवून रडत बसली असल्यानें रडून रडून तिचे डोळे सुजले होते. कधीं कधीं असेंही होतें कीं मानसिक श्रमांचा अतिरेक झाला कीं त्यांतच माणसाचा क्षणभर डोळा लागतो. तशा पहाटेच्या दोन घटका रात्रीला मीनाक्षीचा डोळा अंमळ लागतो न लागतो तोंच तिच्या कोठडीचा दरवाजा पुन्हां कोणीतरी उघडूं लागल्याचा भास तिला झाला. मीनाक्षीच्या छातींत धस्स झालें; तो काळ पुन्हां एखाद्या नव्या उपायानें छळण्यासाठीं आला कीं काय ?

तोंच दरवाजा उघडला गेला, व एक बुरखेवाली व्यक्ति हातांत एक मंद प्रकाश देणारी दिवटी घेऊन आंत प्रविष्ट झाली.

# प्रकरण ८ वें

## सातान्याकडील वर्तमान

ज्याअर्थी कर्नाटकांतील पूर्वोक्त घडामोडींना मूर्त स्वरूप प्राप्त करून देणारी सातारा एथील मराठ्यांची वर्धिष्णु साम्राज्यसत्ता ऊर्फ हिंदुपदपादशाही होय, त्याअर्थी आपणाला आतां तेथील राजकारण समजावून घेण्यासाठीं तिकडे वळणें प्राप्त आहे. त्या वेळीं सातान्यांत चाललेल्या राजकीय घडामोडीदेखील कांहीं कमी महत्त्वाच्या नव्हत्या. एक तर बाजीराव पेशव्याच्या मृत्यूनंतर सर्व शहर वास्तविक दुःखसागरांत बुडून गेलेलें असावयाचें, किंवा आतां नवीन पेशवे अधिकारारूढ होणार म्हणून सर्वत्र आनंदी आनंद दिसावयाचा. मृत पेशव्यांच्या पश्चात् नवीन पेशवा अधिकारारूढ होणार ही गोष्ट परंपरेनें ठरल्यासारखीच होती; आणि नानासाहेब पेशवे हे शाहू महाराजांचे अत्यंत आवडते, लहानपणापासूनच महाराजांच्या कटिखांद्यावर खेळलेले व अंमळ मोठे झाल्यापासून राजकारणांत मुरलेले असे असल्यानें त्यांनाच महाराज पेशवाईचीं वस्त्रें देणार याविषयीं सामान्य प्रजाजनांत मुळींच दुमत नव्हतें. परंतु इतर अनेक भानगडी ज्या राजधानींत व राजधानीबाहेर निरनिराळ्या ठिकाणीं उपस्थित झाल्या होत्या, त्यांनींच तर नानासाहेबांना पेशवाई मिळण्यांत खो पडण्याचा मुख्य संभव होता.

त्या सुमाराला कोल्हापूरकर संभाजी महाराजांचेंहि सातान्यांतच ठाणें होतें* याप्रमाणेंच राजवटीचे इतर अनेक मात्तबर सरदारहि नव्या पेशव्यांच्या अधिकारदानाच्या सोहळ्यासाठीं म्हणून सातान्यांत एकत्र जमले होते.

*सातारकर आणि कोल्हापूरकर छत्रपती यांच्या या भेटीची कांहींशी हकीगत का. सं. प. या. लेखांक ४२९ च्या शेवटच्या कलमांत देण्यांत आली आहे. कोल्हापूरकर संभाजीराजांच्या ह्या आगमनांतील हेतु जरी कोठें स्पष्टपणें उपलब्ध नाहीं, तरी याच प्रसंगीं शाहूमहाराजांच्या पश्चात् संभाजीराजांनीं गादीवर बसावें असा बारा कलमांचा गुप्त करार नानासाहेब आणि संभाजीराजे यांच्यांत झाला, तो वरील पुस्तकाचा लेखांक ४२८ मध्यें दाखल आहे.

रघूजी भोंसले आणि बाबूजी नाईक हेहि कर्नाटकांतील यशस्वी स्वारी अर्धवट टाकून व तिकडील बंदोबस्ताचा सर्व भार मुरारराव घोरपड्यांवर सोंपवून घाईघाईनें साताऱ्याकडे आले ते बाजीराव पेशव्यांचें निधन व त्यांच्या ज्येष्ठ चिरंजिवांना अर्थात् नानासाहेबांना पेशवाईचीं वस्त्रें मिळण्याची शक्यता या दोन गोष्टी ऐकूनच आले होते. भोंसले आणि नाईक यांचा निरनिराळ्या कारणांसाठीं पेशवाईवर कसा डोळा होता हें वाचकांना यापूर्वीं कळून चुकलेंच आहे. नाईक आणि भोंसले जे साताऱ्यांत आले, ते मुख्यतः त्याच गोष्टींविषयीं वाटाघाट करूं लागले. शाहू महाराजांची आवडती रक्षा लक्ष्मीबाई ही त्या दोघांना प्रथमपासूनच सामील होती आणि या त्रिकुटांत आणखी इतर चिल्हर चळवळ्यांची भर पडून नानासाहेबांना पेशवाई मिळण्याच्या विरुद्ध तो एक भयंकर गुप्त कटच उभारला गेला होता.† नाईक आणि भोंसले साताऱ्यांत येतांच त्यांची व शाहू महाराजांची प्रथम गांठ पडली आणि नानासाहेबांना पेशवाईचीं वस्त्रें देण्याविषयींचा महाराजांचा मनोदय त्यांना स्पष्टपणें कळून आला. तेव्हांपासून तर त्या राजकारणाला अत्यंत महत्त्वाचा रंग चढूं लागला. बाह्यात्कारी या मंडळींना शाहू महाराजांच्या इच्छेला विरोध जरी करतां आला नाहीं, तरी पडद्यामागून गोळ्या झाडून हा बेत फिसकटून टाकण्याचें कार्य साधण्यासाठीं ज्याची त्याची आपापल्या परी शिकस्त चालली होती. मात्र आश्चर्याची गोष्ट ही कीं लक्ष्मीबाई, नाईक आणि भोंसले यांची पेशव्यांविरुद्ध जरी गट्टी जमली होती तरी त्या तिघांचे

† नानासाहेबांना पेशवाईपद न देतां तें बाबूजी नाईक बारामतीकर यांना द्यावें, अशी खटपट बाजीरावाच्या मृत्यूनंतर रघूजी भोंसले यांनीं केली. सन १७४० त रघूजी भोंसले कर्नाटकांतील स्वारींत असतां तिकडेच बाजीरावाच्या मृत्यूची बातमी त्याला समजली. त्याबरोबर स्वारीचें काम अर्धेंच टाकून तो लगेच पेशवाईच्या खटपटीसाठीं उतावळीनें साताऱ्यास आला. नानासाहेबांना पेशवाई मिळूं नये अशी खटपट करणारांत भोंसले व नाईक यांप्रमाणेंच महाराजांच्या राण्याही सामील होत्या असें इतिहास सांगतो. रघूजी भोंसले शाहूमहाराजांचा चुलत साडू असल्यामुळें व बाबूजी नाईक हे पेशव्यांचे सावकार असल्यामुळें दोघेही ह्या पेशवाई प्रकरणीं नानासाहेबांना चांगलाच शह देऊं शकले. तो शह पुढें फळाला आला नाहीं ही गोष्ट निराळी.

अन्तस्थ कावे एकमेकांविरुद्ध आणि अगदीं निराळे असे होते. लक्ष्मीबाईला आपला वेडगळ मुलगा पुढें छत्रपति होण्याला मदत करील असाच पेशवा पाहिजे होता, व ती मदत करण्याचें वचन त्यांना बाबूजी नाईकांनीं दिलें असल्यामुळें बाबूजी नाईकांना महाराजांनीं पेशवा करावें असा तिचा महाराजांना आग्रह सुरू होता. याच्या उलट रघूजी भोंसल्यांना आपला मुलगा छत्रपति व्हावयाला हवा होता व ती गोष्ट नाईकांच्या सहाय्याविना तडीला जाणें शक्य नाहीं हें हेरून त्यांनीं नाईकांची कांस धरली होती. प्रसंग पडल्यास पेशवेपदाची झूल नाईकांच्या पाठीवर घालण्यासाठीं महाराजांपाशीं आपलें आणि आपल्या बायकोचें शक्य तेवढें वजन खर्च करण्यासाठीं त्यांनीं चंग बांधला होता. रघूजी भोंसल्याची बायको ही शाहू महाराजांची चुलत मेहुणी असल्यामुळें व शाहू महाराजांच्या कारस्थानी राण्यांना पेशव्यांचा कारभार डोईजड वाटूं लागल्यामुळें रघूजी भोंसल्यांच्या इच्छेला राणीवशांत मान्यता मिळणें मुळींच अवघड गेलें नाहीं. तात्पर्य, भोंसल्यांचा हा डाव जर साधला असता तर भोंसल्यांचा मुलगा महाराजांच्या एखाद्या आवडत्या राणीच्या मांडीवर बसवून भविष्यकाळीं साताऱचा छत्रपति झाला असता.

मात्र मौजेची गोष्ट ही कीं ह्या पक्षाचे हे बेत जसे बाहेरील जगापासून तसेच अंत:पुरांत लक्ष्मीबाईपासूनहि अत्यंत गुप्त ठेवण्यांत आले होते. यांत अत्यंत कुचंबणा कोणाची होत असेल तर ती बिचाऱ्या बाबूजी नाईकांची! भोंसले स्वत: पेशवे होणार म्हणून म्हणाले तरी त्यांना नाहीं म्हणण्याची नाईकांची छाती नव्हती. निदान मग दुय्यम कारभार तरी आपल्या हातीं येईल, व भोंसले हे शिपाईगडी असल्यामुळें आपल्यासारख्या कलमकसायाची पेशवाई—राज्यकारभारांत त्यांना अवश्य गरज लागेल, असा नाईकांचा होरा होता. भोंसल्यांचा मुलगा पुढेंमागें छत्रपति झाला तर त्यावेळीं त्या छत्रपतींच्या नांवावर सर्व राज्यकारभार आपल्याला गुंडाळून पदरीं घेतां येईल अशीहि त्यांना हांव होतीच. पण भोंसल्यांचा हा डाव नक्की साधेलच अशी नाईकांची खात्री नसल्यामुळें व विशेषत: शाहूमहाराजांचा स्त्रैणपणा§ लक्षांत घेऊन त्यांनीं लक्ष्मीबाईपाशीं पूर्ववत् संधान राखलें होतें.

§ शाहूमहाराजांना अनेक राण्या व रक्षाही होत्या हें इतिहासांत महशूर

लक्ष्मीबाईंची अट एकच, कीं आपला मुलगा भविष्यकाळीं छत्रपति व्हावा. आणि नाईकांनीं ती अट मान्यहि केली होती. दुर्दैवाची–नव्हे मराठशाहीच्या दृष्टीनें सुदैवाची गोष्ट एवढीच कीं नेहमीं बायकांच्या तंत्रानें वागणारे शाहूमहाराज ह्या पेशवेपदाच्या एका बाबतींत मात्र तितक्या ढिलाईनें वागण्याला राजी नव्हते. त्यांनीं मनांतून नानासाहेबांना पेशवाईचीं वस्त्रें देण्याचा निर्धार केला होता व इतर कारभारी मंडळींच्या विरुद्ध आग्रह परोपरीनें पडला तरीसुद्धां त्यांचा तो बेत बदलला नाहीं. त्या विरोधापासून फलनिष्पत्ति एवढीच झाली कीं पेशवाईचें अधिकारदान जें ताबडतोब व्हावयाचें तें एक दोन आठवड्यांनीं लांबणीवर पडलें.

ह्या इतर चळवळ्या मंडळींची गोष्ट सोडली तर खुद्द नानासाहेब तरी महाराजांच्या या कृपेबद्दल भरपूर स्वामीभक्तीचा मोबदला त्यांना द्यावयाला तयार होते किंवा नाहीं हाहि एक विचार करण्यासारखाच प्रश्न होता. कोल्हापूरकर संभाजी महाराजांनीं साताऱ्यांत महाराजांचे पाहुणे या नात्यानें जें ठाणें दिलें होतें तें बाह्यात्कारी भलेपणाचें द्योतक असलें तरी त्यांतील 'आन्तरः कोऽपि हेतुः' निराळा होता व तो जर कोणाला माहीत असेल तर तो एकटया नानासाहेब पेशव्यांनाच. कारण इतिहास सांगतो कीं, याच सुमाराला पेशवाईचीं वस्त्रें कोणाला द्यावीं या भानगडी राजदरबारांत जोरानें चालू असतांना व नानासाहेबांनाच पेशवाईपद द्यावयाचें असा प्रयत्न शाहू महाराज जिवाभावानें करीत असतांना नानासाहेब तिकडे कोल्हापूरकरांशीं गुप्त दोस्तीचा तह करण्यांत गढून गेले होते.*

---

आहेच. त्यांच्या राण्यांनीं राजकारणांत माजविलेले कैक अस्थानी घोटाळे इतिहासांत प्रामुख्यानें नमूद आहेत. शाहूमहाराज हे करड्या स्वभावाचे व पूर्ण कर्तव्यनिष्ठ असते तर त्यांच्या राज्यकारभारांत स्त्रीसाम्राज्य कधींच माजलें नसतें. सुदैवानें विरूबाई ही त्यांची रक्षा अत्यंत सुशील व समजूतदार होती. तिच्या हयातीपर्यंत राणीवशांतील बखेडा मराठशाहीला फारसा विघातक होऊं शकला नाहीं. पण तिच्या पश्चात् त्या बखेड्यांनीं जोरानें वर डोकें काढलें व त्या बखेड्यांच्या आगीची झळ मराठशाहीला चांगलीच भोंवली.

*ह्या महत्त्वाच्या करारनाम्याचा ओझरता उल्लेख पूर्वी करण्यांत आलाच आहे. तो करारनामा नानासाहेब व त्याचे चुलते चिमाजीआप्पा

नानासाहेबांचें कोल्हापूरकराशीं पूर्वोक्त संधान सुरू होतें याची शाहू महाराजांना अथवा इतर दरबारी मंडळींना दखलगिरी नव्हती असें नाहीं. नाईक, भोंसले वगैरे कारभारी मंडळी; त्याप्रमाणेंच महाराजांच्या राण्या आणि रक्षा लक्ष्मीबाई ही सर्व मंडळी नानासाहेबांच्या वर्तनांत न्यून सांपडतें कोठें आणि नानासाहेबांविरुद्ध महाराजांचें मन कलुषित करण्यांत त्याचा उपयोग आपण करून घेतों केव्हां यासाठीं अगदीं डोळयांत तेल घालून टपून बसली होती. प्रत्येकाचे गुप्त हेर नानासाहेबांच्या पाठीवर होते. त्या हेरांमार्फत नानासाहेब आणि कोल्हापूरकर संभाजी यांचें रहस्य जुळल्याची बातमी हां हां म्हणतां नानासाहेबांच्या प्रतिस्पर्ध्यांना कळून षट्कर्णी झाली व ती शाहू महाराजांच्या कानांपर्यंतहि गेली. महाराजांनीं या बाबतींत नानासाहेबांना बोलावून त्यांचा जाब विचारला. परंतु नानासाहेब हे अशा अनेक घडामोडींच्या प्रसंगांतून पार पडण्याच्या बाबतींत पक्के तरबेज होते. एकोणीस वर्षांच्या पोरवयांत त्यांनीं आपल्या कारवाईनें मराठयांच्या राजकारणांत पुष्कळच महत्त्व संपादन केलें होतें व म्हणूनच महाराजांचा विश्वास इतर सर्व मंडळींविरुद्ध त्यांच्याच शद्बावर बसणें क्रमप्राप्त होतें. दुसरी गोष्ट, आपणांवर एखादा आरोप येतांच त्याची निरवानिरव कशी करावी हें नानासाहेब पूर्ण ओळखून होते. त्यांनीं महाराजांना स्पष्टपणें सांगितलें,

ह्या दोघांनीं कोल्हापूरकर संभाजी राजांना लिहून दिला आहे. (का. सं. प. या. लेखांक ४२८) या करारनाम्यांतील आशय पुढीलप्रमाणें आहे. "सातारचें राज्य स्वामींचें (संभाजीराजांचें) व एकछत्री शिक्का महाराजांचा (संभाजीराजांचा) चालावा. शाहू महाराजांचा जीवात्मा आहे, तों बाह्यात्कारी आम्ही त्यांचे सेवक, परंतु अंतर्यामीं स्वामींचे. शाहूमहाराज यांनीं कैलासवास केल्यावर दोन्हीं राज्यें स्वामींचीं, आणि आम्ही सेवक स्वामींचे. स्वामींच्या आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं अशी शपथ घेतली होती. त्याप्रमाणें दोन्हीं राज्यें एक करून एकछत्री स्वामींचा शिक्का चालावा; आणि आम्हीं शाहूमहाराज यांचे कारकीर्दीप्रमाणें सेवा करून असावें, हें प्रमाण. यासी अंतर करणार नाहीं." शाहूमहाराजांच्या मृत्यूपूर्वी नऊ वर्षे पेशव्यांनीं हा ठराव संभाजीराजांशीं केला होता; आणि शाहूमहाराजांच्या मृत्यूनंतर तो पुन्हां पेशव्यांनीं ताजा करून दिला. पुढें रामराजाची स्थापना होऊन हें कारस्थान संपलें, तेव्हां पेशव्यांना हा करार पाळण्याची आवश्यकता राहिली नाहीं हें उघड आहे.

"आपण मला पेशवाईचीं वस्त्रें देणार हें ज्या मंडळींना सहन होत नाहीं त्या मंडळींनीं आपल्या कानीं माझ्याविषयीं वीष ओतण्याचा हा नवा उपाय शोधून काढला आहे."

"मग काय; तुमचा कोल्हापूरकर महाराजांशीं कांहींच संबंध नाहीं ?" महाराजांनीं आश्चर्ययुक्त मुद्रेनें विचारलें.

"नाहीं कसा ? संबंध आहे; आणि जोंवर मला इमानेंइतबारें महाराजांच्या चरणांची सेवा करून राजवटीची इभ्रत अबाधित राखावयाची आहे तोंवर राजवटीच्या सर्व शत्रुमित्रांशीं सलोखा ठेवणें मला प्राप्त आहे. महाराज मला पेशवाईचीं वस्त्रें देणार किंवा नाहीं हा प्रश्न महाराजांच्या मर्जीचा आहे. परंतु माझ्या वाडवडिलांनीं राजकारणांत जें अनुसंधान राखलें तें राखण्याला मी महाराजांच्या आजवरच्या उपकारांबद्दल उभा जन्म बांधलेला आहें. कोल्हापूरकरांचें आणि आपलें वैमनस्य मला माहीत नाहीं असें नाहीं. असें असतां मी कोल्हापूरकरांशीं ये जा ठेवतों, त्यांच्याशीं गोडी राखतों, यांतील अर्थ काय असेल हें महाराजांनींच ओळखावें. कोल्हापूरकर जे नेमके या वेळीं येथें आले ते पेशवाईवरील संकटाचा फायदा घेऊन येथल्या राजकारणांत ढवळाढवळ करण्यासाठीं आले असले पाहिजेत हें माझ्यासारख्या मुठीएवढ्या मुलानें महाराजांसारख्या मुरलेल्या राजकारणपटूला सांगितलें पाहिजे असें मुळींच नाहीं."

नानासाहेब जरी अंत:करणापासून बोलत होते तरी महाराजांच्या चर्येकडे त्यांची दृष्टि तीक्ष्णतेनें वेधून राहिली होती. मनुष्याच्या चर्येवरून त्याच्या अंत:करणांतील निगडित भावना ओळखण्यांत नानासाहेब फारच तरबेज होते आणि त्यांतल्यात्यांत महाराजांशीं पेशव्यांचा गुप्त बातमीदाराच्या नात्यानें त्यांचा नेहमींच संबंध असल्यानें* महाराजांच्या प्रत्येक हाव-

*बाळाजी विश्वनाथ पेशव्यांच्या कारकीर्दीप्रमाणेंच शाहूमहाराजांच्या कारभारी मंडळींतील इतर कारभारी पेशव्यांना कांहींसें पाण्यांत पहात असल्यामुळें आणि श्रीपतराव प्रतिनिधि वगैरे वयस्क ऋणानुबंधी कारभाऱ्यांचें शाहूमहाराजांपाशीं बरेंच प्रस्थ असल्यामुळें पेशवे नेहमीं साताऱच्या राजदरबारीं आपले प्रतिस्पर्धी कारभारी काय उलाढाली करतील याविषयीं साशंक असत. त्या उलाढालींवर नजर ठेवण्यासाठीं पेशव्यांचे गुप्त

भावाचा, प्रत्येक नेत्रकटाक्षाचा, प्रत्येक अंगविक्षेपाचा–फार काय, त्यांच्या प्रत्येक श्वासोच्छ्वासाचा गूढार्थ काय हें ओळखण्यांत नानासाहेबांचा हात धरणारा तेव्हांच्या दरबारी माणसांत दुसरा कोणी नव्हता. गोड आणि एखाद्याच्या अंत:करणाला पटेल असें भाषण बोलण्यांत आणि त्याप्रमाणेंच लेखणीनें कमालीची साखरपेर करण्यांत नानासाहेबांनीं इतर कसलेल्या कलमबहाद्दरांना व वाचानिपुणांना हार खावयास लाविलें होतें. एखादा निष्णात वैद्य ज्याप्रमाणें रोग्याच्या मुखचर्येवरून त्याच्या रोगाची चिकित्सा करून योग्य ती उपाययोजना करितो त्याप्रमाणेंच नानासाहेब महाराजांच्या नुसत्या हालचालीवरून त्यांच्या मनांतल्या गुप्त गोष्टी सहज ओळखूं शकत व तशा प्रसंगीं महाराजांना पटेल तेंच बोलून किंवा करून महाराजांची मर्जी अधिकाधिक संपादन करीत असत. आजहि त्यांनीं तसेंच केलें. महाराजांना आपलें बोलणें पटूं लागलें असें पाहतांच त्यांनीं आणखी एका पाऊलानें पुढचा पल्ला गांठला, "ओघाला आलें म्हणून बोलणें प्राप्त झालें; महाराजांना पुत्रलाभ व्हावा व मराठेशाहीची भरभराट व्हावी अशी मंगल इच्छा मनांत बाळगणारे महाराजांच्या जिव्हाळ्याच्या मंडळींतहि सध्या फारच थोडे. कोणाची पेटे दाढी आणि कोण पेटवी विडी या न्यायानें नाईक काय, भोंसले काय आणि * * * पण महाराजांच्या राणीवंशांतील स्त्रिया मला मातेसमान पूज्य आहेत, त्यांच्यावर कृष्णकारस्थानाचा आरोप करून मी माझ्या बाल-पणाला दोष लावूं इच्छित नाहीं. त्या चुका झाल्या तरी राण्यांच्या अथवा महाराजांच्या प्रियतमांच्या आहेत व त्या चुकांबद्दल त्यांना दोष देणें म्हणजे अप्रत्यक्षपणें महाराजांनाच दोष देणें होय असें मला वाटतें, म्हणून मी बोललों हे शब्द देखील माघारे घेतों व भलतेच शब्द तोंडावाटे निघाल्याबद्दल महाराजांची दोन्ही हात जोडून क्षमा मागतों." असें म्हणून नानासाहेबांनीं महाराजांना हात जोडून आपलें मस्तक त्यांच्या पायांवर नम्र केलें.

---

दूत सातारला व अन्यत्रही पसरलेले असत. नानासाहेब हे त्यांपैकीं एक दूत-प्रमुख बातमीदार असून लहानपणापासून त्यांनीं सातान्यांत ठाणें दिलें होतें. त्यांनीं बालवयांतही आपलें अनुसंधान राखण्याचें काम बेमालूम केलें व आपल्या डावपेचांनीं शाहूमहाराजांची मर्जी संपादन केली. तीच पुढें त्यांना पेशवाईपद मिळण्याच्या कामीं उपयोगी पडली.

महाराजांनीं लगेच म्हटलें, “ तुम्ही इतके कचरतां कां ? आम्ही तर म्हणतों कीं तुम्हांला आमच्या घरोब्यामुळें आमच्या राण्यांचीच काय पण आमची देखील चूक दाखविण्याला पूर्ण मुभा आहे. तुमच्या कानीं जें काय आलें असेल तें स्पष्ट बोलून दाखवा. ”

“ परंतु राजवटीची कारभारी मंडळी ही मला माझ्या तीर्थरूपांच्या ठायीं पूज्य आहेत. त्यांच्याविषयीं उणेदुणे बोल मीं बोलावे तरी कसे ? माझ्या-सारख्यानें लहान तोंडीं मोठा घांस घेणें बरें नव्हे ! ”

नानासाहेबांच्या पूर्वीच्या भाषणांत जो धूर्तपणा प्रतिबिंबित झाला होता तो या भाषणांतही होता. पहिल्या वेळीं त्यांनीं आपल्या एका वाक्याच्या फटकाऱ्यासरसे महाराजांच्या राण्या व लक्ष्मीबाई यांच्याविषयीं प्रामाणिक मताचे विषबिंदु महाराजांच्या मनांत ओतले व या दुसऱ्या वाक्यानें कारभारी मंडळीविषयीं भलताच किंतु त्यांच्या मनांत आणून दिला. महाराजांना त्यांचे हे डावपेंच कळणें शक्यच नव्हतें. त्यांनीं जास्त आग्रहपूर्वक सर्व खरा प्रकार काय आहे तो स्पष्ट करण्याबद्दल नानासाहेबांना सांगितलें. नानासाहेब नाहीं नाहीं म्हणून विनयाच्या लटक्या आविर्भावानें उत्तर देण्याची टाळाटाळ करूं लागले, तेव्हां महाराजांनीं आपुलकीनें संतापून त्यांना स्पष्ट सांगितलें, “असले मनदुबळे पेशवे आम्हांला नको आहेत. आमच्या सारख्यांचें छत्र शिरीं असतां घरच्या गुन्हेगारांचे गुन्हे प्रत्यक्ष आमच्यापाशीं–राजवटीच्या धन्यापाशीं बोलून दाखवावयाला ज्याला धीर होत नाहीं असला बावळट मनुष्य उद्यां पेशवा होऊन मोठमोठीं राजकारणें काय तडीला नेणार ? ”

असें म्हणून महाराज नानासाहेबांकडे पाठ फिरवून रागानें अंमळ गप्प बसले.

# प्रकरण नववें

# साताऱ्याविषयीं आणखी थोडें.

आपल्यावर ही इष्टापत्तीच कोसळली असें नानासाहेबांना वाटलें. त्यांनीं त्या संधीचा फायदा घेऊन भोंसले,नाईक,उभयतां राण्या व लक्ष्मीबाई यांच्या कारस्थानाविषयीं शाहू महाराजांची जितकी म्हणून खात्री करणें शक्य होतें तितकी करण्याला कमी केलें नाहीं. सुक्याबरोबर ओलेंहि जळतें या न्यायानें प्रतिनिधींवरहि त्यावेळीं त्यांनीं चार शिंतोडे उडविले. पण ते फार सौम्यपणाचे होते. कारण एक तर प्रतिनिधि हे शाहूमहाराजांच्या गळ्यांतील ताईत. त्यांना दुखविणें म्हणजे प्रत्यक्ष शंकराच्या दर्शनाला जाऊन नंदीला लाथा मारण्यासारखेंच होतें. दुसरें असें कीं प्रतिनिधींनीं या वेळीं तरी पेशव्याची बाजू उचलून धरली होती. यांतहि प्रतिनिधींचा कांहीं कावा नसेल असें नाहीं. त्यांना मनांतून असें वाटत असावें कीं नाईक किंवा भोंसले असला परका मनुष्य पेशव्यांच्या गादीवर येऊन डोईजड होऊन बसण्यापेक्षां नानासाहेबांसारखा कोवळा तरुण पेशवा झाल्यास तो शक्य तों आपल्या तंत्रानें चालूं लागेल व त्याला आपल्या मुठींत ठेवणें आपणाला सोपेंहि जाईल.*

असो. महाराजांच्या मनावर ह्या स्पष्टीकरणाचा संभाव्य तोच परिणाम झाला. त्यांनीं नानासाहेबांना पुन्हां वचन दिलें, "हीं पेशवाईचीं वस्त्रें कांहीं झालें तरी तुमच्याशिवाय अन्य कोणालाही आम्ही देणार नाहीं." त्याबरोबरच त्यांनीं इतर अनिष्ट गोष्टींचा बंदोबस्त करण्याचें ठरवून त्या

*थोरल्या बाजीराव पेशव्यांना श्रीपतराव प्रतिनिधींनीं प्रसंगीं राष्ट्रकार्याची हानि करूनहि कसा जबरदस्त विरोध केला हें इतिहासांत महशूर आहेच. थोरल्या बाजीरावांच्या पश्चात् पेशवे आणि प्रतिनिधि यांच्यामधील ही तेढ तात्पुरती तरी मिटण्याचें कांहींच कारण नव्हतें. परंतु ती तेव्हां तशी मिटली गेली व श्रीपतरावांनीं त्या वेळेपुरता नानासाहेबाच्या पक्षाचा अंगिकार केला. यांतील हेतु वर निर्दिष्ट केला आहे त्यापेक्षां निराळा असणें मुळींच संभवनीय नाहीं.

चौकशीची जबाबदारी नानासाहेबांवरच टाकली. असे दिवसांमागून दिवस लोटतां लोटतां अखेर महाराजांनीं आपल्या कारभाऱ्यांच्या संमतीनें नानासाहेबांना पेशवाई बहाल करण्याचा शुभ दिवस मुक्रर केला. नाइकांनीं अखेरचा रामबाण उपाय म्हणून पेशव्यांकडे असलेली आपली जुनी कर्जाऊ रक्कम एकदम मिळविण्याविषयीं नेमका त्याच वेळीं तगादा लावला. परंतु प्रतिनिधींसारख्या प्रौढ मंडळींनीं मध्यें पडून ऐन वेळीं नानासाहेबांना जरूर तें आर्थिक साहृय करून नाइकांचा तोहि डाव हाणून पाडला. नाइकांना कर्ज परत मिळालें; पण दरबारीं त्यांची जी फजीति झाली तिची भरपाई त्या कर्जाच्या रकमेच्या अनेक पटींनींहि होऊं शकली नसती. अखेर एकदांचें ठरले दिवशीं नानासाहेबांना भर दरबारांत महाराजांनीं पेशवाईपद दिलें व वस्त्रें अर्पण केलीं. त्या समारंभाला कोल्हापूरकर संभाजी राजे व दरबारांतील इतर मातबर मंडळीदेखील हजर होती. परंतु तो त्यांचा केवळ जुलमाचा रामराम होता. संभाजी राजे मात्र नानासाहेबांच्या अन्तःकरणाची आणखी एकवार ओळख पटवून घेण्यासाठीं कदाचित् त्या ठिकाणीं हजर असतील

महाराजांनीं पेशवाईचीं वस्त्रें नानासाहेबांना अर्पण करतांना त्यांना कळकळीचा उपदेश केला, “नाना, तुमच्या आजोबांनीं आणि वडिलांनीं राजवटीची अमोल सेवा करून राजवटीची भरभराट व स्वतःची अपरंपार कीर्ति यांचा यशोदुंदुभि हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत दुमदुमता केला आहे; त्यांचेच पुत्र तुम्ही आहांत. तुमच्या घराण्याचा आणि आमचा आज तीन पिढ्यांचा ऋणानुबंधाचा संबंध आहे. तो संबंध चिरकाल टिकवून गादीची इमानेंइतबारें सेवा करणें व राष्ट्राच्या आबादानीसाठीं आजोबा आणि तीर्थरूप यांच्या पावलांवर पाऊल टाकून झटणें हें तुमचें कर्तव्य आहे. तुम्ही पोरवय म्हणून इतर मातबर मंडळींनीं तुमची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष उपेक्षा केली असली तरी ती तुम्हीं मुळींच मनावर घेऊं नये. त्यांना तुमची खरी पारख असणें शक्य नाहीं. कारण त्यांचा तुमचा तेवढा सहवास नाहीं. आणि दुसरें, त्यांनीं जो थोडाफार विरोध केला असेल तो केवळ महाराष्ट्राची आबादानी इच्छूनच केला असेल.”

नाइक, भोंसले वगैरे मंडळी त्या दरबारांत हजर होतीच. त्यांची कारवाई त्यांच्याच मनाला खात होती. ते मनांत ओळखून चुकले होते कीं शिमगा

जातो आणि कवित्व राहतें त्याप्रमाणें पेशवाई आपल्या हातची गेली आणि आतां नानासाहेबांना आपण केलेल्या विरोधाचें कवित्व तेवढें शिल्लक राहणार. आजवर नानासाहेब ही एक उपेक्षणीय व्यक्ति आहे असें ते मानीत होते. परंतु इतक्या कारवाईंतूनहि नानासाहेबांनीं धिम्मेपणानें मार्ग काढून पेशवाई संपादन केली या एकाच गोष्टीवरून त्यांच्या चारित्र्याची व कर्तबगारीची ओळख इतरांना पटण्यासारखी होती. आणखी असें कीं हें सर्पाचें पिल्लूं मोठें झाल्यावर संधि साधून दावा धरून आपला कधीं चावा घेईल याविषयींहि विरोधी मंडळींना भरंवसा वाटत नव्हता. महाराजांनीं तरी त्यावेळीं सामोपचाराचे जे उद्‌गार काढले ते 'रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति' याच न्यायानें काढले. त्याबरोबर नाइक घाईनें आपल्या बसल्या जागेवरून उठून महाराजांना हात जोडून म्हणाले, "महाराज अगदीं आमच्या मनांतली गोष्ट बोलले. नानासाहेबांना पेशवाई मिळण्याच्या बाबतींत मीं व भोंसले यांनीं विरोध केला असें जगाला दिसलें खरें. पण त्याच्या मुळाशीं कोणती भावना होती हें सहजासहजीं कोणाला कळणें शक्य नाहीं. नानासाहेबांना पेशवाईचीं वस्त्रें मिळूं नयेत असाच केवळ आमचा हेतु नव्हता. राज्याची आबादानी तर आमच्या ध्यानीं होतीच. पण त्यापेक्षांहि महत्त्वाची अशी एक भीति आम्हांला होती ती ही कीं साऱ्या कारभारी मंडळींत पेशव्यांच्या विरुद्ध जें काहूर उठलें होतें व जें अजूनही आहे त्याचा निरास करून देण्याचें काम आमच्यासारख्यांशिवाय दुसऱ्या कोणाच्या हातून आणि तेंहि असे डावपेच लढविल्याशिवाय तडीला जाणें शक्यच नव्हतें." आपण कितीहि बोललों तरी ऐनवेळीं कर्ज परत मागून पेशव्यांची अडवणूक करण्याचा प्रयत्न जो आपण केला त्याचें समर्थन होणें शक्य नाहीं हें मनांत पक्कें माहीत असतांहि फाजील आशावादित्वाला बळी पडून ते पुढें म्हणाले, "आम्ही पेशव्यापाशीं ऐनवेळीं कर्जाची मागणी केली ती तरी पेशव्यांचें आणि आमचें एकमत नाहीं असें पेशव्यांच्या विरोधकांना भासवून त्यांच्या पोटांतील काळेबेरें काढून घेण्यासाठींच होय. आणखी असें कीं नवीन पेशवा गादीवर आल्याक्षणापासूनच कर्जबाजारी असावा ही गोष्ट जितकी पेशव्यांना लांछनास्पद आहे, त्यापेक्षांहि त्यांचे निरंतरचे हितकर्ते या नात्यानें मलाहि लांछनास्पदच आहे."

नाइकांची चर्पटपंजरी अशीच आणखीही कांहीं वेळ चालूं शकली असती,

परंतु इतर दरबारी लोकांना ती ऐकावयाला नको आहे असें अंदाजून त्यांनीं स्वतःच आपलें भाषण आवरतें घेतलें. लगेच भोंसल्यांनींहि उठून आपल्या परीनें आपल्या उपद्व्यापांचें लंगडें समर्थन केलें. परंतु त्याचाहि कोणाचे मनावर फारसा परिणाम झाल्याचें आढळून आलें नाहीं. नानासाहेब लगेच उठून महाराजांच्या उद्‌गारांवर उत्तरादाखल बोलले, "महाराजांनीं अत्यं कृपाळू होऊन माझ्या वाडवडिलांचें पेशवाईपद मजकडेच चालविलें याबद्दल मी महाराजांचा जन्मोजन्मीं ऋणी आहें. मला या अधिकारप्राप्तींत व्यक्तिशःवैगुण्य वाटत असेल तर तें एवढेंच कीं वंशपरंपरेनें ही पेशवाई माझ्याकडे येत आहे, त्यापेक्षां मला अगोदर राजवटीची सेवा करण्याची संधि मिळून त्या पराक्रमाच्या जोरावर जर मला हें यश संपादन करतां आलें असतें तर मी स्वतःला आजच्या पेक्षांही धन्य समजलों असतों."

नानासाहेबांचें पुरतेपणीं बोलून झालें नाहीं तरीही खाई त्याला खवखवे या न्यायानें नाईक आणि भोंसले यांच्याच्यानें स्वस्थ राहवेना. ते एक-मेकांच्या कानांशीं लागून कांहींतरी पुटपुटले आणि लगेच नाईक आपल्या बैठकीवरून उठून नम्रतापूर्वक महाराजांना म्हणाले, "हीच आमचीदेखील इच्छा होती. पेशवाईपद मला किंवा भोंसल्यांना कोणालाहि प्राप्त झालें असतें तरी तें पेशव्यांच्या वतीनें तारण म्हणूनच आम्हीं रक्षण करणार होतों. मग पेशव्यांनीं आतां इच्छिल्याप्रमाणें स्वतः पराक्रम गाजवून तें पद संपादन केलें असतें तर त्यांच्या शत्रूलाहि त्यांच्याविरुद्ध तोंडांतून ब्र काढण्याला अवसर मिळाला नसता."

नाइकांना पुरतेपणानें बोलूं न देतां महाराज मध्येंच म्हणाले, "नाना-साहेबांच्या कर्तबगारीची ओळख आम्हांला पूर्ण आहे. म्हणूनच आम्हीं कोणाच्या विरोधाला न जुमानतां त्यांना पेशवे नेमलें आहे."

नानासाहेबांना दुधांत साखर पडावी त्याप्रमाणें महाराजांच्या आतांच्या उद्‌गारांनीं पूर्वींच्याहून जास्त आनंद झाला. आणि तो त्यांनीं यथोचित् शब्दांत व्यक्तहि केला. याविषयीं त्या बैठकींत कोणाला विशेष आश्चर्य वाटलें असेल तर तें कोल्हापूरकर संभाजी राजांना. त्यांना हेंच कळेना कीं या माणसाला परमेश्वरानें दोन अंतःकरणें दिलीं आहेत कीं कसें ? कीं याचे दाखवावयाचे दांत निराळे आणि खावयाचे निराळे आहेत ? त्यांना भय

वाटत होतें याचें कारण नुकतेंच नानासाहेबांनीं त्यांच्याशीं परस्पर गुप्त दोस्तीचा तह केला होता, व त्या तहांत आपण यावज्जन्म सेवक स्वामींचे (संभाजी महाराजांचे) असून वरपांगी आपणाला शाहू महाराजांची सेवा करणें प्राप्त आहे, असें म्हटलें होतें. या उद्गारावर विश्वास ठेवूं जावें तर नानासाहेबांचें आतांचें आचरण त्या उद्गारांशीं पूर्णपणें विसंगत होतें. तरी पण त्यांतल्यात्यांत संभाजीराजांना जिवाचा विरंगुळा करतां आला तो एवढाच कीं, नानासाहेबांनीं आपल्याशीं केलेल्या कारारनाम्यांत शाहू महाराजांशीं स्वतःची वागणूक केवळ वरपांगीपणाची राहील असें जें म्हटलें आहे त्याचेंच प्रतिबिंब हें त्यांचें वर्तन नसेल कशावरून ! नानासाहेबांनीं कांहीं महिन्यांपूर्वीं राजकारणांत पुढाकार घेऊन थोरल्या बाजीराव साहेबांना—प्रत्यक्ष आपल्या पित्याला घरगुती भांडणांत कसें धाय मोकलून रडावयाला लावलें, आणि त्या महापुरुषाला आपल्या पुत्राच्या कारस्थानासमोर हार जाऊन कसें परागंदा व्हावें लागलें, ही गोष्ट तेव्हां जगजाहीर होऊन चुकली होती. थोरामोठ्यांच्या घरच्या गोष्टी म्हणून लोक उघडपणें नानासाहेबांची चूक बोलून दाखविण्याला धजत नसत. पण मनांत ते ओळखून होते कीं हें सर्पाचें पिल्लूं आहे; व्यक्ति सामान्य नाहीं. ते प्रतिस्पर्ध्यापैकीं कोणाचा कधीं व कसा निकाल करतील याचा कांहीं नेम नाहीं. प्रत्यक्ष पित्याविषयीं जर नानासाहेबांची वर्तणूक अशी, तर राजाला ते काय जुमानणार, हें संभाजी महाराज ओळखून होते. तरी पण त्यांना असेंहि वाटत होतें कीं पेशव्यांनीं आपल्याशीं जो गुप्त तह केला आहे, व त्या तहान्वयें सातारा आणि कोल्हापूर ह्या दोन्ही गाद्यांचें एकीकरण करून त्याची मालकी छत्रपति या नात्यानें आपणाकडे देण्याचें जें गर्भितपणें सूचित केलें आहे, त्यांत त्यांचा स्वतःचा स्वार्थ एवढा मोठा जबरदस्त आहे कीं त्याच्या सिद्धीसाठीं तरी त्यांना आपल्याशीं इमान राखलेंच पाहिजे. नानासाहेबांना सातारा, कोल्हापूर ह्या संयुक्त मराठी साम्राज्याचा सर्वाधिकारी पेशवा बनावयाचें आहे, व तेवढ्यासाठीं आपल्या मार्गांतील शाहू महाराज ही बोलतीचालती प्रचंड धोंड युक्तीनें बाजूला लोटून देण्याला ते कमी करणार नाहींत, एवढा संभाजीराजांनीं त्या करारनाम्याचा निष्कर्ष काढला होता. या मनोमनच्या विचारांनीं त्यांचें त्याच क्षणीं परस्पर समाधान झालें; आणि कांहीं किंतु उरला असल्यास तो नाना-

साहेबांची त्यांच्याशीं दृष्टादृष्ट होतांच दूर झाला. नजरेला नजर भिडली आणि मुके बोल बोलून गेली कीं, हा सारा घेतल्या सोंगाचा साजरेपणा आहे. संभाजी राजे तें सारें नानासाहेबांच्या चर्येवरून ओळखून चुकले व त्यांनीं तसें समाधानपूर्वक आपल्या दृष्टिक्षेपानें नानासाहेबांना भासविलेंहि !

पेशवाईपद कोणाला द्यावयाचें या निमित्तानें सातारा राजधानींत उठलेलें वादळ अशा रीतीनें शांत झालें व आपापल्या डावपेंचांत पराभूत झालेल्या प्रतिस्पर्ध्यांना–विशेषत: नाईक आणि भोंसले यांना आतां तेथें राहण्यांत स्वारस्य वाटेनासें झालें. त्यांतूनहि ती मंडळी दुधाच्या हंड्यांत मिठाचा खडा टाकून आपल्या वैयक्तिक हट्टासाठीं राष्ट्राचा कार्यनाश करण्याला भिणारी नव्हती. किंबहुना तसे त्यांचे प्रयत्न सुरूच होते. परंतु आणखी एका विचित्र योगायोगामुळें आपोआपच त्यांच्या कृष्णकारस्थानाच्या चालत्या गाड्याला खीळ पडली. त्या विचित्र योगायोगाचें स्पष्टीकरण पुढें होणार आहेच.

# प्रकरण १० वें

# दोन अभागिनी

मीनाक्षी राणी त्या बुरखेवाल्या व्यक्तीला पाहून एकदम दचकून भयचकित अन्तःकरणानें त्या कोठडीच्या एका कोपऱ्यांत अत्यंत सावधपणानें उभी राहिली व तिनें खदिरांगाराप्रमाणें लाल झालेल्या दृष्टीनें समोर पहात त्या व्यक्तीला कठोर प्रश्न केला, " कोण तूं ? "

ती बुरखेवाली व्यक्ति कांहीं न बोलतां स्तब्धपणें क्षणभर तशीच उभी राहिली. तें पाहून जास्त संशय आल्यामुळेंच कीं काय त्या व्यक्तीवर झडप घालण्याच्या हेतूनें मीनाक्षी राणीनें दोन पावलें पुढें सरून पूर्वीपेक्षांहि कठोर स्वरांत पुन्हां विचारलें, " कोण तूं ? बोलत कां नाहींस ? तुझी ही स्तब्धताच तुझ्या पापी अन्तःकरणांतील दुर्विचारांची साक्ष देत आहे. "

ती बुरखेवाली व्यक्ति न डगमगतां पवित्र्यावर उभी राहून निस्पृहपणें उद्गारली, " अभागी राणी, ज्याला त्याला आपल्यासारखेंच सारें जग दिसतें. पण तूं एवढें ध्यानीं ठेवलें पाहिजेस कीं ह्या त्रिचनापल्लीची एक राणी कपाळकरंटी निघाली, तिनें आपल्या बद्चालीनें आपल्या राज्याचा सत्यानाश केला आणि विषयवासनेला बळी पडून हिंदुत्वविध्वंसक अविधाचीं पदलांछनें या मातृभूमीच्या मस्तकीं उमटविलीं म्हणून या राज्यांतील प्रत्येक स्त्री तशीच स्वाभिमानशून्य आणि पशुवृत्तीची आहे असें तुला समजण्याचें कारण नाहीं. " त्या व्यक्तीला आणखीहि कांहीं बोलावयाचें होतें. परंतु संतापातिरेकानें तिचा कंठ दाटून आल्यामुळें ती एकाएकीं स्तब्ध राहिली.

तारतम्यज्ञानानें मीनाक्षी राणीनें ओळखलें कीं आपणासमोरील बुरखेवाली व्यक्ति स्त्री आहे. तेवढ्यानेंच अंमळ तिच्या मनाचा विरंगुळा झाला. आतां त्या बुरखेवाल्या स्त्रीचे ते बोल अत्यंत अपमानकारक होते हें तर खरेंच, व ते ऐकून सामान्य परिस्थितींत कोणालाहि चीडच आली असती. मग प्रत्यक्ष मीनाक्षी राणीला चीड आली असल्यास नवल नाहीं. तरी पण

सत्याचें तेज आणि सामर्थ्य हें कधींहि असत्याच्या काळवंडलेल्या छायेखालीं झांकलें जात नसतें. मीनाक्षी राणीनें त्या व्यक्तीच्या उद्‌गारावरून एवढें ओळखलें कीं ती स्त्री असावी; आणि म्हणूनच तिच्या उद्‌गाराचें राणीला वैषम्य वाटावयाचें बाजूला राहून उलट कौतुक वाटलें. एवढें मात्र खरें कीं राणीचें अंतःकरण पश्चात्तापाच्या प्रायश्चितानें पावन झाल्यामुळेंच विश्वांतील सत्य, शिव आणि सुंदर कोणतें हें ओळखण्याइतकी माणुसकी तिच्या ठायीं उत्पन्न झाली होती. ती गंभीर स्वरानें त्या स्त्रीला म्हणाली, " बाई, तुम्ही कोणीहि असा. पण तुमचे आत्मविश्वासाचे बोल ऐकून माझ्या मनाला अत्यंत संतोष वाटला कीं अशी एक तरी पुण्यशील स्त्री माझ्या राज्यांत आहे, आणि तिच्या पुण्याईच्या बळावरच माझ्या पापांच्या परवडी नाहींशा होऊन माझ्या देशाला आणि माझ्या धर्माला कांहीं बरे दिवस येण्याची आशा आहे. "

राणीच्या मनांतून त्या बुरखेवाल्या स्त्रीशीं पुढें बोलावयाचें होतें. पण एक घाव दोन तुकडे करावेत त्याप्रमाणें ती स्त्री मध्येंच वीज कडाडल्याप्रमाणें उद्‌गारली, " तुझा देश आणि तुझा धर्म—अभागी राणी, आपलें जीवनसर्वस्व तूं त्या राक्षसी अविंधाच्या पायीं अर्पण करून आपल्या राज्याला, पावित्र्यापरी पावित्र्याला, लौकिकापरी लौकिकाला, धर्मापरी धर्माला आणि अब्रूपरी अब्रूला—सर्वस्वाला गमावून बसली आहेस. तुझ्यासारख्या पापिणीला देवाधर्माचा उच्चार करण्याचा तरी काय अधिकार पोंचतो ? इतकेंच काय पण तूं जरी बाह्यात्कारी पश्चात्तापाचे बोल बोलून दाखविलेस तरी या क्षणीं तुझ्या अन्तःकरणांत आपल्या देशाचें व आपल्या धर्माचें वाटोळें करण्याचा घातकी विचार ठाणें देऊन बसला आहे याची मला पूर्ण जाणीव आहे. "

" त्याला ईश्वर साक्ष आहे. "

"ईश्वर कशाला? त्याला तुझें अन्तःकरण साक्ष आहे. विश्वासघातकी स्त्रिये, आतांच कांहीं प्रहरांपूर्वीं तूं आपल्या राज्याच्या,—आपल्या धर्माच्या मानेला नवा फांस लावला नाहींस काय ? " मध्येंच ती स्त्री क्षणभर गप्प राहून राणीच्या मुखाकडे पाहूं लागली. राणी त्यावर कांहीं बोलेना, तेव्हां लगेच ती व्यक्ति पुन्हां म्हणाली, " आतां बोलावयाला तुला लाज कां वाटते ? बोल, थोडचा वेळापूर्वीं तूंच मुरारराव घोरपडयांना गोत्यांत आणून मराठयांच्या ह्या प्रांतांतील स्वराज्यविषयक दीर्घोद्योगाचा फडशा करण्याच्या कामीं

त्या नीच चंदासाहेबाला सामील झाली नाहींस काय? बोल—मला या क्षणीं ह्या प्रश्नाचें उत्तर पाहिजे आहे. तूं विचारशील कीं ह्या आगळकीबद्दल मला जाब विचारणारी तूं कोण ?—तर मी आतांच सांगून ठेवतें, ज्या ज्या ठिकाणीं मानवांनीं निर्माण केलेले कायदे हे परमेश्वरी सत्याच्या शाश्वतीला बाध आणूं पाहतात आणि सृष्टीवर परोपरीच्या हिडीस पापांची परवड रचूं लागतात त्या त्या वेळीं सत्याचा जय करून मानव जातीला शक्य तों सुखांत लोटण्यासाठीं—मानवी अत्याचारांना आळा घालण्यासाठीं स्वयंस्फूर्तीनें पुढें येणें हें प्रत्येक स्त्री–पुरुष नागरिकाचें पवित्र कर्तव्य असतें. तें कर्तव्य बजावण्यासाठीं पुढें आलेली मी एक ह्या अभागी देशाची नम्र सेविका आहें. तुला कदाचित् वाटेल कीं चंदासाहेबाचा या त्रिचनापल्लींत एवढा जबरदस्त दरारा असतांना आणि हिंदूंना एक रेंसभरहि डोकें वर काढावयाला या बेबंदशाहींत वाव नसतांना चंदासाहेबाच्या अधिकाराला लाथाडून इतक्या निधडचा छातीनें मी पुढें कशी येतें ? मला शासनाचें भय कसें वाटत नाहीं ? तर त्याचें उत्तर मीं आधींच देऊन ठेवत्यें, अभागी स्त्रिये, एवढा चवदा चवकडचांच्या राज्याचा धनी रावण पण तो सत्याला लाथाडून सत्तेच्या जोरावर अनन्वित अत्याचार करूं लागला आणि प्रत्येक जीवाला त्याच्या अत्याचारामुळें दे माय धरणी ठाय होऊन गेलें; त्यावेळीं त्याचा नाश करण्यासाठीं परमेश्वरानें यःकश्चित् वानरांच्या बाहूंमध्येंही वज्रदेही वीराग्रणींचें सामर्थ्य उत्पन्न केलें, आणि श्रीरामांनीं त्या सामर्थ्याच्या जोरावर सत्याच्या मार्गानें त्या रावणाला धुळीला मिळवून देशाचें दास्य लयाला नेलें. पुराणांतरीं अशा मदांध राजांचा शोककारक शेवट झाल्याचीं ढळढळीत उदाहरणें असतांना मला त्याच सत्याच्या मार्गानें जातांना भय कोणाचें ?" बोलतां बोलतां त्या बुरखेवाल्या स्त्रीनें आपला बुरखा बाजूला सारून आपल्या कमरपट्ट्यांतील जंबिया सर्रकन् बाहेर काढीत राणीला विचारलें, "पण त्या अवांतर गोष्टी बोलण्याची ही वेळ नव्हे. मीं आतां विचारलें त्याचा मला या क्षणीं स्पष्ट खुलासा पाहिजे आहे."

"तुम्हाला कसला खुलासा पाहिजे आहे ?" राणीनें त्या स्त्रीच्या चेहऱ्याकडे निरखून पहात भयभीत चित्तानें विचारलें. ती एक सुमारें अठरा वर्षांची गौरवर्ण व नितान्तसुंदर अशी युवति होती. तिच्या लावण्यानें राणीदेखील

क्षणभर स्तिमित झाली. मग तें लावण्य अन्य ठायीं पुरुषी जगांत अत्यंत प्रभावशाली ठरत असेल यांत नवल काय? त्या युवतीच्या ललाटाकडे राणीनें सहज पण लक्षपूर्ण न्याहाळून पाहिलें तेव्हां तेथें कुंकुमतिलक झळकत असलेला तिला स्पष्ट दिसून आला. तो पाहून राणी पुढें म्हणाली, "मुली, तूं हिंदू आहेस; मग तुला अशा वेळीं ह्या धोक्याच्या जागीं येण्याची वासना कां बरें झाली?"

"माझ्या देशाच्या आणि धर्माच्या कल्याणासाठीं, त्याप्रमाणेंच माझ्या देशाच्या आणि धर्माच्या शत्रूचें निर्दालन करण्यासाठीं पुढें पाऊल टाकतांना मला साक्षात् कळिकाळाचेंहि भय वाटत नाहीं."

"मुली, तुला चंदासाहेबाच्या राक्षसी स्वभावाची कल्पना नाहीं म्हणून तूं निर्भयपणें असें बोलूं शकतेस. पण प्रत्यक्ष माझें उदाहरण पहा! स्वतःच्या चारित्र्यावर विसंबून राहणारी व बुद्धिबळाच्या पटावरील मोहऱ्यांप्रमाणें दूर देशच्या राजकारणी पुरुषांना खेळविण्याची ईर्षा बाळगणारी, ही या त्रिचनापल्लीची अभागी मीनाक्षी राणी त्या चांडाळाच्या मोहपाशांत सांपडून फंसून कशी बापुडवाणी बनली आहे पहा!"

ती युवति इतक्या वेळांत मीनाक्षीराणीच्या सौजन्यपूर्ण वर्तनानें जरा समाधान पावून किंचित् बहुमानपूर्वक उद्‌गारली, "पण राणीसाहेब, मीं मघाशींच आपल्याला सांगितलें ना; कीं ह्या देशांतील सर्वच स्त्रिया राणी मीनाक्षीसारख्या दुबळ्या अन्तःकरणाच्या नाहींत. कदाचित् असाहि योगायोग असेल कीं आपल्यासारख्या भल्या साध्वीला ज्या चंदासाहेबानें विश्वासघातानें फंसवून स्वतःचा डाव साधला, त्याला त्याच्या पापाचें प्रायश्चित्त देण्यासाठींच परमेश्वरानें मला जन्माला घातलें नसेल कशाकरून?"

"तसें असेल तर मी म्हणेन कीं जगामध्यें अजून परमेश्वर आहे, व सुष्टांचें पालन आणि दुष्टांचें निर्दालन करून सृष्टीचें यथान्याय नियंत्रण करण्याचें सामर्थ्य अजून त्याच्या अंगीं आहे."

त्या तरुणीचें अंतःकरण राणीच्या ह्या उद्‌गारांमुळें आणखी द्रवलें. तिनें आपला जंबियाचा हात किंचित् मागें घेतला. तिचा संतापहि थोडा ओसरला आणि कंठ सहानुभूतीच्या गद्‌गद् भावनेनें दाटून आला. त्यामुळें ती अम्मळ घोगऱ्या स्वरानें राणीला म्हणाली, "राणीसाहेब, मी ज्या कठोर निश्चयानें

या ठिकाणीं आलें तो माझा निश्चय प्रत्यक्ष तुम्हांला पाहून आणि तुमचे कळकळीचे बोल ऐकून बराच पालटला आहे. पण ईश्वर करितो तें बऱ्यासाठींच असा माझा त्याचे ठायीं पूर्ण भरंवसा असल्यामुळें या निश्चयाच्या पालटण्यामध्येंहि कांहीं मंगल अशी घटना निर्माण करण्याचें त्या परमेश्वराचे मनांत असेल असेंच आपण धरून चालूं. आतां आपण मला पूर्वीइतक्या परकी वाटत नाहीं. त्याअर्थी मला माझी ओळख देण्याला कांहींच हरकत नाहीं. एका दृष्टीनें आपण आणि मी सारख्याच अभागी आहोंत."

इतक्यांत रामस्वामी घाईघाईनें दरवाजा उघडून आंत डोकावून म्हणाला, "बाईसाहेब, किती वेळ हा! पहांटेची वेळ होत आली. तुरुंगावरील पाहरा बदलण्याची वेळ झाली. आपण कोणाला न कळत इकडे आलां आहांत हें विसरतां कामा नये! न जाणो आधींच आपले ग्रह सध्यां वाईटा आहेत; आपण इकडे आल्याची व मीं, आपणाला या कोठडीचा दरवाज मोकळा करून दिल्याची नुसती चाहूल कोणाला लागली तरी राईचा पर्वत होऊन अनर्थ व्हावयाचा! लौकर आटोपा."

"खरेंच; बोलण्याच्या भरांत वेळ केव्हां निघून गेला हेंच मला समजलें नाहीं. आणि मी मुख्यतः ज्या कामासाठीं आलें तें काम तर तसेंच राहून गेलें आहे. राणीसाहेब, आतां आपण मुकाट्यानें याच पावलीं माझ्या मागोमाग चला. शत्रूच्या दृष्टीआड झाल्यावर आपणाला मनमुराद बोलतां येईल."

"पण आपणाला आतां कोठें जावयाचें?"

"परमेश्वर रस्ता दाखवील तिकडे जावयाचें. सदिच्छा आपल्या अन्तःकरणांत आहे, पश्चात्तापाची नवी पुण्याई आपण जोडली आहे आणि सत्याचरण हा आपला मार्गदर्शक आहे; यापेक्षां आपणाला आणखी कोणाचें साहाय्य पाहिजे? आपण मुकाट्यानें माझे मागोमाग चला."

# प्रकरण ११ वें

# बंधमुक्त

राणी तें ऐकून क्षणभर स्तब्ध राहिली. तिला त्या तरुणीच्या मनांतल्या योजनेची कांहींच कल्पना करतां येईना. उलट ही बातमी जर चंदासाहेबाला कळली तर तो आणखी काय काय अनर्थ घडवून आणील या भीतीच्या दडपणाखालीं त्या विचारीच्या अंतःकरणाचा अगदीं चक्काचूर होत होता. त्या तरुणीच्या सद्भावनेविषयीं तिला जरी यत्किंचित् शंका नव्हती, तरी ती तरुणी केव्हां कशी फंसेल याविषयीं तिला भरंवसा वाटत नव्हता. त्या तरुणीनें राणीच्या अंतःकरणांतील ही कालवाकालव अंदाजानें ओळखली आणि म्हटलें, "राणीसाहेब, आपण कृपा करून एवढेंच करा; माझ्यावर आणि परमेश्वरावर पूर्ण भडीभार घालून ह्या पावलीं माझ्याबरोबर बाहेर चला. आपल्या मातृभूमीवर व आपल्या धर्मावर कोसळणारें संकट कसें टाळावें या विषयींची उपाययोजना मीं माझ्या मनाशीं या पूर्वींच ठरविली आहे. मात्र तिची सुलभ रीतीनें अम्मलबजावणी होण्यासाठीं मला आपल्या साहाय्याची अत्यंत आवश्यकता आहे."

आपण इतकी कानींकपाळीं ओरडून समजूत घातली तरीहि राणीसाहेब बाहेर पडावयाला धजत नाहींत असें पाहून मात्र ती तरुणी संतापली आणि त्या भरांत आपला जंबिया राणीवर रोखून कळवळ्यानें उद्गारली, "राणीसाहेब, अजूनहि माझ्या शब्दावर तुमचा विश्वास बसत नाहीं, तर मग आपण माझ्या शत्रू आहांत असें मानून मला माझ्या ध्येयाच्या मार्गानें जातांना प्रथम हा आपला कांटा वाटेंतून दूर करावा लागेल !"

राणी सौम्यपणानें म्हणाली, "मुली, तुझ्या इतकें अलौकिक धैर्य माझ्या अंगीं नसलें तरी तूं ज्याला भितेस तसला अप्रामाणिकपणा मात्र माझ्या अंगीं मुळींच नाहीं. मी त्या नरपशूला—ज्यानें माझ्या सर्वस्वाचें वाटोळें करून मला धुळीला मिळविलें त्या चांडाळाला अजूनहि वश असेल असें तुला वाटतें काय? तर लक्षांत ठेव, ही राणी अधोगतीच्या गर्तेंत कितीही खोल गाडली

गेली असली तरी ती हाडामांसानें हिंदू आहे. तिच्या नसानसांतून अद्यापिहि हिंदुधर्माचा अभिमान सळसळत आहे. प्रतिकूल परिस्थितीमुळें मी फंसून दुबळी झाल्यें असल्यानें स्वाभिमानाचे बोल बोलणाऱ्या माझ्या वाणीमध्यें सामर्थ्य उरलें नसलें तरी माझी इच्छाशक्ति कांहीं अजून मेलेली नाहीं. इतकेंच काय पण आजवरच्या कटु अनुभवानें त्या इच्छाशक्तीच्या-त्या स्वाभिमानाच्या-त्या धर्माभिमानाच्या तरवारींना नवें पोलादी पाणी मिळालें आहे. ईश्वराची कृपा होऊन मी यावेळीं मोकळी असतें तर अलौकिक गोष्टी करून मीं माझ्या पापाचें परिमार्जन केलें असतें, आणि माझ्या मायदेशाचे पांग फेडले असते. पण आज परमेश्वर माझ्यावर कोपला आहे. मुठींत सोनें धरलें तरी त्याची माती होईल इतकें माझें दुर्दैव आज बलवत्तर झालें आहे. न जाणो, कदाचित् मी तुझ्याबरोबर आलें तर माझ्या पापाग्नीची झळ तुला लागून तुझ्याहि ध्येयसाधनांचा सत्यनाश होईल, म्हणून म्हणतें, मुली, तुझ्या धर्मासाठीं, तुझ्या देशासाठीं आणि इच्छा असेल तर या अभागी राणीसाठीं जें जें काय करावयाचें असेल तें तें तूं खुशाल कर. तुला माझा पूर्ण आशीर्वाद आहे. मी शरीरानें नाहीं तरी मनानें तुझी पाठीराखीण, तुझ्या पाठीमागें उभी आहें." राणीच्यानें पुढें बोलवेना. तिचा कंठ दाटून आला आणि डोळ्यांत आंसवें उभीं राहिलीं. शोकाचा कड तिला आवरेनासा झाला. ती पदरानें तोंड झांकून घेऊन एका कोपऱ्यांत डोकें खुपसून स्फुंदून रडूं लागली. ती तरुणी तो प्रकार पाहून अगदीं किंकर्तव्यमूढ होऊन गेली. तिच्याच्यानेंहि कांहीं बोलवेना.

इतक्यांत रामस्वामीनें पुन्हां एकवार किलकिल्या दरवाजांतून आंत डोकावून पहातां पहातां भीतिदायक कांपऱ्या स्वरानें विचारलें, "बाईसाहेब, आपली इच्छा तरी काय आहे? आपल्या आणि माझ्या मानेला आपण एकदमच तांत लावणार आहांत काय ? हे पहा पहारेकरी बदलले देखील. आतां इतक्यांत कैद्यांची तपासणी सुरू होईल आणि जर का हा प्रकार उघडकीला आला तर आपणां तिघांचाही सत्यनाश झाला असें समजा. मनुष्याची इच्छा नुसती पवित्र आणि बलवत्तर असून यशाची जोड मिळवितां येत नाहीं; त्याला तारतम्य आणि प्रसंगावधान यांची जोड अवश्य पाहिजे असते. सारासार विचार न करतां दिव्यावर उडी घालणाऱ्या पतंगाप्रमाणें आपण उज्वल

स्वाभिमानाच्या कथानिरूपणांत हा कसला अविचार मांडला आहे? प्रथम बाहेर पडा, मी दाखवितों त्या गुप्त मार्गानें निर्भय स्थळीं चला आणि मग काय करावयाचें तें करा किंवा बोलावयाचें तें बोला."

रामस्वामीचे ते कळवळ्याचे बोल मात्रेच्या वळशाप्रमाणें लागू पडले. आपला हा पुरातनचा सेवक चंदासाहेबाला फितूर झाल्यामुळेंच तर एथें अशी लाजिरवाणी नोकरी करीत नसेल ना; असा तिला जो पुसट पुसट संशय होता तोदेखील आतां निःशेष झाला. त्या तरुणीचा रामस्वामीच्या ठायीं पूर्ण विश्वास होता हें तर सांगावयालाच नको. एरव्हीं तिला त्यानें अशा अपरात्रीं, आज तीन वर्षांत ज्या मीनाक्षी राणीला बाहेरील निर्जीव जगाचें ओझरतें दर्शन घेण्यालाही चंदासाहेबानें पूर्ण प्रतिबंध केला होता त्याच राजबंदी राणीची भेट त्या तरुणीला कशी घेऊं दिली असती! आणि त्या तरुणीला तरी आपला जीव थोडाच भारी झाला होता! ती रामस्वामीवर पूर्ण विश्वास असल्याशिवाय अशा वेळीं त्या बंदिशाळेंत येणाऱ्या निमित्तानें काळाच्या जबड्यांत चालून जाईल!

तरीही मीनाक्षी राणीनें पुन्हां एकवार मनाची खात्री करून घेण्यासाठीं रामस्वामीला विचारलें, "रामस्वामी, तूं अजूनही पूर्वीप्रमाणेंच माझा विश्वासू सेवक आहेस काय?"

रामस्वामी गंभीर स्वरानें उद्गारला, "राणीसाहेब, पापाचीं पुटें माणसाच्या मनावर बसलीं कीं त्याच्या मनींमानसीं विश्वासाची दुनिया नाहींशी होते. स्वामिभक्तीची दिव्य ज्योत ह्या रामस्वामीच्या अंतःकरणांत जर अहर्निश तेवत नसती तर अशा लाजिरवाण्या परिस्थितींतून तरणोपायाचा मार्ग शोधून काढण्यासाठीं अविंधांचें दास्य पत्करण्याची त्याला कांहींच गरज नव्हती. यावरून आपण काय तें समजा आणि बाईसाहेबांच्या शब्दावर विश्वासून मुकाट्यानें अगोदर पाय बाहेर काढा."

"एकूण ह्या तरुणीवर देखील तुझा पूर्ण विश्वास आहे म्हणावयाचा!" राणीनें पुन्हां विचारलें. रामस्वामीनें तोंडानें त्या प्रश्नाचें उत्तर मुळींच दिलें नाहीं; तरीही त्याच्या चर्येवरील समाधानवृत्तींत राणीला काय उत्तर मिळावयाचें तें मिळालें. आपणाला जिचें नांवगांवसुद्धां माहीत नाहीं अशा एका अज्ञात स्त्रीबरोबर आपण निघून जाण्याचें धाडस केलें तर तें आपणाला

नव्या संकटाच्या गर्तेत लोटावयाला कारण होईल कीं काय, या भयानें ती हा वेळपर्यंत आढेवेढे घेत होती. पण आतां तिनें मनाचा निर्धार केला व त्या तरुणीला आणि रामस्वामीला म्हटलें, "इतकें ज्याअर्थी तुम्ही दोघेही आग्रहानें सांगत आहां, त्याअर्थी तुमच्या शब्दावर मला विश्वास ठेवलाच पाहिजे. न जाणो, परमेश्वराच्या मनांतून मला पुन्हां साह्याचा हात द्यावयाचा असेल; तो तुम्हां दोघांच्या मुखीं उभा राहून मला तारण्यासाठीं पुढें आला असेल! त्याचा अव्हेर मीं तरी कां करूं! चला, ही मी तुमच्याबरोबर निघालें." असें म्हणून राणी मनांतून परमेश्वराची करुणा भाकून त्याच पावलीं त्या तरुणीसह कोठडीच्या बाहेर पडली.

"चला, माझ्या मागोमाग या." असें म्हणून रामस्वामी पुढें चालूं लागला. तो पुढें व त्या दोघी त्याच्या मागाहून चालत असतां रामस्वामीनें मधून मधून मागें वळून पहाण्याचा क्रम सुरूच ठेवला होता.

राणी मीनाक्षी आणि ती तरुणी यांना आतां जास्त बोलण्याला अवसरच नव्हता. कारण काळ त्यांच्यापुढें जबडा पसरून उभा होता. राणी निमूटपणें त्या तरुणीला म्हणाली, "चल बाहेर." पुन्हां ती क्षणभर गोंधळल्यासारखी होऊन म्हणाली, "पण मी आगींतून उठून फोफाटयांत पडलें अशी तर माझी अवस्था तुझ्या संगतींत होणार नाहीं ना?"

"राणीसाहेब, पिशाच्चाला नेहमीं रामनामाचें भय वाटणें स्वाभाविक आहे. पण आपल्या मनाची ही चलबिचल आपल्या चित्ताच्या परिवर्तनाची साक्ष देत आहे. समजा, मीं विश्वासघात केला तरी आपला आजवर झाला आहे यापेक्षां आणखी सत्यानाश काय होणार आहे? आपण माझ्यावर विश्वास ठेवा आणि मनाशीं असा निर्धार करा कीं आजवरची ती परोपरीचीं पापें पुजणारी मीनाक्षी राणी नामशेष झाली, आणि ही मीनाक्षी राणी नवा जन्म घेऊन, प्रभु श्रीरंगाला साक्षी ठेवून नवा अवतार घेऊं पहात आहे."

यापेक्षां आणखी कांहींहि संभाषण करण्याच्या भराला न पडतां त्या दोघी दरवाजाच्या बाहेर पडल्या. राणीच्या मनांतून त्या तरुणीचें नांव तरी विचारून घ्यावयाचें होतें. परंतु अशा घाईच्या वेळीं तें विचारणें तिला अनुचित वाटलें. मात्र दरवाजाबाहेर येतांच तिनें रामस्वामीला विचारलें,

"रामस्वामि आतां तूं आम्हांला कोणत्या मार्गानें बाहेर काढून देणार?"

रामस्वामी त्या प्रश्नाचा अर्थ ओळखून चुकला. आपण योग्य रस्त्यानें राणीला पाठवून देतों किंवा नाहीं याविषयीं शंकित होऊनच राणीनें हा प्रश्न विचारला असावा हें ओळखून तो म्हणाला, " आईसाहेब, आपणाला आपल्या राजवटींतला एकूण एक गुप्त मार्ग माहीत आहे हें मी जाणतों. परंतु त्या गुप्त मार्गांपैकीं कोणता मार्ग आजच्या परिस्थितींत आपल्याला सुखकर आहे हें अजमावण्यासाठीं आपण माझ्या शब्दावर विसंबून राहिलें पाहिजे."

राणी किंचित् खोंचक स्वरांत उद्‌गारली, " सारी सृष्टि माझ्याविरुद्ध फिरली असतां आणि माझे सारे नोकर खाल्ल्याघरचे वांसे मोजणारे निमकहराम निपजले असतां रामस्वामी, तूंच तेवढा एकटा प्रामाणिक कसा राहिला याचें मला आश्चर्य वाटतें. आजवर पूर्वींच्या नोकर चाकरांवर विश्वासून मी अनेक वेळां फंसलें आहें. त्याच आपत्तीची पुनरावृत्ति इथें होणार नाहीं ना ? "

ती तरुणी मध्येंच म्हणाली, " राणीसाहेब, त्रिचनापल्लीच्या राणीनें दानत सोडून सर्वस्वाचें वाटोळें करण्याचा प्रसंग आणला असतांही आज त्रिचनापल्लीच्या राज्यांतील प्रजेमध्यें स्वाभिमान, स्वदेशाभिमान व स्वधर्माभिमान जीव धरून आहे, तो केवळ रामस्वामीसारख्या निमकहलाल नोकराच्या पुण्याईवरच होय." ती तशीच रामस्वामीकडे वळून म्हणाली, " चला लवकर आम्हांला मार्गाला लावून द्या."

" चला." असें म्हणून रामस्वामी घाईघाईनें कोठडीचा दरवाजा लावून त्या दोघींसह डाव्या बाजूच्या वाटेनें चालूं लागला. वास्तविक त्याला उजव्या बाजूच्या वाटेनें जावयाचें होतें. परंतु त्या बाजूनें तुरुंगावरील बदललेले पहारेकरी तपासणीकरतां जवळ जवळ येत असल्यामुळें त्याला विरुद्ध दिशेनें जाणें भाग पडलें.

" तूं मला आतां कोणत्या वाटेनें नेणार ? " राणीनें पुन्हा विचारलें.

रामस्वामी उत्तरला, " येथून जवळच पलीकडच्या भिंतींतून भुयाराचा एक मार्ग थेट किल्ल्याच्या तटाबाहेर जाऊन पोंचतो. तो आपणाला माहीत आहे ना ? "

" होय." राणी उत्तरली

" त्याच मार्गानें आपल्याला आतां जावयाचें आहे." रामस्वामी म्हणाला.

" पण पुढें काय ?" राणीनें प्रश्न केला.

" पुढची काळजी या क्षणीं काय म्हणून करतां ? परमेश्वर आपला साहयकर्ता आहे. भगवंताच्या कृपेनें आपोआप आम्हांला पुढचा मार्ग दिसून येईल." ती तरुणी म्हणाली. आणखी थोडचा वेळानें रामस्वामी पुढें आणि त्या दोघी मागें अशीं तीं तिघेंहि त्या विवक्षित भुयाराच्या तोंडापाशीं येऊन पोंचलीं तोंच तेथें मूर्तिमंत अरिष्ट उभें असलेलें त्यांना दिसून आलें. राणीच्या अमदानींतला एक जुना पहारेकरी त्या भुयाराच्या तोंडाशीं खडा पहारा करीत होता. त्यानें ती मंडळी तेथें आलेली पहातांच व विशेषतः रामस्वामी त्यांच्याबरोबर आहे हें पाहून खंवचटपणाच्या वृत्तीनें चेहरा अंमळ गोरामोरा केला. रामस्वामीनें अंदाजानें ओळखलें कीं हा पहारेकरी बखेडा करण्यासाठीं येथें उभा आहे. तो निर्भयपणें त्या पहारेकऱ्याला दरडावून म्हणाला, " हरिसिंग, मार्गांतून बाजूला हो."

" मी वरिष्टांच्या हुकुमाचा तावेदार आहें. मला बाजूला होतां येत नाहीं." हरिसिंग उत्तरला.

राणीनें त्याला ओळखलें, आणि अधिकारयुक्त वाणीनें त्याला आज्ञा केली, " हरिसिंग, मी ह्या त्रिचनापल्लीची राणी, तुझी धनीण तुला आज्ञा करतें, तूं बाजूला हो आणि आम्हांला मार्ग मोकळा करून दे."

" राणीसाहेब, मला क्षमा करा." हरिसिंग दोन्ही हात जोडून म्हणाला, " जोंवर आपली सत्ता या राजवटींत चालू होती तोंवर मीं इमानेंइतबारें आपली सेवा केली. परंतु आतां तो मनू पालटला आहे. आतां मी आपल्या हुकुमाचा ताबेदार नाहीं, आणि आपणहि येथील राणीसाहेब नाहीं."

रामस्वामीला हरिसिंगाचे ते बेपर्वाईचे बोल ऐकून इतकी चिड आली कीं, त्याचक्षणीं त्यानें आपल्या कमरेची कट्यार उपसून ती हरिसिंगाच्या छातींत खुपसून म्हटलें, " निमकहराम, दगलबाज, खाल्लेल्या घरचे वांसे मोजणाऱ्या तुला हीच शिक्षा योग्य आहे."

त्या वारासरसा हरिसिंग प्राणांतिक वेदनांनीं ओरडत जमिनीवर पडला. तरीहि पडत पडत त्यानें आपल्या कमरपट्टचांतील कट्यार काढून रामस्वामीवर वार करण्याला कमी केलें नाहीं. रामस्वामीला सुदैवानें तो वार ओझर-

ताच लागला. त्याला जखम झाली, पण हरिसिंगाप्रमाणें जमिनीवर लोळण घेण्याचा प्रसंग परमेश्वरानें त्याजवर आणला नाहीं. त्यानें सभोंवार पहात हरिसिंगाचा अर्धमेला मुडदा दोन्ही हातांनीं ऊचलून दूर फेंकून दिला व त्याच्या कमरेच्या किल्ल्या जवळच पडल्या होत्या त्या घेऊन भुयाराचा दरवाजा मोकळा करून ती राणी आणि ती तरुणी या दोघींना म्हणाला, " अगोदर आंत चला." हरिसिंगाच्या ओरडाओरडीनें आजूबाजूचे पहारेकरी सावध होऊन त्या जागीं येऊं लागलेले पाहतांच राणी व ती तरुणी या दोघींचेंहि चित्त बावरलें. रामस्वामी मनांतून भ्याला कीं आतां आपली धडगत नाहीं. परंतु त्या भीतीचा लवलेशहि आपल्या चर्येवर न दाखवितां त्यानें त्या दोघींना दंडाला धरून बळेंच त्या भुयारांत लोटलें व आपल्या हातांतील पलिता त्या तरुणीच्या हातीं देऊन सांगितलें, " प्रथम भूयाराचा दरवाजा आंतून बंद करून घ्या आणि मग मार्गाला लागा. राणीसाहेबांच्या हा मार्ग चांगला परिचयाचा आहे. आपण एकवार किल्ल्याच्या तटाबाहेर पडलां कीं आपले साह्यकारी तेथें हजर आहेत. आपण कांहीं काळजी करूं नका."

" पण तुझी वाट काय ? " राणीनें भयचकीत स्वरांत विचारलें.

" माझी वाट परमेश्वर दाखवील ती."

" पण तूं आमच्याबरोबर कां येत नाहींस ? "

" मी आलों असतों. परंतु संकटाचा लोंढा आपणांवर जोरानें चालून येण्याचा हा समय आहे. अशा वेळीं मला येथेंच राहून तो लोंढा थोपवून धरण्याची पराकाष्टा केली पाहिजे."

इतक्यांत पांचसहा लोक तेथें येऊन पोंचले. तोंच त्या दोघी भुयाराच्या दरवाजाच्या आंत गेल्या व दरवाजा आंतून बंद झाला. रामस्वामीनें घाईघाईनें भूयाराचें प्रवेशद्वार बाहेरून बंद करून घेतलें आणि सभोंवारचे लोक हा काय प्रकार आहे अशी आश्चर्यपूर्वक भावनेनें चौकशी करीत असतां त्यानें प्रथम अर्ध मेल्या हरिसिंगापाशीं जाऊन त्याचें नरडें कापलें. सर्व लोक क्षणभर स्तंभित होऊन तो भयंकर देखावा पहात उभे राहिले.

# प्रकरण १२ वें

# रामस्वामीचें चातुर्य

रामस्वामीनें इतकी खबरदारी घेतली तरी त्या प्रकाराचा गवगवा व्हावयाचा तो झालाच. मात्र सुदैवानें तीं पांचसहा माणसें तेथें येईतों काय प्रकार घडला हें एकटचा रामस्वामीशिवाय दुसऱ्या कोणालाहि माहीत नव्हतें. कदाचित् हरिसिंगानें त्या गौप्याचा परिस्फोट केला असता या भयानेंच रामस्वामीनें प्रसंगावधान राखून त्याला या जगांतून नाहींसा केला होता. अर्थात् आतां रामस्वामी सांगेल तोच खरा प्रकार होता. रामस्वामी हा मीनाक्षी राणीच्याच नव्हे तर तिच्या पित्याच्याहि अमदानीपासूनचा अत्यंत स्वामिनिष्ठ असा राजसेवक होता. आणि खुद्द त्याच्याशिवाय व फार तर दुसऱ्या परमेश्वराशिवाय कोणालाहि माहिती नाहीं असें एक रहस्य रामस्वामीच्या जीवनाशीं निगडीत झालें होतें. तें रहस्य हेंच कीं रामस्वामी इतक्या सायासानें चंदासाहेबाच्या अस्मानी सुलतानींत नाक मुठींत धरून राजवाडयांतील सेवेकरी होऊन राहिला होता, तो आपल्या स्वामिनीचें अंशतः तरी ऋण फेडण्यासाठीं अनुकूल परिस्थितीची वाट पहाण्यासाठींच होय.

त्या सहा पहारेकऱ्यांपैकीं प्रत्येकानें रामस्वामीला तेथल्या एकंदर प्रकाराविषयीं नाना तऱ्हेचे प्रश्न विचारून अगदीं भंडावून सोडलें. पण रामस्वामी अशा सर्वांना पुरून उरणारा होता. त्यानें त्या सर्व घडामोडींच्या अपेशाचें खापर हरिसिंगाच्या माथीं फोडून दांत ओंठ खात सर्वांना सांगितलें, "त्या बदमाषानेंच ही दगलबाजी केली आहे. मला त्याचा पुरा सुगाला लागला नाहीं हें खरें, परंतु मी रात्रीपासून पहातों आहें, याच्या चोरटचा घडामोडी एकसारख्या चालू होत्या. आज बरेच दिवस मला संशय आहे कीं हा चोर बंदिवान् राणीचा साथीदार आहे, पण तो खाशा स्वारीचा अत्यंत विश्वासू सेवक पडला; त्याच्या विरुद्ध मीं कोणत्या तोंडानें ब्र काढावा ?"

इतकें झालें तरी भुयारांत कोण मंडळी गेली हा मुद्याचा प्रश्न तसाच

शिल्लक राहिला. कारण रामस्वामीनें त्या बाबतींत पूर्णपणें कानावर हात ठेवला. इतर पहारेकरीहि तो अज्ञात प्रकार पाहून कांहींसे गोंधळून गेले. राजवाड्यांत चंदासाहेबानें चालविलेलें कठोर कारस्थान त्यांना माहीत होतें. त्या कारस्थानाशीं संबंध असणारी कोणी तरी महत्त्वशाली व्यक्ति तेथून पसार झाली असावी असा सर्वांचा तर्क झाला. परंतु त्याचा दोष आपणां सर्वांच्या माथीं येईल कीं काय या भयानें त्यांनीं आपसांत ती गोष्ट छपवून टाकण्याचें ठरविलें. त्यांपैकीं एकानें शक्कल काढली कीं आपण चंदासाहेबाला हा प्रकार सांगून आपल्यावरील जबाबदारींतून मोकळें व्हावें. परंतु अजून थोडीशी रात्र होतीच; व चंदासाहेबालाही मीनाक्षी राणीशीं राजकारणाच्या वाटाघाटी करण्याच्या निमित्तानें अगोदरच जागरण घडलें होतें. अशा स्थितींत त्याची झोंपमोड करण्याचें धैर्य कोणाला कसें व्हावें ! रामस्वामीला ती सर्व परिस्थिति फारच सोयीची वाटली. त्यानें आपली स्वामिसेवातत्परता दाखविण्यासाठीं त्या योजनेला मनमोकळेपणानें मान्यता दिली. कारण चंदासाहेबाला तरी फार लौकर म्हणजे प्रातःकाळींच हा प्रकार कळणार होता. त्याच्या नंतर चौकशी होऊन खऱ्या अनर्थाचा शोध लागणार, तोंवर मीनाक्षी आणि ती तरुणी सुखरूपपणें आपल्या निर्भय मार्गाला लागतील याविषयीं रामस्वामीला मुळींच शंका नव्हती.

आणि पुढील प्रकारही थेट रामस्वामीच्या कल्पनेप्रमाणेंच घडून आला. चंदासाहेबानें प्रातःकालीं उठल्याबरोबर प्रथम मीनाक्षी राणीच्या सहीचा खलिता घेऊन आपल्या तर्फेच्या वकिलाला मुरारराव घोरपड्याकडे रवाना केला. त्या मराठा रणमर्दाला कारस्थानाच्या जाळ्यांत अडकवण्याची तरतूद झाल्यावर अवान्तर गोष्टींकडे लक्ष देण्याला चंदासाहेबाला फावलें, तेव्हां कोठें पहांटेचा गलबला त्याच्या कानीं गेला. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं ती तक्रार करण्यांत रामस्वामी हाच प्रमुख होता ! रामस्वामीनें अशा कांहीं विलक्षण आवेशानें बोल बोलून चंदासाहेबाला जादूगाराप्रमाणें भारून टाकलें कीं त्या भरांत हरिसिंगाचा आपल्या हातून खून झाला हें सांगूनहि त्याबद्दल त्यानें चंदासाहेबाकडून शाबासकी मिळविली! पुढील प्रसंग ओळखून कीं काय, रामस्वामीनें आपल्या निवेदनाला आगाऊच पुस्ती जोडून ठेविली होती, "मालीक, माझ्या हातून रात्रीच्या पहाऱ्यांत थोडी

कसूर झाली आहे त्याबद्दल मला क्षमा करावी. पहांटेच्या प्रहरीं मीं माझा पहारा सोडला व हरिसिंग त्या कामगिरीवर रुजू झाला, त्यावेळीं त्यानें ज्या काय भानगडी केल्या असतील तिकडे माझें लक्ष नव्हतें."

"त्या भानगडींबद्दल त्याला देहान्त प्रायश्चित्त अल्लानें दिलेंच आहे. तूं त्याबद्दल कां फिकीर करतोस ?" चंदासाहेबानें विचारलें.

"तसें नव्हे मालिक, मीं एरव्हीं फिकीर केली नसती. परंतु मला आज बरेच दिवस असा जबरदस्त संशय येत होता कीं हरिसिंग हा बंदिवान् राणीचा पक्षपाती असावा आणि त्या भुयाराच्या वाटेनें कोणती मंडळी त्यानें बाहेर काढून दिली हें जरी मला माहीत नाहीं, तरी आतां मला जास्तच संशय येऊं लागला आहे कीं त्यानें राणीलाच बंधमुक्त करून बाहेर लावून दिलें कीं काय!"

राणीचें नांव निघतांच चंदासाहेबाच्या डोक्यावरचे केंस ताठ उभे राहिले. तो आश्चर्य आणि संताप यामुळें थरारणाऱ्या वाणीनें उद्गारला, "काय, राणी बंधमुक्त झाली ? चल अगोदर माझ्याबरोबर. मला त्या गोष्टीचा तपास केलाच पाहिजे." असें म्हणून चंदासाहेब त्याच पावलीं बंदीशाळेकडे निघाला. तो जाऊन भुयाराचा दरवाजा उघडून पहातो तों आंत राणी कोठें आहे ! अर्थात् राणी निसटून गेली हें तर ठरलेंच. रामस्वामीनें तो भुयाराचा संशयित मार्गही चंदासाहेबाला दाखवून दिला. चंदासाहेबानें तेथें जाऊन आपल्या नोकरामार्फत तो दरवाजा उघडण्याचा प्रयत्न केला, परंतु आंतून कडी असल्यामुळें तो उघडला गेला नाहीं! अखेर कुऱ्हाडी आणून तो दरवाजा फोडून काढावा लागला. परंतु आंत दहाबारा पायऱ्या उतरून गेल्याबरोबर त्या लोकांना तेथें पाणीच पाणी असलेलें आढळून आलें. इतकेंच नव्हे, पण भरतीच्या वेळीं समुद्राचा किनारा पाण्याच्या वाढत्या लाटाबरोबर झांकत जावा त्याप्रमाणें त्या भुयाराची एकएक पायरी आंतील जलप्रवाहानें हळूहळू झांकली जात होती. त्यामुळें त्या लोकांचा अगदीं नाइलाज झाला. त्यामुळें तेथें चंदासाहेबाची मति कुंठित झाली. तो रामस्वामीला म्हणाला, "हा मार्ग तर जलमय दिसतो! असें कसें ?"

रामस्वामी गंभीर चर्या करून म्हणाला, "परमेश्वर जाणे ! मीं आजवर हा मार्ग कधींच पाहिला नव्हता."

"तरी पण तूं किल्ल्यांतला अत्यंत जुना नोकर आहेस. ह्या रस्त्याचा

मानाची जागाहि मिळेल. परंतु याद राखून ठेवा, राणीचा शोध जर लागला नाहीं, तर मी तुम्हां सर्वांचा महादेवाच्या टेकडीवरून कडेलोट करण्याला कमी करणार नाहीं."

चंदासाहेब आपल्या शब्दाला जागण्याइतका निर्दय मनाचा होता हें सर्वांना माहीत होतें. आणि म्हणूनच ते आपल्या जिविताची आशा सोडून सभय चित्तानें राणीच्या शोधार्थ दहा दिशांना निघून गेले. मात्र जातांना त्यांनीं आपल्या मनाशीं खूणगांठ मारली कीं, राणीचा शोध लागला तर पुन्हां ह्या किल्ल्याला आमचे पाय लागतील, नाहींपेक्षां जिकडे पुढा तिकडे मुलूख थोडा. हा त्यांचा एकएकटयाच्या मनाचा निर्धार झाला, परंतु त्यांचीं बायकापोरें तेथेंच बिऱ्हाडांत अडकलीं होतीं, त्यामुळें परागंदा व्हावयाचें झालें तरी बायकापोरांची काय वाट करावयाची हा प्रश्न ओघानेंच त्यांच्या समोर उभा राहिला, व त्यांनीं थोडयाशा विचारांतीं आपसांत संगनमत करून, आपल्या मागोमाग आपल्या बिऱ्हाडांचें चंबूगवाळें आटोपलें जाईल अशी तरतूद केली.

चंदासाहेब बंदिशाळेंतून माघारा राजवाडयांत जाऊन पोंचला व घडलेला एकंदर प्रकार मोहनेला निवेदन करण्यासाठीं तडक तिच्या महालांत गेला. परंतु मोहना त्याला तेथें आढळून आली नाहीं! त्याबरोबर तर त्याचें अंतःकरण आश्चर्याच्या धरणीकंपानें पुरें हादरून गेलें. तो स्वतःशीं दांत ओंठ खात उद्‌गारला, "हिंदू–हिंदू! ही हिंदूंची अवलाद पट्टीची विश्वासघातकी निमकहराम आहे. मोहने, तूं अखेर मला फंसविलेंस काय?" इतक्यांत त्यालाच वाटलें कीं, न जाणो मोहना कोठें तरी आजूबाजूला राजवाडयांत किंवा उद्यानांत फिरत असेल; म्हणून त्यानें तिच्या महालांतील दासींपाशीं चौकशी केली. तेव्हां तिच्या तैनातींत असणाऱ्या एका दासीनें सांगितलें, "बेगमसाहेबा प्रहरभर रात्रीला ज्या महालाबाहेर पडल्या त्या पुन्हां महालांत म्हणून आल्या नाहींत. आम्ही त्यांचीच वाट पहात आहों." तोंच दुसरी दासी पुढें येऊन म्हणाली, "बेगमसाहेबा खाविंदांच्या महालांत गेल्याचें मला माहीत होतें, म्हणून मीं त्यांचा फारसा तपास केला नाहीं."

चंदासाहेबानें जास्त संशय घेऊन मोहनेचा साऱ्या राजवाडयांत कसून तपास केला. परंतु ती कांहीं त्याला सांपडली नाहीं. ती 'काफर' असल्यामुळेंच तिनें आपणाला दगा दिला, असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें व आतां

कोणत्या रीतीनें शोध करून तिच्यावर सूड उगवूं असें त्याला होऊन गेलें. इतक्यांत त्याच्या हृदयाच्या जखमेवर मीठाचें पाणी शिंपडण्यासाठींच कीं काय, त्याचा एक विश्वासू हुजऱ्या यामीन घाईघाईनें घाबरट चर्या करून तेथें आला व त्रिवार त्रिवार मुजरा करून रडक्या स्वरांत उद्गारला. "मालिक, आपण रात्रौ माझ्या हवालीं केलेल्या त्या दोन तलवारी कोठेंच सांपडत नाहींत."

"हरामखोर !" चंदासाहेब चिडलेल्या वाघाप्रमाणें यामीनवर डरकणी फोडून म्हणाला, "बदमाष, तूंच शत्रूला सामील आहेस !" त्यानें एका झडपेसरशी यामीनची मान पकडून त्याला गदगदा हलवीत विचारलें, "बोल, त्या तलवारी तूं कोणाच्या स्वाधीन केल्यास ?"

यामीन बिचारा गर्भगळित होऊन गेला. त्याच्या तोंडांतून शब्दच उमटेना. चंदासाहेबाच्या संशयग्रस्त मनाला वाटलें कीं हा आपणापासून तलवारींचा प्रकार छपवून ठेवितो आहे. म्हणून त्यानें संतापातिशयाच्या भरांत कमरेचा खंजीर उपसून तो यामीनच्या छातींत जोरानें मारून म्हटलें, "निमकहराम, तूंच त्या तलवारी शत्रूच्या स्वाधीन केल्या असल्या पाहिजेस. तुला हेंच शासन योग्य आहे."

यामीन खंजिराच्या वारासरसा गतप्राण होऊन धाडकन् खालीं पडला.

तो सारा दिवस चंदासाहेबाची अवस्था एखाद्या माथेफिरूप्रमाणें झाली होती. काय करूं आणि काय न करूं असें त्याला होऊन गेलें होतें. कावीळ झालेल्याला सारेंच पिवळें दिसतें. त्याप्रमाणेंच त्या एका घटनेमुळें त्याला सर्वच हिंदूंचा जबरदस्त संशय येऊं लागला होता. तशांत, आतां लवकरच राणी मीनाक्षी आपल्या हिंदू अनुयायांना गोळा करून, आपलें गेलेलें राज्य परत मिळविण्यासाठीं कसोशीनें सामना देणार आहे अशाहि बातम्या वारंवार कानीं येऊं लागल्या व वाऱ्याच्या सोंसाट्यासरसा आगीचा झोत पसरत जावा त्याप्रमाणें त्या बातम्यांनीं सारें त्रिचनापल्लीनगर दुमदुमून गेलें. त्या बातम्या अगदींच खोट्या होत्या असें नाहीं. काय असेल तें असो, परंतु चंदासाहेबाला त्या दिवशींच्या घटनेमुळें जितका संताप झाला होता, तितकाच प्रसन्नतेचा सुधावर्षाव तेथल्या हिंदू रयतेच्या व लहान मोठ्या सरकारी हिंदू अधिकाऱ्यांच्या हृदयावर झालेला सर्वत्र आढळून येत होता. चंदासाहेबानें आपल्या हाताखालील सर्व विश्वासू मुसलमान अधिकाऱ्यांना

सभोंवारच्या परिस्थितीचा बंदोबस्त व मोहना आणि मीनाक्षी यांचा शोध हीं दोन कामें निक्षून सांगितलीं. ते अधिकारीही आपल्या कार्यांत चुकवा-चुकव करणारे नव्हते. ते बहुतेक 'कलमी' अर्थात् बाटून मुसलमान झालेले होते एवढें सांगितलें म्हणजे त्याच बाटगेपणाच्या जोरावर त्यांना सरकार-दरबारीं मान्यतेच्या नोकऱ्या मिळालेल्या असून त्याच मार्गानें बढती मिळण्या-साठीं त्यांचा अट्टाहास सुरू होता हें नव्यानें सांगावयाला नको. त्यांना प्रथम वाटलें कीं आपलें नशीब काढण्याची ही खास पर्वणी आली, परंतु ते प्रत्यक्ष कार्याला लागतांच त्यांना अनुभव मात्र विपरीत येऊं लागला. इतके दिवस चंदासाहेब व त्याचे अविंध अधिकारी यांच्या टाटाखालील मांजरांप्रमाणें दुबले होऊन बसलेले हिंदू लोक आज कसे न कळे, एकाएकीं धिटाईनें वागूं लागले. फार काय, त्या मुसलमान अधिकाऱ्यांच्या हाताखालील दुय्यम लोकदेखील—अर्थात् ते बरेचसे हिंदु होते—आपलें काम नेहेमींप्रमाणें झटून करण्याला तयारच होईनात; जणूंकाय या शेवटच्या चक्रापासून चंदासाहेबाचें राज्ययंत्र बिघडून बंद पडण्याच्या पंथाला लागलें. सूर्योदयाच्या सुमाराला फक्त मोहना आणि मीनाक्षी ह्या दोघीच गुन्हेगार होत्या, तीच संख्या सूर्य चार घटका वर येईतों सहज पन्नासांवर गेली; आणि तरीहि चुगलखोर स्वार्थसाधूंच्या आगलावेपणामुळें ती संख्या सारखी फुगतच होती. असें असूनहि आश्चर्याची गोष्ट ही कीं, सरकारच्या दृष्टीनें अपराधी ठरलेले फारच थोडे लोक त्या दिवशीं सरकारी अधिका-ऱ्यांच्या हातीं लागले.

चंदासाहेबाला कळून चुकलें कीं, आपला बोज आतां पूर्ववत् कायम राहिला नाहीं. काफर अर्थात् हिंदु आपली आज्ञा उघड उघड पायांखालीं तुडवूं लागले हें पाहून त्याला पराकाष्टेचा विषाद वाटला व तितकाच संतापहि आला "काय, ज्या चंदासाहेबानें या त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांत पाऊल टाकल्या-पासून आपल्या इच्छेसमोर साक्षात् अल्लालाहि वांकायला लावलें, पंच महाभूतांचें एकवटलेलें सामर्थ्य ज्या ह्या माझ्या वाणींत आजवर सांठवलेले होतें, माझी नुसती नजर फिरल्याबरोबर जेथें सर्व लोक अत्यंत आज्ञाधारक-पणानें माझी जुलमाची आज्ञादेखील शिरसामान्य करावयाला खुषीनें किंवा सक्तीनें तयार असत, त्याच मला आज येथें कोणीहि जुमानीत नाहीं ना! बरेच दिवस या काफर हिंदूंच्या अंतःकरणांत माझ्याविषयीं धुमसणार

दावानल आज शांति सोडून पेट घेऊं पहात आहे. पण त्यांना म्हणावें, माझा दावानल एकदां भडकला म्हणजे तुमची सारी जात तुमच्या देवाधर्मासह बेचिराख करून सोडील." हे त्याच्या मनांतले विचार झाले; त्याच वेळीं त्याच्या कोपाची वीज प्रथम किल्ल्यांतल्या टेकडीवरील महादेवाच्या देवळा-वर कडाडली. आपण काफरांना त्यांच्या सर्वस्वासह पायांखालीं कसें तुडवूं शकतों याचा सर्वांना धडा शिकविण्यासाठीं त्यानें आपल्या हाताखालील एका सेनापतीला बोलावून आज्ञा केली, "रतनसिंग, आज सूर्यास्ताच्या आंत जर राणी मीनाक्षी, मोहना आणि माझ्या राजवाड्यांतून चोरीला गेलेल्या त्या दोन तलवारी पुन्हां माझ्या हातीं आल्या नाहींत, तर सर्व हिंदु रयतेला आज जाहीर करून ठेव कीं उदईक सूर्योदयाच्या वेळीं ह्या अत्याचाराचा मोबदला म्हणून हिंदूंच्या महादेवाच्या देवालयाचा विध्वंस करण्यांत येईल."

रतनसिंग चंदासाहेबाचा विश्वासू सेवक खरा, पण तो रक्तानें हिंदु होता. मनानें किंचित् दुबळा पडला म्हणून तेथल्या परक्यांच्या सेवेला चिकटून राहिला तरी इतका अमानुष जाच व इतकी अवहेलना सहन करण्याइतका तो नामर्द नव्हता. तरी त्यानें मनांतला क्रोध मनांत दाबून चंदासाहेबाला विचारिलें, "खाविंद, पण आपला हिंदूंवरच एवढा राग कां? तेच गुन्हेगार आहेत असें आपण कशावरून म्हणतां?"

"समजलों–समजलों, तूं देखील त्यांतलाच काफर आहेस आणि तुझ्या अंगांत अभिमानाचें वारें आतां संचारूं लागलें आहे. यावेळीं मी गय केली तर मला ती डोईजड जाईल. ठिणगीचा हां हां म्हणतां वणवा पेटतो, म्हणून ठिण-गीच प्रथम विझवून टाकिली पाहिजे. मला भले बोल शिकविणाऱ्या नादान माणसा, थांब. उदईक सूर्योदयाच्या वेळीं महादेवाची विटंबना करतांना, तुमच्या हिंदु-धर्मांत कोणत्याही सत्कार्याच्या प्रारंभीं देवाला सुपारी ठेवण्याची चाल आहे त्याप्रमाणें प्रथम महादेवाच्या टेकडीवरून तुझा कडेलोट केला जाईल, आणि मग इतर गोष्टी." एवढें बोलून चंदासाहेब एखाद्या दुखवलेल्या सर्पासारखा फणफणत तेथून निघून गेला. रतनसिंग मात्र किंकर्तव्यमूढ होऊन किंचित् काल तेथेंच उभा होता. इतक्यांत अकस्मात चंदासाहेबाच्या अरबी शिपायांनीं पुढें येऊन त्याला गिरफदार केलें. रतनसिंग आपल्या मनांत ओळखून चुकला कीं, आपल्या आयुष्याचा कारभार आतां आटोपला.

# प्रकरण १४ वें
# सर्प दुखावला गेला!

संशयानें संशय वाढत गेला; चंदासाहेबानें त्याच रात्रीं मुरारराव घोरपड्यांकडे मीनाक्षी राणीच्या सहीचा खलिता रवाना केला होता, त्याचा तरी इष्ट उपयोग होतो किंवा नाहीं याविषयीं त्याला खात्री वाटेनाशी झाली. परंतु आपणाला तो प्रकार ओघानें कळणारच आहे. तोंवर राणी मीनाक्षी आणि तिच्या बरोबरची ती कोण तरुणी, त्याप्रमाणेंच रामस्वामी यांची पुढें काय गत झाली हें आपणांला प्रथम पाहिलें पाहिजे.

तो भुयाराचा मार्ग मीनाक्षी राणीच्या चांगलाच परिचयाचा होता. तिचा पति त्रिचनापल्लींत राज्य करीत असतां कांहीं घरगुती भांडणांतून उत्पन्न झालेल्या महत्संकटामुळें त्या पतिपत्नींना त्याच गुप्त वाटेनें आपल्या प्राणरक्षणासाठीं एकदां बाहेर जावें लागलें होतें. तो मार्ग बराच अवघड होता. भुयाराच्या तोंडानें आंत गेल्यावर निरनिराळ्या बाजूनें आंत भुयाराला अनेक फांटे फुटलेले असून त्यांतला कोणता फांटा कोठें जातो हें फक्त माहितगाराशिवाय इतरांना कळणें शक्य नव्हतें. त्यांतले दोन फांटे तर थेट यमाच्या दरबारीं पापिष्टाला नेऊन पोंचविणारे होते. एका वाटेच्या तोंडाशीं अत्यंत खोल व निबिड अंधःकारानें व्यापिलेली अशी एक विहीर होती व त्या विहिरींत कांटेकुटे, लोखंडी खिळे, मोडकीं हत्यारें वगैरे प्राणघातक साहित्य भरपूर टाकण्यांत आलें होतें. दुसऱ्या रस्त्याच्या तोंडाशीं एक खोलच खोल अंधःकारमय गुहा होती. अपरिचित मनुष्य त्या मार्गानें जातांच हटकून पाय चुकून आंत पडावा अशीच घोटाळ्याची रचना तेथें करण्यांत आली होती. त्या भुयाराच्या तळाशीं भयंकर लांबच लांब असे लोखंडी सुळके उभे ठेवण्यांत आले असल्यामुळें, मनुष्य एकवार आंत पडला कीं तो जिवंत सांपडण्याची आशाच नसे. कैक पिढ्यांपूर्वीं त्रिचनापल्लीला कोणीएक व्यसनी व जुलमी राजा होऊन गेला; त्यानें आपल्या गैरमर्जींतल्या लोकांना शासन करण्याचा हा राक्षसी उपाय योजून ठेविला होता.

असो. राणी आणि ती तरुणी मार्ग न चुकतां त्या भुयाराच्या वाटेनें इष्ट स्थळीं जाऊन पोंचतांच प्रथम त्यांना भुयाराच्या दुसऱ्या तोंडाचा दरवाजा खुला होईना. त्या दोघींनींहि शक्य तेवढ्या जोरानें दरवाज्यावर आघात करून तो उघडण्याचा प्रयत्न केला, परंतु तो अगदीं वाया गेला. जसजसा त्यांना तेथें त्रास होऊं लागला व बंधमुक्त होण्याच्या आशेचा किरण मुळींच दिसेना, तसतशा भलभलत्या कुशंका त्यांच्या मनांत डोकावूं लागल्या. रामस्वामी शत्रूला तर फितूर नसेल ना, असा विचार मनांत येण्याइतकी त्या कुशंकांची मजल जाऊन पोंचली. चंदासाहेबानें आपला नायनाट करण्याची ही बेमालूम युक्ति शोधून काढली असें राणीनें त्या तरुणीपाशीं बोलूनहि दाखविलें. अशा कांहीं वेळ त्या दोघीही चिंतानलांत होरपळत तेथें उभ्या असतांना, एकाएकीं तो दरवाजा उघडला गेला. त्याबरोबर तेथल्या द्वाररक्षकानें राणीला पहातांच तिच्या चरणांवर मस्तक नम्र करून आपणाकडून झालेल्या दिरंगाईबद्दल तिची क्षमा मागितली. त्या तरुणीकडे मात्र त्यानें वारंवार भेदक दृष्टीनें निक्षून पाहिलें. राणीला त्याचा संशय येऊन तिनें त्याला विचारलें " कां? तुला या मुलीचा संशय येतो का ? "

" तसें नव्हे. पण आमच्या राणीला एका यःकश्चित् कलावंतिणीच्या हातांत हात घालून दहा दिशांना भटकण्याची पाळी यावी, या दैवदुर्विलासाचें मला आश्चर्य वाटतें आहे. " तो द्वाररक्षक उद्गारला. त्या तरुणीनें त्याच क्षणीं लाजेनें खालीं मान घातली. राणी तो प्रकार पाहून आश्चर्यचकित मुद्रेनें त्या दोघांच्याही तोंडाकडे आलटून पालटून टकमकां पाहूं लागली. तिनें त्या तरुणीला विचारलें, " तूं कोण ? "

ती तरुणी कांहींही बोलली नाहीं. तो द्वाररक्षक पुन्हां तिच्याकडे तीक्ष्ण दृष्टीनें पहात राणीला म्हणाला, " राणीसाहेब, ही आपणाला जन्मांतून उठवणाऱ्या सैतानाची रखेली आहे, व आपणाला या जगांतून नाहींसा करण्यांत तिचा स्वार्थ आहे, हें आपणाला माहित नाहीं काय ? " राणी पुन्हां संशयित मुद्रेनें त्या तरुणीच्या चर्येकडे पाहूं लागली.

तो द्वाररक्षक क्षणभर थांबून पुन्हां त्या तरुणीचें ताडण करूं लागला, " मोहने, बोल—चांडाळणी, तूं मोहनाच ना ? श्रीरंगाच्या देवळांतील कलावंतीण ती तूंच ना ? "

"होय, मी मोहना." असें म्हणून मोहनेनें आपलें अश्रु पुशीत राणीकडे वळून स्फुंदत स्फुंदत उद्गार काढले, "राणीसाहेब, हा द्वाररक्षक म्हणतो त्याप्रमाणें मी पतिता नारी आहें हें तर खरेंच. परंतु यानें मला आपली प्रतिस्पर्धी स्त्री ठरविलें यावर मात्र आपण कृपा करून विश्वास ठेवूं नका. मी परमेश्वराला साक्ष ठेवून पुन्हां सांगतें, ती मोहना–श्रीरंगाच्या देवालयांतून त्या नराधम सय्यदखानानें बलात्कारानें ओढून नेऊन बाटविलेली मोहना वस्तुतः असहायपणें ज्या दिवशीं बाटली त्याच दिवशीं या जगांतून नाहींशी झाली; आणि ह्या जुलमाचा सूड घेण्यासाठीं अहर्निश तळमळणारी ही नवी मोहना त्याच क्षणाला जन्माला आली. सय्यदखानाच्या सहाय्यानें त्या नर-पशु चंदासाहेबानें मला आपल्या विलासमंदिराचा दरवाजा दाखविला, आणि मीहि फारसा प्रतिकार न करतां मुकाट्यानें आंत चालून गेलें खरी; परंतु ती त्या अविंधाची नाटकशाळा होण्यासाठीं नव्हे, तर संधि सांपडेल तेव्हां सांपडेल तसा फांसा टाकून त्याचा सत्यानाश करण्यासाठीं. डोळ्यांत तेल घालून टपून बसणारी ही आपली हाडवैरीण त्यानें मूढपणानें आपल्या विलास मंदिरांत आपल्या शेजारीं उभी करून ठेविली होती. आतां परमेश्वराची कृपा झाली तर माझी इच्छा सफल होईल. आपलाहि त्या सदिच्छेला आशिर्वाद आहेच. माझ्या कारस्थानाचा धागादोरा आपणाला अद्यापि मुळींच कळलेला नाहीं. या द्वाररक्षकाला देखील माझी ओळख न पटण्याइतका माझ्या कारस्थानांचा गुप्तपणा अभंग राहिला गेला आहे यांतहि मला संतोषच आहे. आतां आपण बंधमुक्त झालांच आहां; आणखी थोड्या वेळानें मी काय म्हणतें याचें प्रत्यंतर आपल्या मनाला पटेल."

इतक्यांत यावनी पेहराव केलेला एक सैनिक आपला घोडा भरधांव फेकीत तेथें येऊन पोंचला व त्यानें तेथें येतांच मोहनेला प्रथम वंदन करून दोन्ही हात जोडून विनंति केली, "बाईसाहेब, मी रामस्वामीच्या अनुज्ञेवरून येथें आपला मार्गदर्शक म्हणून आलों आहें." इतक्यांत जवळच उभ्या असलेल्या राणीकडे त्याचें लक्ष गेलें; त्याबरोबर त्यानें राणीच्या पायांवर मस्तक ठेवून प्रणिपातपूर्वक उद्गार काढले, "आईसाहेब, प्रथम मीं आपणाला ओळखलें नाहीं याबद्दल मला क्षमा करा. आपण बंधमुक्त झालां यावरून आमच्या या अभागी देशाचें भाग्य आज पुन्हां उदयाला येऊं घातलें आहे असेंच मी

समजतों. परंतु आतां येथें बोलण्यांत वेळ दवडण्याइतकी सवड आपणाला नाहीं. तिकडे किल्ल्यांत या प्रकारामुळें संशयाचा व असंतोषाचा वणवा भडकला असेल. त्या वणव्याची झळ आपणाला लागण्यापूर्वी आपण येथून शत्रूच्या दृष्टिआड झालें पाहिजे."

द्वाररक्षक स्तब्धपणें त्या सैनिकाचें तें भाषण ऐकत होता. त्यानें किंचित ओशाळल्यासारखें करून त्या सैनिकाला विचारलें, "मनमोहन, ही मोहना आपल्या विश्वासाला पात्र आहे, अशी तुझी खात्री आहे ना ?"

मनमोहन उत्तरला, "तो प्रश्न आपला नसून आपल्या नेत्यांचा आहे., आपण आपलें कर्तव्य करून शिस्त पाळावयाची आहे. तुला असें वाटतें का कीं इतक्या प्रयासांनीं देशाच्या दास्यविमोचनाची योजना ज्या लोकनायकांनीं उभारली त्यांनीं मोहनेसारख्या संशयित जिविताच्या स्त्रीला तावून सुलाखून पाहिल्याशिवाय उगीच आपल्या कटांत सामील करून घेतलें असेल?"

तोंच मोहना म्हणाली, "मला याविषयीं मुळींच विषाद वाटत नाहीं; उलट आनंद वाटतो कीं आपल्या हिंदुजनतेचा दास्यविमोचनाचा प्रयत्न इतक्या सावधपणानें व पद्धतशीर रीतीनें सुरू आहे. पाया भक्कम असला तर त्यावरची इमारत टिकते." ती द्वाररक्षकाकडे वळून म्हणाली, "तूं मला टाकून बोललास याबद्दल मी तुझ्यावर मुळींच रुष्ट झालें नाहीं, उलट तूं बेसावधपणें माझी कसून विचारपूस न करतां जर मला येथून जाऊं देतास, तर असल्या महत्त्वाच्या गुप्त कारस्थानांत तुझ्यासारख्या नेभळटाला स्थान मिळालेलें अयोग्य आहे असेंच मीं म्हटलें असतें."

"बरें, आतां लौकर एकदां आपण उभयतां माझ्या मागोमाग चला. आपली नौका पलीकडे तयार आहे. तिच्यांतून आपण एकवार शत्रूच्या दृष्टीच्या टापूपलीकडे गेलों कीं बचावलों."

एवढें त्या मंडळीचें संभाषण होत आहे तोंच रामस्वामी अकस्मात् त्यांच्यासमोर येऊन उभा राहिला. त्याला पाहून सर्वांना पराकाष्टेचें आश्चर्य वाटलें. राणी आणि मोहना त्याला कांहीं विचारणार, इतक्यांत त्यानेंच उलट त्यांना हुडसून खडसून प्रश्न केला, "हें काय ? आपणाला देशाचा उद्धार करावयाचा आहे कीं शत्रूच्या हातून अधिकाधिक विटंबना करून घेऊन मरावयाचें आहे ? इतका वेळ तुम्ही येथें उभ्या कशा ?" तो उत्तराची वाट न पाहतां

पुढें म्हणाला, " बरें; आतां अगोदर माझ्याबरोबर चला. किल्ल्यांत आपण दोघीजणी अदृश्य झाल्यामुळें हाहा:कार उडाला आहे, व आपल्या शोधाचा प्रयत्न जारीनें सुरू आहे. मी इकडे आलों तो तरी पडत्या फळाची आज्ञा घेऊन आपला शोध करण्यासाठींच होय. "

" परंतु तुला तरी इकडे कसें येतां आलें ? मी इकडे येतांना जलाशयाचा मार्ग मोकळा करून तें भुयार कायमचें निरुपयोगी केलें होतें. " राणी म्हणाली.

" तें खरें; परंतु ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी. " रामस्वामी गालांतल्या गालांत किंचित् हंसून म्हणाला, आपल्या योजनेप्रमाणें आपला हेतु पूर्णपणें सफळ झाला. आपल्या शोधासाठीं म्हणून, दोन वीर त्या जलाशयांत उडी टाकून प्राणाला मुकले. मी तरी शक्य तों लवकर आपली भेट घेणें अवश्य म्हणून आपला शोध लावण्याची कामगिरी चंदासाहेबाच्या विनंतीवरून पत्करली, आणि त्या कामगिरीवर सध्यां मी इकडे आलों आहें."

" परंतु त्या जलप्रवाहानें हळूहळू किल्ल्यांत सर्वत्र जलमय होईल त्याची वाट काय ? " राणीनें विचारलें.

" त्याची आपणाला काळजी नको. मी जलप्रवाह बंद करून इकडे आलों आहे. किल्ल्यांतल्या लोकांची मात्र कल्पना झाली असेल कीं जी गत पहिल्या दोघांची तीच रामस्वामीचीहि झाली असावी. आणि त्यांची तशी कल्पना होणें आपणाला इष्टच आहे. पण आपण खुळ्यासारखीं येथें काय उभें राहिलों ? चंदासाहेबानें मुरारराव घोरपड्याला जाळ्यांत अडकविण्यासाटीं योजलेलें कारस्थान पूर्ण होण्यापूर्वींच आपणाला मुराररावची गांठ घेऊन त्याचें रक्षण केलें पाहिजे. त्यानें एकवार आपणाला पाठीशीं घातलें कीं मग आपला राज्यक्रान्तीचा प्रयत्न फळाला येण्याला मुळींच उशीर नाहीं.

एवढें संभाषण झाल्यावर रामस्वामीसह राणी व मोहना ह्या दोघीही तेथून निघून गेल्या. थोड्या अंतरावर मोहना व रामस्वामी यांच्या पूर्वयोजनप्रमाणें नौका सज्ज होतांच त्या नौकेंतून ती मंडळी कोठें निघून गेली, याचा चवथ्या कोणालाहि पत्ता लागला नाहीं. आपलें प्रयाण अत्यंत गुप्त रहावें या हेतूनें कीं काय, रामस्वामीनें अन्य कोणाही माणसाला आपल्याबरोबर घेतलें नाहीं. त्यामुळें नौकेवर वल्हे मारण्याची कामगिरी रामस्वामीबरोबरच राणी व मोहना या दोघींनाहि पतकरावी लागली; व त्यांनीं




मोहना आणि मीनाक्षी गुप्तपणें प्रयाण करीत आहेत.

ती आनंदानें पतकरली. मोहना वल्हे मारतां मारतां राणीला म्हणाली, " राणीसाहेब, असली कठोर कामगिरी आपल्या वांट्याला परमेश्वरानें आणली ! पण त्याला इलाज नाहीं."

रामस्वामी तेवढ्यांत म्हणाला, " राणीसाहेब ह्या आतां आपल्या अतिविशाल राज्यनौकेच्या कर्णधार होणार आहेत; त्यांनीं या लहानशा नौकेचें कर्णधारत्व पतकरलें यांत वावगें असें कांहींच नाहीं " इतका वेळ सूर्याला गोंडा फुटला नव्हता, किंवा तो अभ्राखालीं झांकला गेला असेल; पण रामस्वामीच्या तोंडून ते शब्द निघावयाला व सूर्यबिंबावरील अभ्राच्छादन दूर व्हावयाला गांठ पडली. सोनेरी बालार्काच्या सौम्य प्रकाशाचें अभ्यंग स्नान त्या नौकेंतील मंडळींना घडूं लागलें. रामस्वामी त्या उगवत्या सूर्यबिंबाकडे अंगुलिनिर्देश करून उल्हसित अंतःकरणानें उद्गारला, "राणीसाहेब, माझ्या भविष्यवाणीला हा शुभशकून घडला पहा ! "

त्या आनंदाच्या प्रसंगाला दृष्ट लागूं नये यास्तव परमेश्वरानें गालबोट लावण्याचें योजिलें होतें म्हणून कीं काय, राणीनें सहज वर महादेवाच्या टेकडीकडे दृष्टि लाविली, तों तेथला अंगावर शहारे आणणारा देखावा पाहून राणीचें अंतःकरण थरारून गेलें. ती कापऱ्या स्वरांत हळहळली, " शिव! शिव ! काय हा अनर्थ ! भगवंता, तूं माझ्या देशाच्या मस्तकीं उमटलेलीं परदास्याचीं पदलांछनें पुसून टाकण्याच्या माझ्या प्रयत्नसिद्धीपूर्वी अशा किती निरपराधी व स्वाभिमानी सुपुत्रांचा बळी घेणार आहेस न कळे! "

राणीचे ते शब्द ऐकून रामस्वामी व मोहना यानींहि वर पाहिलें, तों तेथें कड्याच्या टोंकाशीं शृंखलाबद्ध असे कांहीं अभागी जीव उभे असलेले त्यांना दिसून आले. त्या अभागी जीवांचा आतां इतक्यांत कडेलोट होणार हें ठरल्यासारखेंच होतें. परंतु त्यांच्यासाठीं हळहळण्याइतकी देखील उसंत रामस्वामी, राणी वगैरे मंडळींना नव्हती. रामस्वामीनें प्रसंगावधान राखून त्याच क्षणीं राणी व मोहना यांना बुरखे घेण्याला सांगून म्हटलें, " कर्दनकाळ आपल्यावर घाला घालण्यासाठीं आपल्या पाठीमागून पाळत राखीत आहे हें ध्यानांत ठेवून सावधपणानें वागा."

त्याच वेळीं किल्यावर चंदासाहेबानें कसा अनर्थ मांडिला होता याची कल्पना वाचकांना त्या अभागी बंदिवानांचा पूर्वोक्त ओझरता निर्देश ऐकून आलीच

असेल. चंदासाहेबाच्या मनांत हिंदूंविषयीं इतकी भयंकर तेढ उत्पन्न झाली होती. परंतु या पूर्वींच त्या तेढीचा मासला वाचकांना स्थूलतः कळून चुकला आहे, तेव्हां त्याची येथें द्विरुक्ति करण्याचें कारण नाहीं. ह्या चळ-वळच्या हिंदूंच्या वर्मी घाव घालावा म्हणून चंदासाहेबानें प्रथम तेथल्या महा-देवाच्या देवालयाचा विध्वंस करण्याचें ठरवून तशी जाहीर घोषणा केली आणि ताबडतोब आपल्या विश्वासांतील यवन धर्माधिकाऱ्यांना बोलावून त्या घोषणेची अंमलबजावणी सुरू केली होती. त्या टापूंतील सर्व हिंदूंना अत्यंत पूज्य वाटणारें तें महादेवाचें देवालय गोहत्त्येच्या निषिद्ध प्रकारानें तर भ्रष्ट झालेंच; पण प्रत्यक्ष शिवलिंग देखील त्या निषिद्ध वस्तूनें भ्रष्ट करण्याला यवन धर्माधिकाऱ्यांनीं कमी केलें नाहीं! चंदासाहेब तो सर्व प्रकार समक्ष तेथें उभा राहून आपल्या डोळ्यांदेखत घडवून आणीत होता! इतकेंच काय पण चळवळच्या हिंदूंना दहशत बसावी म्हणून त्यानें किल्ल्यांतील बऱ्याच अधिकाऱ्यांना व प्रमुख नागरिकांना तेथें समक्ष हजर राहण्याला भाग पाडलें होतें. सांगकाम्या मजुरांचा एक मोठा ताफा हातांत खोरीं व फावडीं घेऊन वरिष्ठांच्या हुकूमाबरोबर तें देवालय जमीनदोस्त करण्यासाठीं उभा होता. परंतु तसें नव्हे, खरें बोलावयाचें तर त्या गरीब मजुरांवर असा आरोप एकाएकीं करणें बरें नाहीं. केवळ त्या देवालय–विध्वंसाच्या कार्या-साठीं त्या अजाण लोकांना तेथें सरकारी अधिकाऱ्यांनीं वेठीला धरून आणलें असेल, पण आपणांला आतां कोणतें काम करावयाचें आहे, याची त्यांना खरोखर कल्पनाच नव्हती. ते इतर हिंदूंबरोबरच विस्मयचकित चित्तानें तेथल्या एकंदर प्रकाराकडे लक्षपूर्वक पहात उभे होते. थोड्या वेळानें चंदासाहेबाच्या हुकुमावरून शिवलिंग भ्रष्ट करण्यासाठीं कांहीं यवन पुढें सरसावले; त्यावेळीं मात्र तेथल्या सर्व हिंदूंच्या अंगावर कांटा उभा राहिला व कांहीं प्रमुख हिंदूंनीं तर चंदासाहेबाच्या हातांपायां पडून तसा अनर्थ न करण्याबद्दल त्याला विनवलेंही. परंतु चंदासाहेबानें त्यांना 'माझ्या तोंडून निघालेले शब्द तडीला गेलेच पाहिजेत. चंदासाहेबाचे शब्द म्हणजे वाऱ्यावरची फुकाची बडबड नव्हे अशी सर्व लोकांची खात्री झाली नाहीं तर माझा दचक येथल्या लोकांवर राहाणार नाहीं; यास्तव मला यावेळीं अंतः-करण कठोर करून या सर्व गोष्टी पार पाडल्याच पाहिजेत. असें निक्षून

सांगून आपला हेका चालविला. आणखी अंमळशानें जेव्हां त्यानें देवालयाच्या गाभाऱ्यांतील शिवलिंग खणून काढण्याविषयीं वेठीच्या मजुरांना आज्ञा केली. तेव्हां ती ऐकून तेथल्या सर्व हिंदूंच्या—त्या पोटार्थी मजुरांच्याही हृदयांवर वज्राघात झाल्यासारखें झालें. त्यांनीं त्याच क्षणीं आपलीं हत्यारें खालीं ठेवलीं आणि हात जोडून सांगितलें, "मालिक असलें अधमपणाचें कृत्य आपण आम्हांला करावयाला सांगूं नका. आमच्या देवाची आम्ही अशी विटंबना केली तर आमच्या हिंदु या थोर नांवाला काळोखी लागेल. आम्ही आपली अन्य काय वाटेल ती सेवा करूं, परंतु आमचा देव, आमचा धर्म आणि आमची अब्रू यांवर घाला घालण्यासाठीं साक्षात् सैतान पुढें आला तरी आम्ही त्याला डरणार नाहीं व मारूं किंवा मरूं अशा निश्चयानें त्याच्याशीं दोन हात करण्याला आम्ही कमी करणार नाहीं. आम्हांला असल्या आड मार्गानें जाण्याला आपण भाग पाडूं नये."

एखाद्या नवखंड पृथ्वीच्या सम्राटावर, तो खवळलेल्या सागरांतून दिमाखानें आपली नौका हांकीत चालला असतांना वादळामुळें जसा प्रसंग यावा तसाच प्रसंग चंदासाहेबाच्यावर त्यावेळीं ओढवला होता. नवखंड पृथ्वीचा सम्राट झाला म्हणून खवळलेल्या महासागराच्या लाटांनीं त्याची नौका उलथी पालथी करून त्याला जलसमाधी देण्याचें मनांत आणल्यावर त्याची सम्राट्सत्ता तेथें काय कामाला येणार! चंदासाहेबाला त्रिचनापल्लीच्या राज्यांत इतका मग्रूरपणा चढला होता कीं, मी माझ्या शब्दासमोर पंचमहाभूतांनाहि वांकवूं शकेन, असा फाजील आत्मविश्वास त्याला वाटत होता. परंतु तो ज्या सैनिकांवर आपली अबाधित हुकमत गाजवण्यासाठीं दिमाखानें तेथें उभा होता, त्यांनींच त्याची आज्ञा अमान्य करून निस्पृहतेची शिकस्त केल्यावर त्यांना पुन्हां हुकूम करण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं. पुन्हां हुकूम करणें बाजूलाच राहिलें, आतां त्या बिथरलेल्या लोकसमूहांत एकट्यानें उभें रहाणें देखील चंदासाहेबाला धोक्याचें वाटूं लागलें. मनांतून तो मारे खूप दांत ओठ खात होता कीं, जरा संधि सांपडतांच मी या सर्व बंडखोरांचा नायनाट करून टाकीन आणि यांच्या घरादारावरून गाढवाचा नांगर फिरवून त्यांचें एकहि घर अथवा देवालय नांवालादेखील उभें राहूं देणार नाहीं. परंतु ह्या सर्व गोष्टी तेथून स्वतः तो बचावून गेल्यानंतरच्या होत्या. हा विवेक

त्याच्या डोक्यांत आला व तो एक चकार शब्दहि न बोलतां तेथल्या मंडळींना तेथेंच सोडून तडक माघारा वळला.

"हा दुखावलेला सर्प फोंफावत दूर निघून जात आहे, हा केव्हां घात करील याचा नियम नाहीं." त्या बंडखोरांपैकीं एकजण दुसऱ्याच्या कानाशीं लागून म्हणाला. दुसरा तेंच तिसऱ्यापाशीं बोलला. तिसरा चौथ्यापाशीं बोलला. असा हां हां म्हणतां त्या गोष्टीचा पराचा पारवा होऊन, चंदासाहेब झाल्या अपमानाचा सूड उगविण्यासाठींच रागानें फणफणत चालला आहे अशा समजुतीनें तेथल्या सर्व हिंदूंचीं अंतःकरणें घेरून टाकिलीं. चंदासाहेबाच्या अंगीं इतका दुष्टपणा असल्याबद्दल कोणालाहि शंका नव्हती; व आपण त्याची आज्ञा अमान्य केल्याबद्दल तो आपल्या सर्वांचें वाटोळें करणार असें तेथला प्रत्येक हिंदू ओळखून चुकला होता. पण एकदां सर्वस्व मातीला मिळणार अशी खात्री झाल्यावर त्या लोकांना भीति बाळगण्याचें कांहींच कारण उरलें नाहीं. 'आपण केलें यापेक्षां कांहींहि अधिक केलें नाहीं तरीहि आपली वाताहत करण्याला तो चांडाळ कमी करणार नाहीं, मग मरावयाचें तर शक्य तितकी आपल्या देशाची आणि धर्माची सेवा बजावून कां मरूं नये?' अशा निर्धारानें तो मजुरांचा तांडा हातांतील हत्यारें खांद्यावर टाकून चंदासाहेबाला तडक आडवा गेला आणि एकमुखानें त्याला म्हणाला, "आपण महादेवाच्या देवालयाला किंचित् देखील धक्का लावणार नाहीं असें आश्वासन दिल्याशिवाय आम्ही आपल्याला एक पाऊलदेखील पुढें टाकूं देणार नाहीं."

चंदासाहेबानें एकंदर रागरंग पाहून निरुपायानें तसें आश्वासन दिलें व आपला मार्ग एकदांचा मोकळा करून घेतला, परंतु त्याच वेळीं तो मनांतल्यामनांत हंसून म्हणाला, "मूर्ख! नेभळट! राणीसारख्या चतुर स्त्रीला देखील खोटी शपथ देऊन मी रसातळाला नेलें, तेथें ह्या कुत्र्या-बकऱ्यांना मी थोडीच दाद देतों! थांबा म्हणावें, आणखी एका प्रहराच्या आंत तुम्हांला ह्या चंदासाहेबाचें खरें स्वरूप दिसेल."

चंदासाहेब गेल्यावर आजच्यापुरतें तरी महादेवाच्या देवळांवरील संकट टळलें अशा समजुतीनें सर्व हिंदू माघारे गेले. त्या प्रकाराला घटका दीड घटका झाली असेल नसेल तोंच चंदासाहेबाचे लष्करी यमदूत कांहीं विशिष्ट लोकांच्या घरांना गराडा घालून त्यांना कैद करून महादेवाच्या टेकडीकडे

चालवूं लागले. हे लोक अर्थातच चंदासाहेबाला देवालय–विध्वंसाच्या बाबतींत प्रतिकार करणारांपैकीं प्रमुख होते अशा निवडक लोकांना बंदिवान करून कडेलोट करण्यासाठीं महादेवाच्या टेकडीवर सक्त लष्करी पहाऱ्यांत उभें करण्यांत आलें, त्याच वेळीं राणी, मोहना व रामस्वामी नौकेंतून जात असल्यामुळें त्यांना तो भयंकर देखावा दिसला.

त्या बंदिवानांची पुढें काय दशा झाली असेल ?

# प्रकरण १५ वें

# प्रसादचिन्हांचा सुगावा



सातारा व त्रिचनापल्ली एथील घडामोडींचा आपणाला स्थूलत: परिचय झालाच आहे. आतां आपणाला प्रथम तंजावरकडील घडामोडींचा विचार करावयाचा आहे. करुणाराणी आपल्या धर्मपित्याच्या अर्थात् झुंझाररावाच्या आजारीपणामुळें राजाज्ञेनें त्याची अखेरची भेट घेण्यासाठीं गेली, व मानाजीराव देखील त्यापूर्वीच अपरूपाराणीच्या कारस्थानाचा शोध लावण्यासाठीं कोठें तरी बाहेर निघून गेला होता, हें वाचकांना पूर्वीच माहीत झालें आहे. प्रतापसिंह महाराजांनीं संशयग्रस्त चित्तानें करुणाराणी व मानाजीराव यांना पकडून आणण्याचा हुकूम सखोजीला दिल्यानंतर हुकूमाचा बंदा या नात्यानें सखोजीला राजाज्ञेची तामिली करणें प्राप्त होतें. त्यानें त्या कामावर सैनिक रवाना केलेही. करुणाराणीचा सुगावा प्रथम लागावयाचा म्हणजे तिच्या माहेरीं मध्यार्जुनांत अर्थात् झुंझाररावांच्या गांवीं, म्हणून त्या कामगिरीवर निघालेल्या सैनिकांनीं प्रथम मध्यार्जुनाला वेढा दिला. परंतु तेथें झुंजाररावाच्या घरीं जाऊन पाहतात तों तेथें झुंजाररावहि नाहीं आणि करुणाराणीहि नाहीं ! वास्तविक राजकारणांत लक्ष घालण्याचें काम सैनिकांचें नव्हे हें जरी खरें, तरी नजरेपुढून किंवा कानांवरून जाणाऱ्या गोष्टींत निष्कारण मन घालण्याचा मोह मनुष्याला कधीं आंवरत नाहीं, हा मनुष्यमात्राचा स्वभावसिद्ध गुणच आहे. कोणी पाहिजे तर त्याला चौकसपणा म्हणावा किंवा कोणी दुर्गुण म्हणावा. पण आहे हें असें आहे. झुंजारराव व करुणाराणी तेथें न सांपडतांच त्या सैनिकांच्या तुकडीवरील म्होरक्याला सकृद्दर्शनीं संशय आला कीं, राणी आणि झुंजारराव हीं दोघेहि महाराजांना संशय आल्याप्रमाणें शत्रूला सामील झालीं असलीं पाहिजेत खास ! आणि झुंजाररावाच्या आजारीपणाचा खोटा बोभाटा करण्यांत तरी येन केन प्रकारेण करुणेला तंजावरच्या राज्यांतून बाहेर बोलावून घेण्याचा त्याचा डाव असावा. ताबडतोब त्या म्होरक्यानें गांवांत आपल्या सैनिकांमार्फत झुंजाररावाविषयीं

कसून चौकशी चालविली, तेव्हां करुणाराणी चार-पांच दिवसांपूर्वी तेथें आल्याचें व तिच्यासह झुंजारराव कोठें तरी बाहेर गांवीं निघून गेल्याचें त्यांना कळून आलें.

तरीहि ते सैनिक आणखी एक सबंध दिवस तेथें त्या मंडळींचा शोध करीत व आल्यागेल्यावर पाळत ठेवीत राहिले होते. इतकें करूनहि कांहीं तपास लागत नाहीं असें पाहतांच त्यांनीं आपसांत विचारविनिमय करून तर्क केला कीं, 'ज्या अर्थी झुंजारराव येथें नाहीं व राजवाड्यांतील प्रासादिक तरवारीं-सह करुणा राणीहि बेपत्ता झाली आहे, त्याअर्थी कोणा तरी शत्रुपक्षाच्या माण-साशीं संगनमत करण्यासाठीं तीं दोघें गेलीं असलीं पाहिजेत हें उघड आहे.' चंदासाहेबानें प्रतापसिंहाला लिहिलेलें धमकीवजा पत्र त्या सैनिकांना माहीत होतें. त्यामुळें करुणा राणी, झुंजारराव व मानाजी ही मंडळी चंदासाहेबाला सामील आहेत कीं काय, अशी शंका सकृतदर्शनीं त्यांच्या मनांत आली व त्यांनीं त्या रोंखानें तपास करण्याचें ठरविलें. परंतु प्रवासांत त्यांच्या अनुभवाला जो प्रकार आला तो अगदींच निराळा. त्रिचनापल्लीच्या रोंखानें मजल दर-मजल करीत ते सैनिक चालले असतां त्यांना एका एकान्तवासाच्या ठिकाणीं भर जंगलांत कोणी तरी माणूस वस्ती करीत असल्याची शंका आली; तसेंच आपलीसुद्धां शत्रूला शंका येऊं नये म्हणून ते सैनिक आपल्या सेनापतीच्या आज्ञेवरून दहा दिशांना पांगून त्या एकांत स्थलाच्या कारस्थानाचा सुगावा घेऊं लागले. तोंच अपरूपा राणी आणि कोयाजी ही कारस्थानी जोडी आपल्या थोड्याशा अनुचरांसह तेथें थांबून कांहीं खलबत करीत आहेत असें तंजावर-कडून आलेल्या मुख्य सैनिकाच्या निदर्शनाला आलें. त्यानें अत्यंत सावध-पणानें वेषांतर करून त्या वसतिस्थानांत प्रवेश मिळविला. त्यामुळें त्याला त्यांचें खलबत ओळखण्याचा मार्ग बराच मोकळा झाला. आपणाविषयीं कोणालाहि संशय येऊं नये म्हणून त्या म्होरक्या सैनिकानें आणखी थोडें धाडस करून आपण अपरुपा राणीचे पक्षपाती आहोंत असें नाना उपायांनीं तेथल्या मंडळींना भासविण्याला कमी केलें नाहीं. त्याला तेथें प्रवेश मिळाला त्यावेळीं अपरूपाराणी आणि कोयाजी घाटगे यांचें पुढीलप्रमाणें संभाषण सुरूं असलेले त्याला ओझरतें ऐकावयाला मिळालें. कोयाजी म्हणाला, "मी चंदासाहेबाची भेट घेऊन त्याला आपण दिलेली प्रासादिक तरवारींची देणगी

देऊन आलों आहें, व त्यानेंहि आपल्या इच्छेप्रमाणें प्रतापसिंहाच्या राज्याचा नायनाट करून सयाजीरावाला तंजावरच्या गादीवर बसविण्याचें कबूल केलें आहे. अर्थात् तो एक प्रश्न मिटला."

राणी म्हणाली, "पण मुरारराव घोरपड्यासारखा आपला जबरा शत्रू बलवत्तरपणें आजूबाजूला थैमान घालीत आहे त्याची वाट काय ?"

कोयाजी म्हणाला, "त्याचाहि बंदोबस्त चंदासाहेबानें अगदीं बेमालूमपणें केला आहे. इतक्यांत मुरारराव घोरपडे चंदासाहेबानें फेंकलेल्या कारस्था-स्थानाच्या जाळ्यांत अडकून पडला असेल अथवा पडेल. त्याप्रमाणेंच मराठ्यांच्या फौजेची छावणी शिवगंगेला आहे, तिची पांगापांग करण्याची मीं एक अजब युक्ति चंदासाहेबाला सुचविली आहे. ती जर अंमलांत आली तर आपणाला मराठ्यांच्या सैन्याची व सेनापतीची भीति बाळगण्याचें लव-मात्र कारण नाहीं. सुदैवानें रघोजी भोंसले वगैरे मंडळी साताऱ्याकडे गुंतलीं आहेत."

राणी म्हणाली, "पण ती मंडळी लवकरच नव्या तयारीनें इकडे येतील असें मला वाटतें. चंदासाहेबाच्या मनांत तंजावरच्या गादीविषयीं धुमसत असलेला द्वेषभाव प्रतापसिंहाला पूर्वींपासून माहीत आहे व त्यानें तसाच प्रसंग पडला तर चंदासाहेबाचा प्रतिकार करण्यासाठीं साताऱ्याला जासूद पाठवून मदतीची योजनाही केली आहे."

"तसें असलें तरी कुठें सातारा आणि कुठें तंजावर ! एवढा मोठा मुलूख तुडवीत मराठे इकडे येईतों त्यांना मधल्या मध्यें गांठण्याची युक्ति आम्हांला सुचली नाहीं तर आम्ही कारस्थानीं माणसें कसलीं! राणीसाहेब, आपण पूर्णपणें निश्चिंत असा. आगीच्या एका ठिणगींत ज्याप्रमाणें ब्रम्हांडाचें भस्म करण्याचें सामर्थ्य असतें त्याप्रमाणें या कोयाजी घाटग्याच्या बचकभर मेंदूंत ब्रह्मांडाची उलथापालथ करण्याच्या इलमा ओतप्रोत भर-लेल्या आहेत. फक्त मला चिंता आहे ती करुणाराणी आणि मानाजीराव यांचीच. मानाजी मूळपासून आपणाला पाण्यांत पहातो, आणि करुणा राणीवर त्याचें विशेष वजन आहे. तीं दोघें देशांतल्या देशांत जर ढवळाढवळ करूं लागलीं, तर मात्र आपणाला आपला कार्यभाग साधा-वयाला थोडेसें जड जाईल. कारण आपणाविषयीं काय किंवा माझ्याविषयीं

काय लोकमत फारसें शुद्ध नाहीं, त्याचा फायदा घेऊन मानाजी आपणांसमोर दंड ठोकून उभा राहूं शकेल."

अपरूपा राणी खदिरांगारांसारखे डोळे लाल करून तरवारीच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण वाणीनें उद्गारली. "मानाजी दंड थोपटून आमच्या समोर उभा राहिला तर त्याचे दंड मोडून त्याला जमीनदोस्त करण्याला ही अपरूपाराणी माघार घ्यावयाची नाहीं. करुणा तर बोलून चालून भाबडी पोर आहे. तिच्या आयुष्याला मीं जी चूड लाविली आहे ती न विझतां तिचा बळी घेईल याविषयीं मला मुळींच शंका नाहीं, पण इतकें कशाला? झुंजारराव, मानाजी व करुणा यांना पकडण्याचा हुकूम प्रतापसिंहानें पूर्वींच सोडला आहे. ती जाऊन कोठें जाणार? माझे हेर त्यांच्या पाळतीवर आहेत. ती सप्तपाताळांत लपून बसली तरी तेथवर तलास लावून राजशासनाच्या फांसावर त्यांना लटकावण्याला पुरेसें सामर्थ्य माझ्या कारस्थानांत आहे.

हें संभाषण ऐकून त्या सैनिकाच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले. त्याच्याचित्तवृत्तींत एकाएकीं एवढा जबरदस्त फरक घडून आला कीं त्याच्यानें तेथें शांतपणें बसवेना देखील. तो कसल्याशा जोमदार कल्पनेबरोबर तीरासारखा तेथून बाहेर निसटला व शून्य चित्तानें मार्गांतून एकएक पाऊल टाकीत मंद गतीनें चालूं लागला. "अपरूपाराणी इतकी पाषाणहृदयी आहे काय; आणि कोयाजी तिचा साथीदार. करुणाराणीसाहेबांना संकटाच्या गर्तेत लोटण्यासाठीं यांनींच हें कृष्ण कारस्थान रचिलें असें जर महाराजांना कळलें, तर राणीसाहेबांवरचें संकट टळून त्या अपराध्यांना योग्य शासन व्हावयाला उशीर लागणार नाहीं. पण ही कामगिरी कोणीं करावी! माझ्यासारखा सामान्य सैनिक महाराजांपाशीं जाऊन त्यांना हा प्रकार सांगूं लागला तर महाराज त्यावर विश्वास कसा ठेवतील? बरें; महाराजांना न सांगावें तर ही दुष्ट जोडी राणीचा व त्याबरोबरच महाराजांचाहि समूळ सत्यानाश केल्याखेरीज रहाणार नाहींत. तो दीड दमडीचा कमअस्सल सयाजी राजवाड्यांतील एका बटकीचा पोर तंजावरच्या गादीवर बसलेला ह्या कुलटेला पाहवतो, यावरून मला संशय येतो कीं, खऱ्या राजवटीचा लवलेशहि या चांडाळणीच्या अंगीं नसावा. तंजावरच्या सबंध राजकारणाची आजवर वाताहात करूनहि हिचें समाधान झालें नाहीं, म्हणून ही आतां परक्या शत्रूला

सामील होऊन तंजावरच्या राज्याला कायमची मूठमाती देऊं पहात आहे! पण म्हणावें, तंजावरची हिंदु रयत असल्या कुटिल कारस्थानांत सहज फंसली जाण्याइतकी भोळसट किंवा प्रमादकारक राजाज्ञेला बळी पडण्याइतकी षंढ खास बनली नाहीं. " तो मध्येच एकाएकीं थांबला आणि डोकें खाजवीत स्वत:शीं पुन्हां विचार करण्यांत गढून गेला, " मीं याच पावलीं माघारा जाऊन त्या दुकलीला ठार केलें तर काय होईल ? महाराज, करुणा राणीसाहेब यांच्यावरचें एक जिवंत संकट टाळल्यासारखें होणार नाहीं काय ? " तो पुन्हां थांबून पुन्हां स्वत:शीं विचार करूं लागला, " पण ही एक दुक्कल जगांतून नाहींशी झाल्यानें महाराजांची संशयनिवृत्ति कशी होणार ? आणि त्यांची संशयनिवृत्ति झाली नाहीं तर राणीसाहेबांवरचें संकट कसें टळणार ? महाराज इतके ज्यासाठीं संतापले व निष्ठुर बनले त्या प्रासादिक तरवारींचाहि सुदैवानें आतां तपास लागल्यासारखाच आहे. परंतु ही अपरूपा अवदसा महाराजांच्या विश्वासांतील पडली; तिला ठार मारून, तिचा अपराध मी महाराजांपाशीं कसा शाबीत करूं ! चंदासाहेबापाशीं प्रासादिक तलवारी आहेत असें मीं टाहो फोडून महाराजांना सांगितलें तरी त्यांना तें खरें वाटणार नाहीं; उलट माझ्यावर मात्र करुणा राणीसाहेबांना फितूर असल्याचा आरोप करण्यांत येईल आणि हकनाहक माझा संशयाच्या भरांत बळी घेतला जाईल. देशापरी देशाची सेवा घडणार नाहीं, राजापरी राजाची सेवा घडणार नाहीं, राणीपरी राणीचें रक्षण हातून होणार नाहीं. अशा कवडीमोलानें स्वत:चें जीवित विकण्याइतका मी टाकाऊ मनुष्य आहें काय ? " हे शब्द मनाशीं उच्चारतांना त्या सैनिकाचे डोळे विस्फारित झाले होते व सर्वांग पुलकित झालें होतें. जणूं काय एखादी दिव्य शक्ति आपल्या अंगांत उत्पन्न झाली आहे, अशा आत्मविश्वासानें उभा राहून तो परिस्थितीचें अंतर्निरीक्षण करीत होता. ह्या विचारांच्या ओघाबरोबर आपण कोठें वहात चाललों आहोंत व आतां कोठें थांबलों आहोंत याचें देखील त्याला भान नव्हतें. तो स्वत:ला पूर्णपणें विसरला होता. आणखी थोडा वेळ तो तसाच गूढ विचारांत रंगलेला असतांनाच रस्त्यानें पुढें पुढें चालत गेला तोंच एका वृक्षाच्या बुंध्याशीं त्याला कसली तरी छाया दिसली व कांहींशीं चाहूल लागली. ती रात्रीची भयाण वेळ असल्यानें व ती जागाही निर्जन असल्यानें त्या सैनिकाला तो संशयित प्रकार पाहून

दचकल्यासारखें झालें. तो मनांत म्हणाला, "येथें कोणी भूतपिशाच्च तर नसेल कीं शत्रूचा कोणी मनुष्य येथें दबा धरून तर बसला असेल!" असे प्रश्न मनाशीं विचारीत विचारीत तो पूर्ण भानावर येऊन समोर पाहूं लागला, तों त्याला दिसून आलें कीं आपल्याला जी छाया दिसली ती केवळ छाया नव्हती, तो एक घोडा वृक्षाच्या बुंध्याशीं बांधलेला होता.

अर्थात् येथें जवळपासच त्या घोड्याचा मालक असला पाहिजे, असें त्या सैनिकाच्या मनानें घेतलें व तो कोण असावा हें जाणण्याची जिज्ञासा त्याच्या मनांत उत्पन्न झाली. त्याबरोबर, तो जर शत्रू असेल तर मात्र आपणांवर कठीण प्रसंग ओढवला, या भीतीनेंहि त्याच्या मनांत थोडीथोडी कालवा-कालव सुरू केली. त्याला एकदां मन सांगे पुढें जावें, तेथें कोण आहे हें पहावें व कोणी नसल्यास त्या घोड्यावर मांड टाकून आपल्या मकाणाकडे निघून जावें. तो सैनिक बराच श्रमलेला असल्यानें श्रमपरिहाराचा हा उपाय त्याला प्रथम सुचला. पण त्याबरोबरच आपण पुढें गेल्यास आपल्या प्राणांवर तर बेतणार नाहीं ना, असा प्रश्न त्याला तेंच मन निराळ्या भाषेंत विचारूं लागलें. आतां काय करावें आणि काय न करावें अशा विचारानें त्याचें मन गोंधळून गेलें. तोंच त्या झाडाच्या बुंध्याजवळून कोठून तरी त्याला खड्या आवाजांत सवाल केला गेला, "कोण आहे. ?"

तो प्रश्न ऐकून त्या सैनिकाच्या मनाला अंमळ धक्का बसल्यासारखा झाला. तो जरी भित्रा नव्हता तरी अचानक प्राप्त झालेल्या बिकट परिस्थिती-मुळें तो गोंधळल्यासारखा झाला एवढें खरें. तो जागच्या जागीं स्तब्ध उभा राहिलेला पाहून त्याला पुन्हां पूर्ववत् सवाल टाकला गेला, "तूं कोण आहेस? लवकर उत्तर दे, नाहींतर प्राणाला मुकशील."

पूर्वीचा तोच हा देखील स्वर खरा, परंतु पूर्वी त्या सैनिकाला त्याची जी ओळख पटली नव्हती ती आतां ओझरती तरी पटली. तो चार पावलें पुढें येऊन चौकशी करणार, तोंच हातांत तलवार घेऊन एक धिप्पाड पुरुष अक-स्मात् त्याच्या समोर येऊन उभा राहिला व तलवार उगारून दरडावून त्याला विचारूं लागला, "तूं कोण आहेस ? "

"कोण मानाजीराव ? " त्या सैनिकानें आश्चर्यपूर्ण पण कांहींशा निर्भय वृत्तीनें विचारलें. त्या प्रश्नांत असें काय अजब दैवी सामर्थ्य होतें न कळे,

समोरच्या तरुणाच्या हातांतील तलवार आपोआप हळुहळू खालीं आली व तो त्या सैनिकाकडे निरखून पाहूं लागला.

अंमळशानें त्या तरुणानें—परंतु तो मानाजीराव होता हें आतां आपणाला माहीत झालेंच आहे. त्याअर्थी त्याला त्याच नांवानें ओळखण्याला आपणाला हरकत नाहीं. मानाजीरावानें त्या सैनिकाकडे कांहीं क्षण निरखून पहात पूर्वीपेक्षां सौम्य शब्दांत विचारलें, "संभाजी, तूं का तो? बहुधा मला करुणाराणीसाहेबांना पकडण्याच्या कामगिरीवर तुझी योजना झाली असेल!"

"पण हें तुम्हीं कशावरून ओळखलें?"

"त्यांत अवघड काय आहे? तुम्ही सयाजीरावाचे पक्षपाती व कोयाजी घाटग्याचे ऋणानुबंधी! तुम्हीं राजांचें अन्न खाऊन त्यांच्या नाशासाठीं झटलां नाहीं तरच आश्चर्य!

"तुम्ही म्हणालां ती गोष्ट खरी आहे. परंतु हा संभाजी मात्र त्याला अपवाद आहे. निदान आतां तरी तो अपवाद ठरला आहे. यापूर्वी मी असल्या हीन कामगिरींत सामील झालों तो केवळ फंसून, पण प्रत्यक्ष महाराजदेखील जिथें कोयाजी आणि अपरूपा राणी यांच्या कृष्ण कारस्थानाला बळी पडले, तिथें माझ्यासारख्या यःकश्चित् माणसाची काय कथा?"

"बरें; आतां मला ही वायफळ गप्पांची लांबड नको आहे. तूं अशा अपरात्रीं इकडे कां व कसा आलास त्याची मला खात्री करून दे, तरच तुझ्या शब्दांवर माझा विश्वास बसेल; नाहींपेक्षां तुला शत्रू समजून मला तुझें पारिपत्य करावें लागेल." मानाजीराव उद्गारला.

"आणि तुम्हांला कालत्रयींहि न मिळणारी माहिती मीं पुरवली आणि त्यामुळें महाराजांच्या आणि राज्याच्या तरणोपायाचा राजमार्ग तुम्हांला सांपडला तर तुम्ही मला काय बक्षीस देणार?" संभाजीनें निर्भयपणें विचारलें. त्याचा हा प्रश्न अर्थातच विनोदाचा होता. त्याच वेळीं त्यानें सखोजीकडून आपली ह्या कामगिरीवर कशी नेमणूक झाली हा वृत्तातही निवेदन केला. सखोजी देखील आपणावर उलटला याचा मानाजीला विस्मय वाटला. पण तो त्यानें बाहेर दाखविला नाहीं. तरी बरें कीं महाराजांचें मन खरोखर किती कलुषित झालें आहे याची संभाजीलाही माहिती नसल्यामुळें तो वृत्तांन्त मानाजीला कळला नाहीं. तो कळला असता तर त्याला पराकाष्टेचा खेद

झाला असता. असो. संभाजी आपण होऊनच पुढें म्हणाला, " पण मानाजीराव, इतर कशावर नाहीं तरी माझ्या अस्सल हिंदुत्वावर—नेकजात मराठेंपणावर तरी तुमचा विश्वास असला पाहिजे. खऱ्या मराठ्याची ओळख खऱ्या मराठ्याला नाहीं, असें आजवर कधीं तरी झालें आहे? अपरूपा आणि कोयाजी यांच्या कृष्ण—कारस्थानाचें बिंग मला अचानक कळून चुकलें आहे. त्यांना पायबंद कसा घालावयाचा याच चिंतेनें मला इतका वेळ घेरलें होतें. तोंच तुम्ही भेटलां, परमेश्वर पावला ! मीं जर त्या दोघांचा बेत आपणाला सांगितला तर त्यांचा या क्षणीं बंदोबस्त करण्याची तुमची तयारी आहे काय ?"

" सांग, मला प्रथम त्यांचा पत्ता सांग. मी पुढच्या सर्व गोष्टी पहातों."

" परंतु त्यांना दुखवणें म्हणजे सर्पाच्या शेपटीवर पाय टाकण्यासारखें आहे हें तुम्ही जाणतांच. जर का तुमच्या हातून त्यांचें पारिपत्य झालें नाहीं, तर तुमची आमची धडगत नाहीं हें पक्कें समजा."

"त्याची काळजी तुला नको. सर्पाशीं खेळतांना त्याचे दांत पाडून खेळावें एवढें व्यवहारज्ञान मला आहे; आणि दांत पाडण्याची कलादेखील मला अवगत आहे. तूं मला फक्त त्यांचा पत्ता सांग म्हणजे झालें."

" चला तर माझ्या मागोमाग." असें म्हणून संभाजी पुढें चालूं लागला. मानाजीरावानें आपला घोडा झाडाच्या बुंध्यापासून सोडून संभाजीच्या मागोमाग आपल्याबरोबर चालविला. बरेंच अंतर चालून गेल्यावर एका पडक्या घराच्या आडोशाला संभाजीनें मानाजीरावाला नेलें व सांगितलें, " आपल्या घोड्याला थोडा वेळ या ठिकाणीं डांबून ठेवा. किंवा असें करा, तुम्ही देखील येथेंच थांबा; मी एकवार चाहूल घेऊन येतों."

संभाजीनें इतका मनमोकळेपणा दाखविला तरी देखील मानाजीराव त्याच्यावर पूर्ण विश्वास टाकण्याला मनापासून राजी नव्हता. न जाणो, हा राणीचा पक्षपाती, राणीला आपल्या आगमनाची खबर देऊन आपणाला गोत्यांत आणणार नाहीं कशावरून? असें स्वतःशीं म्हणून तो संभाजीच्या बरोबर चालूं लागला. त्याला संशय येऊं नये म्हणून मानाजीनें आपल्या कृतीचें समर्थन केलें, " तुझ्याविषयीं जर राणीला संशय आला असेल तर ती तुला दगा दिल्याशिवाय रहाणार नाहीं. अशा वेळीं एकाला दोन माणसें बरोबर असलेली बरीं. चल मीहि तुझ्याबरोबर येतों."

संभाजीनें यावर जास्त आढेवेढे घेतले नाहींत. ते दोघेहि सावधगिरीनें त्या विशिष्ट स्थळीं जाऊन पोहोंचले व जवळच्या गर्द आडींत लपून बसून तेथून त्या मंडळीच्या हालचाली अवलोकन करूं लागले. तोंच ती मंडळी पुढील मकाणाकडे निघण्याच्या तयारींत आहेत असें त्या दोघांना आढळून आलें. त्या ठिकाणीं कांहीं लोकांच्या हातांत मशाली पेटविलेल्या त्या दोघांना दुरून दिसल्या, व अपरूपा राणी आणि कोयाजी हीं दोघेंही दोन घोड्यांवर स्वार झालेलींही त्यांनीं पाहिलीं.

"ही मंडळी तर निघालीं ! आतां कसें करावयाचें ?" संभाजीनें मानाजीला हळूच विचारलें.

"आतां आपण असें करूं, तूं ह्या मंडळींच्या मागोमाग राहून त्यांच्यावर नजर ठेव; तोंवर मी त्यांचा बंदोबस्त करण्याची तजवीज करतों. तुला जर शक्य असेल तर त्यांचा रोख कोणीकडे आहे याची माहिती काढून मला कळव. मी आतां जातों." असें म्हणून मानाजीराव मागें फिरून चपळाईनें आपल्या घोड्यावर स्वार झाला.

"परंतु आतां तुमची माझी भेट पुन्हां कोठें होणार ?" संभाजीनें विचारलें.

"तुझी माझी भेट !" मानाजीराव जातां जातां किंचित् विचार करून उद्गारला, "बहुधा ही मंडळी कांचनगडच्या रोखानें चालली असावी. कारण अशा अपरात्रीं त्यांना अन्य ठिकाणीं जातां येणें शक्यच नाहीं. कांचन-गडचा किल्लेदार अपरूपा राणीचा पक्षपाती आहे हें मला माहीत आहे. तेथें आपल्या कारस्थानाची उभारणी करण्यासाठीं ही सर्व नाठाळ माणसें जमणार असतील असा माझा तर्क आहे. पण तीं कोठेंहि जाणार असलीं तरी तूं कांचन-गडच्या अलीकडे हमरस्त्यावरच एक धर्मशाळा आहे, तेथून उजव्या बाजूला जो मार्ग फुटतो त्या मार्गानें वळलास, कीं तुला पाव कोसाच्या अंतरावर एक देवालय लागेल व त्या ठिकाणीं कांहीं बैरागी धुनी पेटवून बसलेले तुला आढळतील. त्यांना तूं खबर दे म्हणजे मला ती वेळींच मिळेल. तूं शक्य तर तेथेंच थांब, किंवा त्या मंडळीचा अखेरपर्यंत तुला पाठलाग करतां आला तर फारच चांगलें झालें. तुला घोडा पाहिजे असला तर त्या देवालयांतील बैराग्यांना सांग, म्हणजे ते तुझी व्यवस्था करतील. कदाचित् तूं अनोळखी म्हणून ते तुझ्याशीं विश्वासानें बोलणार नाहींत; यास्तव तूं ही खूण आपणापाशीं

ठेव आणि त्यांना ती दाखीव, म्हणजे बिनभोबाट सर्व कामें होतील." असें म्हणून मानाजीरावानें एक खुणेचें चिन्ह आपल्या कमरपटयांतून काढून संभाजीला दिलें. त्या चिन्हावर काय खोदलेलें होतें हें काळोख्या रात्रीं संभाजीला कळण्याला कांहींच मार्ग नव्हता. त्यानेंही तें जाणण्याचा प्रयत्न केला नाहीं. मानाजीरावाला जरी त्याच्याविषयीं संशय वाटत होता, तरी त्याला मानाजीरावाच्या उज्ज्वल राजनिष्ठेबद्दल व विश्वासूपणाबद्दल लवमात्र संशय नव्हता. तो अत्यंत आज्ञाधारक सेवकाप्रमाणें मानाजीची आज्ञा शिरसावंद्य मानून तेथून पुढें निघाला व मानाजीरावानेंहि आपल्या घोडयाला टांच मारली. त्या काळोखाच्या गर्दींत संभाजीनें अनेकवार मागें वळून पाहिलें. परंतु मानाजीरावाचा घोडा कोणत्या दिशेला चालला होता हें कांहीं त्याला कळलें नाहीं. त्यानेंहि त्याविषयीं जास्त उत्सुकता मनांत बाळगली नाहीं. केवळ वरिष्ठांच्या हुकुमाची तामिली करावयाची, यापेक्षां जास्त भानगडींत पडावयाचें नाहीं, अशा शिस्तीचा शिपाईगडी तो होता.

संभाजीच्या मनांतून त्या मंडळीचा तपास काढून, मानाजीरावानें सांगितल्याप्रमाणें इत्थंभूत बातमी काढावयाची होती. परंतु त्याला त्या मंडळीपासून आपलें अस्तित्व गुप्त राखतां आलें नाहीं. त्याला आपल्या मनांतील प्रामाणिकपणा मनांत ठेवून बाह्यात्कारी तरी त्या मंडळीच्या तंत्रानें वागणें प्राप्त झालें.

"संभाजी, इतका वेळ तूं कोठें होतास ?" कोयाजीनें संभाजीला अचानक आलेला पाहून विचारलें.

संभाजीनें प्रसंगावधानपूर्वक उत्तर दिलें, "धनी, मी स्वतःला कांहीं करामत दाखवतां आली तर पहावी म्हणून शत्रूच्या तलासावर गेलों होतों."

"मग, कांहीं तलास लागला का ?" अपरूपाराणीनें उत्सुकतापूर्वक संभाजीकडे पहात विचारलें.

या प्रश्नाला आतां काय उत्तर द्यावें, याविषयीं क्षणभर संभाजीच्या मनांत गोंधळ उडाला. परंतु दुसऱ्याच क्षणाला तो तोंडाला आलें तें कांहींतरी उत्तर देऊन मोकळा झाला, "करुणाराणी व झुंजारराव यांचें वास्तव्य सध्यां कांचनगडावर असावें असा सुगावा मला लागला आहे."

"आम्हांलाहि तोच संशय होता व म्हणूनच आम्हीहि तिकडेच चाललों

होतों. त्याला तुझ्या या बातमीनें बळकटी मिळाली." कोयाजी म्हणाला.

त्या मंडळींना कांचनगडाकडे झुकवून मानाजीरावाच्या हातून त्यांचा परस्पर बंदोबस्त होईल अशी व्यवस्था करावी म्हणून संभाजी सहज कांचन-गडचा उल्लेख करून गेला. परंतु आतां त्याला हुरहूर वाटूं लागली कीं, ह्या मंडळीच्या माहितीप्रमाणें खरोखरच जर करुणाराणी कांचनगडावर असेल, तर तिला ह्या चांडाळाच्या जबड्यांत लोटण्याचें पातक आपणाला लागेल! परंतु एकवार तोंडांतून शब्द गेला, आतां तेथें संभाजीचा तरी काय इलाज होता! त्यांतल्या त्यांत तेवढ्यांत अपरूपाराणीनें कांचनगडच्या रोखानें पुढें जाऊन आपल्या सैनिकांनिशीं गडाची नाकेबंदी करण्याची कामगिरी त्याला सांगितली, तेवढेंच त्याला समाधान वाटलें. आपण जलदीनें पुढें जाऊन जर करुणाराणी तेथें असेल तर तिला ताबडतोब सुखरूपपणें गडाच्या बाहेर काढून देऊं असा त्याचा मानस होता.

परंतु कोयाजीनें त्याला अपशकून केला. त्याला संभाजीविषयीं संशय आला म्हणून कीं काय न कळे, तो मध्येंच म्हणाला, "चल, मीहि तुझ्याबरोबर येतों. न जाणों, किल्लेदार जर करुणा राणीला फितूर झाला असला तर तेथें तुझा एकटयाचा पाड लागावयाचा नाहीं."

आतां प्राप्त परिस्थितीला मुकाटयानें तोंड देणें संभाजीला प्राप्त होतें. लगेच कोयाजी सैनिकांच्या एका तुकडीसह कांचनगडाकडे वळला व संभाजी-लाहि त्याच्या बरोबरच जावें लागलें.

## प्रकरण १६ वें.
# करुणाराणीवर संकट !

कांचनगड वरवर दिसावयाला जरी सामान्य किल्ला होता, तरी त्याला ऐतिहासिक महत्त्व फार होतें. खुद्द किल्ला पहिल्या प्रतीचा लढावू नसला तरी नाकेबंदीच्या दृष्टीनें त्याचें महत्त्व कोणत्याहि पहिल्या प्रतीच्या लढावू किल्ल्याइतकें होतें. दमलचेरीच्या घाटांत* शिरतांना व पुढील प्रवास करतांना, ज्याप्रमाणें तेथल्या स्थायिक सत्ताधाऱ्यांना कांचनगड हा साक्षात् परमेश्वर आपल्या पाठीशीं उभा आहे असें वाटे, त्याप्रमाणेंच शत्रु त्या तोंडानें गड चढून येऊं लागला किंवा विरुद्ध दिशेनें गड ओलांडून येऊं लागला, तर हा प्रत्यक्ष कर्दनकाळ आपला अक्राळविक्राळ जबडा पसरून आपणाला गिळंकृत करावयाला उभा आहे कीं काय, असें वाटून शत्रूची छाती दडपून जाई. तेव्हां थोडयाच दिवसांपूर्वीं दमलचेरीच्या घाटांत मराठे आणि अर्काटचा नबाब यांची जी धुमश्चक्री झाली त्या प्रसंगीं कांचनगड

---

* इ. स. १७४० मध्यें शाहू महाराजांनीं मराठ्यांची जंगी फौज रघूजी भोंसले वगैरे शूर सरदारांच्या नेतृत्वाखालीं कर्नाटकांत अर्काटचा नबाब दोस्तअल्लीखान याच्याशीं सामना देण्यासाठीं रवाना केली. तें सर्व सैन्य त्या वर्षाच्या एप्रिल महिन्यांत अर्काट प्रांतांत येऊन दाखल झालें. तें पाहून नबाब दोस्तअल्लीखान हा मराठ्यांशीं टक्कर देण्यासाठीं कडप्पा आणि अर्काट या दोन जिल्ह्यांच्यामध्यें दमलचेरीचा जो घाट आहे ती सुरक्षित जागा समजून तिथें आपले चार हजार घोडेस्वार व सहा हजार पायदळ घेऊन दाखल झाला. उभय पक्षांचें त्या घाटांत घनघोर युद्ध झालें. त्यामध्यें मराठ्यांनीं विशेष शौर्य गाजविलें व अद्वितीय यश संपादन केलें. नबाब दोस्तअल्लीखान पतन पावून शत्रूच्या हस्तगत झाल्यामुळें त्या सर्व सैन्याची दाणादाण उडून गेली व तें सैरावैरा पळून गेलें. त्यामुळें मराठ्यांना अर्काट प्रांतांत इतस्ततः आपला अंमल बसवतां आला.—इतिहाससंग्रह (तंजावरचें राजघराणें.)

मराठ्यांच्या हातीं आला. त्यापूर्वीं तेथें अर्काटच्या नबाबाची सत्ता होती. तो गड हातचा जाऊं नये म्हणून नबाबानें आपलें सहस्रावधी सैन्य इरेला घातलें व मराठ्यांनींहि त्या गडाचें महत्त्व ओळखून आपल्या नेकजात कडव्या सैनिकांच्या प्राणांची पर्वा न करतां त्यांच्या रक्ता-मांसाचा चिखल करून, किल्ला सर करण्याची वाट बांधून काढली, असें म्हणावयाला हरकत आहीं. नबाबावर विजय मिळवून देण्याच्या कामीं कांचनगडाचा इतका उपयोग झाल्यामुळें मराठ्यांना तो गड आपल्या एखाद्या पुरातन देवालयाइतका पवित्र वाटूं लागला होता.

परंतु पेशवाईतील उलाढालीच्या निमित्तानें, मराठ्यांच्या कर्नाटकांतील सर्व हालचाली थांबून त्यांच्या सैन्याचा तळ शिवगंगेला पडल्यापासून भुरट्या शत्रूंना पुन्हां दमलचेरीच्या घाटांत व त्याच्या आजूबाजूला दंगामस्ती करावयाला हळुहळू फावूं लागलें होतें. त्यांतच कांचनगडच्या बाटग्या मुसलमान किल्लेदाराच्या नीचवृत्तीची भर पडून मराठ्यांचें—नव्हे, हिंदवी—सर्वस्वाचें काळीज पोंखरून खाणाऱ्या शत्रुशक्तीला तेथें हळुहळू आपलें ठाण मांडण्याला अवकाश मिळाला होता. मीरकासीम हा वास्तविक केवळ मराठ्यांच्या जिवावर, आणि तोही दमलचेरीच्या घाटांतील लढाईंत उदयास आलेला. त्यानेंच घाटांतील अनेक गुप्त माऱ्याच्या जागा व महत्त्वाच्या गुप्त वाटा मराठ्यांना दाखवून देऊन त्या मोबदल्यांत तेथली किल्लेदारी मिळविली होती. पण मराठ्यांना त्या दगलबाज मीरकासीमचा खरा स्वभाव काय माहीत! तो जो मूळचा मराठा असतांना बाटून मुसलमान झाला होता, तो केवळ नबाबाची मर्जी संपादन करून मानमान्यता मिळवण्यासाठीं. त्याचीच गोष्ट कशाला? आणखी असेच कांहीं कुऱ्हाडीचे दांडे गोताला काळ होऊन बसलेले होते त्यांतला तो एक. त्यानें बाटून त्या बाटगेपणाच्या जोरावर नबाबाच्या पदरीं शिलेदारी मिळवली होती. मराठे आणि नबाब यांचा सामना जुंपून त्यांत नबाबाची धडगत नाहीं असा रागरंग दिसूं लागतांच तो विश्वासघातकी लगेच नबाबाच्या विरुद्ध मराठ्यांना सामील झाला, आणि आतां मराठेहि किल्ला आपल्या स्वाधीन करून तेथून साताऱ्याकडे निघून गेलेले पाहतांच त्याला अशी हांव उत्पन्न झाली होती, "आपण जन्मभर एवढ्या लहानशा किल्ल्याचे किल्लेदारच कां म्हणून रहावयाचें ! केव्हांपासून नबाब तिकडे फजीत पावून

हाय हाय करीत बसला आहे व मराठे घरचें भांडण भांडण्यासाठीं कर्नाटकांतील मोहीम अर्धवट सोडून साताऱ्याकडे निघून गेले आहेत. यावेळीं आपणांला लहानसें स्वतंत्र राज्य स्थापून दमलचेरीचा छोटासा सुलतान व्हावयाला ही संधि फार नामी आहे." आणि त्यानें त्या रोंखानें आपले सारे उपद्व्याप चालविले होते. तो वृत्तान्त वाचकांना पुढें कळेलच. तूर्त येथें एवढें निवेदन केलें म्हणजे पुरे कीं, कोयाजी आणि अपरूपाराणी यांच्या विषयींचा मानाजोरावाचा तर्क कांहीं खोटा नव्हता. त्याच्या अटकळीप्रमाणें ती मंडळी रातोरात नेमकी कांचनगडच्या रोंखानेंच गेली होती.

त्यावेळीं कांचनगडावर त्या काळोख्या रात्रीलाही लाजविणारा निराळाच भयंकर काळोखा प्रकार चालला होता. पूर्वोक्त दुरात्मा मीरकासीम एका असहाय सुंदरीला किल्ल्यांत कोंडून तिच्या अब्रूवर घाला घालण्यासाठीं टपून बसला होता. मात्र बाहेरच्या मंडळींना त्या प्रकाराची दाद लागणें शक्य नव्हतें. राजे लोकांच्या राजवाड्यांत काय, किंवा अशा थोरामोठ्यांच्या घरांत काय, नेहमींच अशा कांहीं अनन्वित गोष्टी घडत असतात कीं बाहेरच्या जगाला त्याची दादही नसते. त्यांतलाच प्रकार त्या रात्रौ चालला होता. कोयाजी व अपरूपाराणी यांच्या अटकळीप्रमाणें करुणाराणी व झुंजारराव दोघेंहि त्या किल्लेदाराच्या आश्रयाला आल्याला पुरे चार प्रहरहि लोटले नाहींत, तोंच मीरकासीमनें करुणाराणीचा छळ मांडिला होता. त्या छळाचें वर्णन स्वतःच्या शब्दांत देण्यापेक्षां त्यांच्या संभाषणांतच देणें इष्ट होय.

करुणाराणी व झुंजारराव हीं अकस्मात् घाबरींघुबरीं होऊन किल्ल्यावर जीं आलीं तीं मराठ्यांच्या आधाराला म्हणून आलीं; आणि मीरकासीमनें त्यांना, आपण मराठ्यांचा किल्लेदार या नात्यानेंच आश्रय दिला. "इतकें भिण्याचें कारण काय?" असें विचारतां झुंजाररावानें तंजावरचे सैनिक कांहीं भयंकर गैरसमजुतीनें आपल्या व करुणेच्या मागें कसें हात धुवून धांवत आहेत हें त्याला निवेदन केलें. आणि मीरकासीमनें शाब्दिक सहानुभूति दाखवून त्यांचें रक्षण करण्याचें अभिवचन देऊन त्यांचें तोंडदेखलें समाधानहि केलें. पण रात्रीच्या वेळीं अकस्मात् तो सैतान चार सशस्त्र सैनिकांना बरोबर घेऊन, करुणाराणी व झुंजारराव यांच्या वसतिस्थानाकडे आला, तेव्हां सहाजिकच त्या दोघांना वाटलें कीं हा काय प्रकार आहे!

" मीरकासीम, तूं हें काय आरंभिलें आहेस ? " करुणाराणीनें विचारलें.

पण मीरकासीमनें करुणाराणीला उत्तर न देतां आपल्या सैनिकांना एकदम आज्ञा केली, " याला कैदखान्यांतील अंधारकोठडींत नेऊन डांबून ठेवा. "

करुणाराणी व झुंजारराव यांना त्याचा अर्थच कळेना. तीं जास्तच घाबरलीं. झुंजारराव शांतपणानें मीरकासीमला म्हणाला, " मीरकासीम, हें कोणींतरी कांहींतरी तुझ्या कानांत विष ओतलेलें दिसतें. परंतु तूं असा अविवेक करणें बरें नाहीं. "

" थेरड्या, मीं काय करावें आणि काय न करावें हें मला चांगलें कळतें. तुझ्यासारख्या निमकहराम फितुरानें तें मला सांगावयाला नको आहे. तूं जास्त बोलशील तर तुझी जीभ छाटून कलम केली जाईल, लक्षांत ठेव. तूं आजपासून माझा बंदिवान् आहेस, व तंजावरच्या राजाकडून तुझा न्याय होईपर्यंत तुला माझ्या बंदिवासांतच रहाणें प्राप्त आहे. " असें म्हणून त्यानें आपल्या शिपायांना झुंजाररावाला बंदिवान् करून अंधारकोठडींत नेण्याची पुन्हां आज्ञा केली. त्या आज्ञेची अंमलबजावणीहि तेव्हांच झाली. प्रतापसिंह महाराजांकडून किल्ल्यावर बंदोबस्ताचा हुकूम आला असावा असें मनांतल्या मनांत उमजून, झुंजारराव कर्माला दोष देत तेथून जातां जातां एकवार अश्रूंनीं डबडबलेल्या नयनांनीं करुणेकडे पाहून उद्‌गारला, " करुणे, आतां तुझें रक्षण करणारा एक परमेश्वर मात्र आहे. माझ्याकडून जेवढे प्रयत्न करण्यासारखे होते तेवढे मीं केले. परंतु आपलें दुर्दैव त्या प्रयत्नांपेक्षां बलवत्तर ठरलें, त्याला आपला काय इलाज ! आतां परमेश्वराचें नांव घे; तो तुला अशा संकटाच्या वेळीं हात देईल. " झुंजारराव आणखीहि कळवळ्याचे शब्द बोलला असता, परंतु तेवढ्यांत शिपायांनीं त्याला फरफटत ओढीत नेल्यामुळें त्याचा नाइलाज झाला. तरीहि जातां जातां तो अंतःकरणाच्या ओढीनें आपलें सर्व सामर्थ्य नेत्रांत एकवटून करुणेकडे पहात होता व करुणाहि तशाच जिव्हाळ्याच्या ओढीनें त्याच्याकडे पहात अश्रु ढाळीत होती. एखाद्या जीवाचे अवयव छिन्नविछिन्न करून अलक अलग करतांना त्या जीवाला ज्या प्रकारच्या वेदना होत असतील त्या प्रकारच्या वेदना करुणा व झुंजारराव यांच्या संलग्न आत्म्याची चिरफाड चालली असतां त्या दोघांना होत असतील. परंतु त्यांची दाद कोण घेणार !

मीरकासीम निश्चल दगडी पुतळ्याप्रमाणें करुणेसमोर उभा होता. त्याच्या मनावर त्या पाषाणालाहि पाझर फोडणाऱ्या करुणामय दृश्याचा यत्किंचितहि परिणाम झाल्याचें करुणेला आढळेना. परंतु तिला वाटलें, महाराजांचा सक्त हुकूम आला असेल, आणि त्या हुकुमाची तामिली मीरकासीम करीत असेल. तो हुकुमाचा बंदा पडला; त्याला यांत दोष देण्यांत काय अर्थ ! तरीहि ती केंविलवाण्या स्वरानें त्याला म्हणाली, "मीरकासीम, या बाबतींत तुझा दोष नाहीं हें जरी खरें, तरी तूं माझ्या शब्दावर विश्वास ठेवशील तर मी तुला ईश्वरसाक्ष सांगतें कोणीतरी महाराजांचें मन कोणीं कलुषित केल्यामुळें त्यांचा माझ्याविषयीं आणि बावांच्या विषयीं गैरसमज झाला असावा; त्याचा हा परिणाम असावा. महाराजांच्या ठायीं तुझी इतकी निस्सीम निष्ठा आहे यांत मला आनंदच आहे. पण मी देखील त्याच महाराजांची अर्धांगी—तंजावरची राणी—तुझी स्वामिनी आहें. तशांत मी यावेळीं असहाय आहें. राणी ही रयतेची माय असते, हें नातें स्मरून निदान तूं मला आपल्या पाठीची बहीण मानून तरी पाठीशीं घातलें पाहिजेस."

"असल्या मायावी बोलांनीं फंसण्याइतका हा मीरकासीम कच्च्या दिलाचा नाहीं. राणीसाहेब, झाडावरून गळून पडलेलें फळ ज्याप्रमाणें पुन्हां झाडाला चिकटूं शकत नाहीं त्याप्रमाणेंच तंजावरच्या राजसिंहासनावरून कोणत्याहि कारणानें एकवार स्थानभ्रष्ट झालेली राणी पुन्हां त्या राणीपदाला पोंचं शकणार नाहीं, तुम्ही पक्कें लक्षांत ठेवा, एखादी निराधार सामान्य स्त्री आणि तुम्ही यांत आतां रेंसभरहि फरक उरलेला नाहीं." मीरकासीम पूर्ववत् अधिकारयुक्त वाणीनें म्हणाला.

"हे तुझे बोल माझ्या कानाला कसेसेच लागतात. मीरकासीम, निळ्याकाळ्या अभ्रांखालीं चंद्रबिंब झांकून गेलें म्हणजे आकाशांतून चंद्र कायमचा लुप्त झाला असा त्याचा अर्थ नव्हे. माझ्या आयुष्याच्या आकाशांत उत्पन्न झालेलीं व मला ग्रासून टाकणारीं हीं संकटाचीं अभ्रें जशीं जमलीं तशीं दूर होतील आणि मी निर्दोष ठरून माझ्या पदाला पोंचलेली तुला दिसेन. त्यांत तुला आनंद होणार नाहीं का ?"

मीरकासीम फिदी फिदी हंसत पापी दृष्टीनें करुणेकडे पहात म्हणाला, "राणीसाहेब, जो प्रश्न मी काढणार होतों तो तुम्हींच काढलात, फार आनं-

दाची गोष्ट आहे. माझ्या आनंदाविषयीं बोलाल तर माझा आनंद आतां तुमच्या ठायीं एकवटलेला आहे. त्याच आनंदावर तुमचें पुढील सुखदुःख अवलंबून आहे. बोला, मला आनंदी करून स्वतः आनंदी होण्याची तुमची इच्छा आहे काय ? ”

करुणेच्या कानाला ते शब्द कसेसेच लागले. मीरकासीमच्या अंतःकरणांतील क्षुद्र पापबुद्धि त्याच्या वाणींतून डोकावूं लागलेली तिला स्पष्ट दिसून आली. ती चिडून नागिणीसारखी फुत्कारत उभी राहून म्हणाली, “ मीरकासीम, याद राख! —तूं पायरी सोडून वागूं लागलास ! तूं कोणाशीं बोलतो आहेस, तुला माहीत आहे ? वाघिणीशीं असले पोरखेळ खेळणाऱ्या नराधमानें प्रथम आपल्या जीवितावर पाणी सोडावें आणि मग पुढें पाऊल टाकावें.”

तरीही मीरकासीम पुन्हां निर्लज्जपणानें म्हणाला, “पण या वाघिणीचे सुळे आणि नखें पूर्वींच उपटलीं गेलीं आहेत, व तशा दुबळ्या स्थितींत तिला पिंजऱ्यांत कोंडून मी तिच्याशीं हा खेळ खेळत आहें. राणीसाहेब, मी तुम्हांला अहो जाहोच्या बहुमानानें हांका मारतों हेंच भाग्य समजा, व हें नांव सार्थ करावयाचें असेल तर या मीरकासीमच्या शब्दाला मान देऊन त्याला आपला गुलाम करून सोडा. तंजावरची थोरवी तंजावरला राहिली! प्रतापसिंहमहाराजांनीं तुम्हांला मानाजीरावाच्या नांवानें दुराचारी ठरवलें असून, त्यांच्या त्या संशयाचें निरसन होणें आतां कालत्रयींही शक्य नाहीं. आतां मला सांगा, महाराजांच्या कोपानलांत जळूं घातलेल्या मानाजीशीं मैत्री ठेवून, कंगाल भिकारणीसारखें कवडीमोलाचें आयुष्य कंठण्यापेक्षां ह्या कांचनगडच्या किल्लेदाराला तुम्ही आपला म्हटलें, तर तो तुमच्या प्रेमासाठीं—तुम्हांला मानमान्यतेला चढवण्यासाठीं एका मनगटानें नबाबाला धुडकावील आणि दुसऱ्या मनगटानें प्रतापसिंह महाराजांना धुडकावून स्वतःच या उभ्या कर्नाटकचा नवाब बनेल. तुम्हांला ही थट्टा वाटण्याचें कारण नाहीं. जगाचा न्याय असा आहे कीं, जुनें मरावयाचें आणि त्याच्या उदरीं नवें जन्माला यावयाचें. तंजावर काय, अर्काट काय, हे वठलेले राजवंश आतां असेच नामशेष व्हावयाचे, व रानोमाळ पडलेलीं आमच्यासारखीं कर्तबगार माणसें सत्ताधारी म्हणून पुढें यावयाचीं.”

करुणाराणी संतापानें तडफडत, कडकडां बोटें मोडीत उद्गारली, “शिव!

शिव ! पाप्या, नराधमा, ज्या घरचें अन्न खाल्लेंस त्या घरचे वांसे तूं असे मोजावेस काय? एका काळीं तूं त्रिचनापल्लीच्या राजाराणींना आपलीं मातापितरें मानीत होतास, ती मी तुझी माता—नरपशू, माझ्यापाशीं असे हलकट-पणाचे उद्‌गार काढतांना तुझी जीभ कशी झडून पडली नाहीं ? ”

तरीदेखील मीरकासीम हंसून निर्लज्जपणाची कमाल करीत होता. तो निर्भय चित्तानें कुत्सितपणानें फिदीफिदी हंसत म्हणाला, “ राणीसाहेब, सारीच दुनिया जर अशी खऱ्यानें चालली असती, तर या दुनियेंत दुःखाचा उगम कशाला झाला असता ? खऱ्याची एवढी प्रतिष्ठा गाणाऱ्या वेडचा स्त्रिये, तूं खऱ्यानें चालणारी आहेस ना ? मग हा आपत्तीचा डोंगर तुझ्या माथीं कां कोसळला ? तूं माझें ऐक, अल्लाच्या इच्छेपुढें कुणाचा कांहीं इलाज नाहीं. अल्लाची इच्छा अशी आहे कीं हा मीरकासीम उद्यां उभ्या कर्नाटकचा नबाब व्हावा, आणि तंजावरची राणी त्याची बेगम व्हावी. महा-राजांच्या कोपामुळें मातीमोल झालेल्या तुझ्या आयुष्याला मी एवढी जबर किंमत द्यावयाला तयार झालों, याबद्दल तूं माझे उपकार मानले पाहिजेस ! तें सोडून तूं जर अशी वाचाळता करूं लागलीस तर लक्षांत ठेव, बोललेले शब्द कांटेतोल न्यायानें—नव्हे, त्याला आणकी पासंग लावून कृतींत वठवून दाख-विण्याची ताकद या मीरकासीमच्या अंगांत आहे. ”

वेळ आली होती पण काळ आला नव्हता. करुणाराणी मीरकासीमच्या त्या पाशवी वासनेला हार गेली असती कीं तिनें त्याला हरविलें असतें, या प्रश्नाचा निर्णय लागण्यापूर्वींच मीरकासीमचा एक सेवक त्याच्यापाशीं येऊन सांगूं लागला, “तंजावरच्या थोरल्या राणीसाहेब आपल्या भेटीला आल्या आहेत. त्यांना इकडे पाठवावयाचें का ? ”

मीरकासीम तें ऐकून भांबावल्यासारखा झाला. करुणाराणीला तर विस्मयाच्या खोल डोहांत बुडल्यासारखें भासूं लागलें. आजवर तिच्या मनांत अपरूपाराणीविषयीं जो आदर वसत होता, तो भोळेपणाच्या आधारावर अजूनहि तसाच पूर्ववत् टिकाव धरून होता. प्रतापसिंह महाराजांनीं संशय-ग्रस्तपणानें सोडलेले विचित्र हुकूम ह्या अपरूपाराणीच्या चिथावणीनें सोडले असतील अशी शंकाहि त्या साध्वीच्या मनाला हा वेळपावेतों शिवली नव्हती. आणि झुंजाररावहि अर्थात् तितक्याच निर्मल मनाचा होता. करुणा-

राणीला उलट अपरूपाराणी तेथें आल्याचें ऐकून धीर आला. ती मनांत म्हणाली, "सासूबाई या वेळीं माझ्या रक्षणासाठींच इकडे आल्या असल्या पाहिजेत. देवानें त्यांना सुखी ठेवावें व त्यांच्या मुखीं उभें राहून माझा उद्धार करावा." परंतु लगेच दुसऱ्या क्षणाला तिच्या मनांत विरोधी चिंता उत्पन्न झाली, "पण हा चांडाळ अपरूपाराणीला तरी मान्यतेनें वागवील कशावरून!" पण बिचाऱ्या करुणाराणीच्या हातीं तरी अशी निष्फळ चिंता करण्यापलीकडे काय होतें! ती वार्ता ऐकतांच मीरकासीमचा मात्र कांहींसा विरस झाला. तो मनांतल्या मनांत त्याबद्दल चडफडलाहि. परंतु नाइलाजास्तव त्याला करुणाराणीचा नाद त्या क्षणापुरता तरी सोडावा लागला; व अपरूपाराणीची मुलाखत घेण्यासाठीं त्याला तेथून निघून जाणें भाग पडलें.

बिचारी करुणाराणी तेव्हां मनांत मांडे चुरीत होती कीं सासूबाईंच्या पुण्याईनें आपणावरील आतांचें संकट टळलें. इतकेंच काय पण ती आणखी अशीहि जबरदस्त आशा आपल्या हृदयाशीं बाळगून होती कीं आपल्या पतिराजांच्या मनांत उत्पन्न झालेलें संशयाचें वादळ आपणाला त्यांच्या मध्यस्थीनें नाहींसें करतां येईल. भोळी बिचारी! तिला अपरूपाराणीचें कृष्णकारस्थान व तिचें काळेंकुट्ट अंतःकरण यांची काय ओळख असणार! बाकी एवढें खरें कीं, करुणाराणीची पुण्याई प्रचंड पर्वतासारख्या पापराशींना पचनीं पाडून तिला विजयश्रीची जोड मिळवून देण्याइतकी अफाट होती. पण त्या पुण्याईचा आधार करुणाराणीच्या बावरलेल्या मनाला त्यावेळीं कसा पटावा! तिला फार तर त्या क्षणीं एवढेंच वाटलें असेल कीं आतांचें मरण एक घटकाभर तरी टळलें.

# प्रकारण १७ वें

# मीरकासीम ठार झाला!

मी मीरकासीमनें अपरूपाराणी व कोयाजी यांचें सामोरीं जाऊन यथोचित स्वागत केलें व त्यांना सर्व सुखसोयींनीं सज्ज अशा एका महालांत आणून बसविलें. मंडळी श्रमून आलेली, म्हणून त्यांच्या श्रमपरिहारार्थ डाळिंबाचा रस, सुवासिक मसालेदार सरबतें वगैरे राजोपचारी सरबराई झाल्यावर मीरकासीमनें कोयाजीला विचारलें, "आज अशा अपरात्रीं राणीसाहेबांना घेऊन आपण इकडे कशासाठीं बरें आलां आहां?"

अपरूपाराणीला मीरकासीम आज प्रथमच पहात होता. ती एक उनाड राणी आहे अशी तिची कीर्ति फार दिवसांपासून तो ऐकत होता. पण प्रत्यक्ष भेट अशी आजचीच पहिली. परंतु सेवकानें आगाऊ वर्दी आणली ती कोयाजी व अपरूपाराणी यांच्या आगमनाचीच आणल्यामुळें आतां अनोळखीपणा फारसा उरला नव्हता. तशांत मीरकासीम याहीपेक्षां अपरूपाराणीशीं अदबीनें वागला असता. परंतु त्या राणीनें मराठ्यांच्या तत्कालीन गोषाचें गांभीर्य कायम राखून खऱ्या खुऱ्या राजस्त्रीसारखें वर्तन ठेवलें असतें तर! पण ती तर एखाद्या चंचल स्त्रीप्रमाणें दिवसा व रात्रींही कोयाजीसारख्या हलकट साथीदाराला बरोबर घेऊन हिंडत होती!

असो. मीर कासीमच्या प्रश्नावर कोयाजी उद्गारला, "किल्लेदार, आमच्या शत्रूला तूं आपल्या पदरीं थारा दिला आहेस अशी खबर आम्हांला लागली आहे. हें खरें काय?"

संभाजी निरुपायानें कोयाजीबरोबरच कांचनगडापावेतों आला होता, व आतां ही बित्तंबातमी मानाजीरावाला बैराग्यांच्या मार्फत कळविण्याइतकी सवड आपणाला नाहीं तर नाहीं मिळाली, एथला एकंदर प्रकार-नजरेखालीं घालतां आला तर तोदेखील पुष्कळच फायद्याचा आहे, अशी त्यानें आपल्या मनाची समजूत चालविली होती. मात्र करुणा व झुंजारराव कांचन-गडावर असल्याची लोणकडी थाप जी आपण ठोकून दिली, ती आतां आपल्या

आंगाशीं येते कीं काय, ह्या भयानें संभाजीचा जीव अगदीं मुंगीएवढा झाला होता. तसें झाल्यास आपणाविषयीं कोयाजीला जास्त संशय येईल कीं काय हेंही भय त्याच्या अंतःकरणाचे लचके तोडीत होतें. परंतु परमेश्वर त्याचा साथीदार होता, त्याची भीति निराधार होती.

"आपले शत्रु? आपले शत्रु कोण? आणि त्यांना मी आश्रय कां म्हणून देईन?" मीरकासीमनें संशय व भय ह्या दुहेरी दडपणाखालीं दडपून गेलेल्या चांचपटत्या मनाला कसाबसा धीर देऊन प्रश्न केला. त्याला कोयाजी काय म्हणतो याचा उमजच पडेना. करुणा व झुंझारराव हे त्यांचे शत्रु कसे हेंच त्याला कळेना. तंजावरचे सैनिक पाळतीवर असल्यामुळें तीं दोघें त्याच्या आश्रयाला कांचनगड हा मराठ्यांचा किल्ला म्हणून आलीं होतीं हें खरें. पण कोयाजी व अपरूपा ह्यांची त्या दोघांशीं वैरगिरी असेल हें सहजासहजीं कोणाच्या कसें ध्यानीं येणार? कारण, अपरूपा प्रतापसिंह महाराजांशीं व त्यांच्या राणीशींदेखील अलीकडे अत्यंत प्रेमळपणानें वागत असे असा सर्वत्र बोभाटा होता. व तो मीरकासीमच्याही कानीं आला होता.

"जे तंजावरच्या राज्याचे शत्रु ते आमचे शत्रु" असें म्हणून कोयाजीनें करुणा, झुंझारराव व मानाजीराव यांना रसातळाला नेण्यासाठीं जें कुटिल कारस्थान रचिलें होतें, व जो सत्यप्रकार होय असें समजून प्रतापसिंह महाराज-देखील फंसून त्या निरपराधी जीवांचा सत्यनाश करण्याला सिद्ध झाले होते, तोच 'सत्य प्रकार' त्यानें मीरकासीमला थोडक्यांत पण रंगदार भाषेंत निवेदन केला. मीर कासीमला तंजावरचें राज्य टिकलें काय किंवा बुडलें काय, पर्वा तितपतच होती. कावळ्याची नजर क्षतावर असावयाची त्याप्रमाणें त्यांतली मुद्याची गोष्ट तेवढी त्यानें ध्यानीं ठेवली कीं करुणाराणी आतां अगदीं निराधार झाली आहे, तिला अतिप्रसंगानें आपण वश केलें तरी यावेळीं तिचा कैवार घेऊन भांडावयाला कोणीच पुढें येणार नाहीं.

अपरूपा राणीला कोयाजीच्या मुखानें करुणेची नालस्ती झाली ती अपुरी वाटली म्हणून कीं काय, ती कोयाजीच्या भाषणाला उपसंहारादाखल उद्-गारली, "तशांत आणखी राणी बद्चालीची आहे. तिच्या वास्तव्यानें आमचा राजप्रासाद पुन्हा विटाळला जावा हें मी कधींच सहन करणार नाहीं."

मीरकासीमला अंमळ हायसें वाटलें. तो एका क्षणांत आपल्या मनो-

राज्यांत भावी पापकर्मांच्या टोलेजंग हवेल्या उठवीत उद्गारला, "धाकटचा राणीसाहेब तितक्याशा पाक दिलाच्या नाहींत हें मलाही नाकबूल करतां यावयाचें नाहीं."

"कशावरून ?" अपरूपेनें उत्सुकतेनें विचारलें.

"तें आपण मला विचारूं नये आणि मीं आपणाला सांगूं नये. मात्र मला यावेळीं आपणाकडून असें अभय वचन पाहिजे आहे कीं धाकटचा राणीसाहेबांच्या मोहपाशांत मी गुरफटला गेलों असलों तरी तो केवळ माझा एकटचाचाच अन्याय नसल्यामुळें त्याबद्दल मला क्षमाच होईल."

किती नीचपणाचे मीरकासीमचे उद्गार होते हे ! तो खरोखर उरफाटचा काळजाचा खरा, म्हणूनच त्या साध्वीच्या बाबतींत असें बेमालूम खोटें बरळूं शकला. त्यानें अपरूपा करुणेवर अत्यंत नाराज आहे असें पाहून हे एका दगडानें दोन पक्षी मारले. पहिला हेतु, त्या मंडळीच्या मनांत करुणेविषयीं अणुमात्र आदर असेल तर तो मुसलमानाच्या नादीं लागली ह्यामुळें मन कलुषित होऊन तो नष्ट व्हावा, आणि तिला कोणत्याही परिस्थितींत तंजावरचा मार्ग बंद होऊन ती आपल्याच भक्ष्यस्थानीं पडावी. आणि दुसरें, आतां यदाकदाचित् आपरूपा आणि करुणा यांची भेट होऊन करुणेनें तिच्यापाशीं गाऱ्हाणें गाण्याला सुरुवात केली तरी करुणेचा तो निव्वळ मायावीपणा ठरावा. मात्र करुणेची मति चळली याचा अपरूपाराणीला नीतिभावनेच्या दृष्टीनें जरादेखील विषाद वाटणार नाहीं, हें मीरकासीम पक्कें ओळखून होता. तशी शंका मनांत येतांच त्यानें तिचें मनोमय निरसन केलें, "पतिव्रतेचें पातिव्रत्य ढळलें म्हणून मुलुखभवानीच्या आंतडयाला थोडाच पीळ पडणार आहे ! उलट ही देखील आपल्याच पंथांत सामील झाली, आपल्या उच्छृंखल वर्तनाबद्दल उघड उघड जीं माणसें बोलूं शकतील त्यांपैकीं एक तरी कमी झालें असेंच अपरूपा मनांत म्हणेल."

मीरकासीमचा तो तर्क अक्षरशः खरा होता. अपरूपेला त्याची ती वाचाळता खरीच वाटली. तिनें आपणावरून करुणेची पारख केली. करुणा मीरकासीमशीं उच्छृंखलता करण्याइतकी निर्ढावली असेंच तिच्या मनानें घेतलें; व त्या गोष्टीचा मीरकासीमप्रमाणेंच आपल्या परीनें एका दगडानें दोन पक्षी मारण्याच्या कामीं उपयोग करून घ्यावयाचें तिनें ठरविलें. तिच्या मनांतून

जरी मीरकासीमनें प्रतापसिंह महाराजांविरुद्ध आपणाला आपल्या मानलेल्या पुत्राला तंजावरचा राजा करण्याच्या कामीं साह्य करावें असें होतें, तरी तसा प्रश्न त्याच्यापाशीं काढण्याला ती इतका वेळ भीत होती. पण आतां तिच्या मतें मीरकासीम वर्मी सांपडला. त्याला करुणा मिळाली तर तो सुखी होईल व शिवायही होईल आणि काय पाहिजे तें करण्याला तयार होईल हें तिनें हेरलें. करुणाराणीचा सर्वनाश करण्यासाठीं तिच्या पितृ व पुत्रांनी ठरवून प्रतापसिंह महाराजांकरवीं तिला जन्माचें शासन करावयाचें, त्यापेक्षां ती आजपासूनच मीरकासीमसारख्या आश्रयदात्याच्या हातीं कायमची गवसून पडली तर सुंठीवांचून खोकला गेला, असा विचार करून अपरूपा मानभावीपणानें म्हणाली, "ती कुलटा आपली पायरी सोडून तुझ्या मनांत आली तर त्यांत तुझा तरी काय अन्याय! आतां ती देहानें नाहीं तरी मनानें वाटल्यासारखीच आहे, तेव्हां ती तुझी तुला लग्नलाभ होतो. आमचें कांहींदेखील म्हणणें नाहीं. मात्र हा तुझा अन्याय मी पोटीं घालावयाचा पाहिजे असेल तर तूं आमची एक कामगिरी केली पाहिजेस." असें म्हणून तिनें प्रतापसिंह महाराजांच्या ऐवजीं आपल्या बनावट पुत्राला तंजावरच्या गादीवर बसविण्याचा बेत मीरकासीमला जरूर तेवढे हातचें राखून निवेदन केला. त्या कामीं आपणाला चंदासाहेबाचें देखील साह्य कसें आहे हें देखील त्याला सांगितलें. मीरकासीमनें त्या गोष्टीला आनंदानें संमति दिली. त्यांतदेखील त्यानें असा स्वार्थ पाहिला कीं तंजावरच्या गादीबाबत तंटे उपस्थित होऊन परस्परांवर हिंदु हे तंटे मोडण्यांत अगर लढण्यांत गुंतून पडले, कीं आपणाला मुसलमानांच्या आसमंतांत आपली एकतंत्री सत्ता प्रस्थापित करण्याचा मार्ग निष्कंटक सोपा झाला.
"बरें; तो थेरडा अंजारराव कुठें आहे?" [illegible]नें विचारलें.

"त्याला मीं संशयावरून कैदेंत टाकलें आहे." तें प्रकरण आपल्यावर उलटतें कीं काय ह्या भयानें मीरकासीमनें त्यावर आणखी मल्लीनाथी केली, "तो एथें येतांच आपणाविरुद्ध मला चिथावणी देऊं लागला म्हणून त्याला तशी शिक्षा देणें भाग पडलें."

"ठीक केलेंस. अगदीं छान केलेंस. तरीही आमचा एक हाडवैरीन आहे. त्याला नुसतें कैदेंत डाम्बून ठेवून भागावयाचें नाहीं, ह्या जगांतून त्याची कायमची हकालपट्टी केली पाहिजे." अपरूपा म्हणाली.

संभाजी आपणाबरोबर आहे, त्याच्यादेखत असलें बोलभाषण होणें सुरक्षितपणाचें नाहीं, असें तेवढ्यांत कोयाजीला वाटल्यानें त्यानें अपरूपेला जरा संभाळून बोलण्याविषयीं नेत्रसंकेत केला, आणि संभाजीला म्हटलें, "संभाजी, जवळच्या त्या रामनद खेड्यांत आमच्या बरोबरचे लोक वाट पहात बसले आहेत त्यांना जाऊन कामगिरी फत्ते झाल्याचें सांग व सूर्योदया-पूर्वीं आम्ही तिकडे येतों म्हणावें; जा."

संभाजीचें मस्तक त्या दुर्मति माणसांचीं कुटिल कारस्थानें ऐकून अगदीं भणाणल्यासारखें झालें होतें. तो स्वामिनिष्ठ व आपल्या देशाचा कर्तव्यदक्ष नागरिक. आपण जगून आपल्या स्वामीसाठीं आणि आपल्या देशासाठीं कांहीं-तरी सत्कार्य खास करूं अशी त्याची मनोदेवता त्याला ग्वाहि देत नसती तर त्याच क्षणीं तो त्या तिघांही दुर्जनांचे मुडदे पाडून वेळ पडल्यास स्वत:देखील त्यांच्याबरोबर यमसदनाला जावयाला तयार झाला असता. इतका तो चेवला होता. अपरूपाराणीनें आपखुषीनें करुणेविषयींच्या प्रश्नाला बगल देऊन एक प्रकारें मीरकासीमला करुणेचा छळ करण्याला प्रोत्साहनच दिलें, त्या क्षणा-पासून संभाजीच्या मनाला एकसारखी हुरहूर लागून राहिली होती कीं मी काय करूं म्हणजे त्या साध्वीचें ह्या गिधाडापासून रक्षण होईल! त्याबरोबरच तो हेंही ओळखून होता कीं, मीरकासीम जगांतून नाहींसा झाल्याखेरीज आतां करुणाराणीला तरणोपाय नाहीं. अशा प्रकारच्या विचारांच्या भोंवऱ्यांत संभाजीचें मन गरगर फिरत असतां त्या बैठकींतून उठण्याची संधि कोयाजीच्या आज्ञेनें मिळाली, तेव्हां त्याला परमावधीचा आनंद झाला. व तो तसाच निघाला.

आतां मीरकासीम, अपरूपा आणि कोयाजी यांना पुढील कृष्णकारस्थानांचे मनोरे रचण्याला यथास्थित अवधि मिळाला. मीरकासीमला कसेंही करून करुणा पचनीं पाडावयाची होती; व त्याच्या मतें ती पचनीं पडलीही होती. सुमारें प्रहरभर त्या त्रिकुटाच्या वाटाघाटी झाल्यावर अपरूपा आणि कोयाजी यांना सुसज्जित शय्यागृहांत पोंचवून तो करुणेचीं मनोहर स्मृतिचित्रें अंत:-चक्षूंसमोर रेखाटीत तिच्या महालाकडे वळला. मूर्ख कुठचा! त्यानें सभों-वारच्या परिस्थितीवर देखतभुली मात केली खरी पण तो सर्वंकष काळावर थोडीच मात करूं शकतो! पण कामातुर बनलेलीं पशुतुल्य माणसें सारासार विचार करण्याइतकीं भानावर थोडींच असतात!

मीरकासीम प्रथम थेट भांडागारांत गेला, व तेथून उत्तमोत्तम बहुमोल अलंकार व उंची उंची वस्त्रें बरोबर घेऊन लगेच स्वारीनें करुणेला ज्या महालांत ठेवण्यांत आलें होतें तिकडे मोर्चा वळविला. तेथें जाऊन पहातो तों मार्ग अगदीं निष्कंटक ! सुग्रास पंचपक्वान्नांचें ताट वाढून अगदीं तयार! त्याला वाटलें होतें कीं आपणाला करुणेची आणखी मनधरणी करावी लागेल, धाकदपटशा दाखवावा लागेल, व इतक्यानेंही ती वळणीवर आली नाहीं तरी तिच्यावर हात टाकून तिला त्या रात्रीं आपलीशी करून घेण्याचाही त्याचा निर्धार अगोदरच झालेला होता. परंतु तो तेथें जाऊन पहातो तों सर्वच परिस्थिति पूर्णपणें निवळलेली ! करुणा जागीच होती, व ती एखाद्या संतुष्ट स्त्रीप्रमाणें लीलेनें इकडे तिकडे विहरत होती. मीरकासीम तेथें आलेला पाहतांच मात्र तिनें अवगुंठनाखालीं आपला मुखचंद्र झांकून घेतला. तरी पण त्या अवगुंठनांतून चोरट्या उत्सुक नजरेनें मधून मधून त्याच्याकडें पहाण्याला तिनें कमी केलें नाहीं. आपणावर ही फिदा झाली असली पाहिजे असा मीरकासीमनें तर्क करून तिला 'प्यारी!' अशी लाडकी हांक मारली.

"इतका निर्भीडपणा काय हा ! कोणी नोकरचाकर पहातील तर काय म्हणतील ! " अवगुंठनवती करुणा लाडक्या स्वरांत म्हणाली.

"खास ही आपणावर फिदा झाली आहे." असें मनांत म्हणून मीरकासीमनें वस्त्रालंकार खालीं ठेवून प्रथम त्या महालाचा दरवाजा लावून घेतला, व तो तिच्या हनुवटीला हात लावून हळूहळू अवगुंठन दूर करण्यासाठीं चाळवाचाळव करूं लागला. तरीही करुणेनें प्रतिकार केला नाहीं. तो वस्त्रालंकारांचा तबकांतील एक बहुमोल रत्नहार उचलून करुणेच्या कंठांत घालूं लागला, तेव्हां मात्र करुणा जरा बाजूला वळली.

मीरकासीमला वाटलें कीं हा अनुराग आहे. म्हणून त्यानें 'प्यारी ! प्यारी' असा लघळपणा करीत तो रत्नहार करुणेच्या कंठीं घालण्यासाठीं पुढें पाऊल टाकलें. त्याबरोबर काय चमत्कार, त्या अवगुंठनवती करुणेच्या हातांतील जंबियानें एका घावासरसा त्या नराधमाचा कोथळाच फोडून बाहेर काढला, व तो तडफडत मरेतों वाट पाहून लगेच त्याच पावलीं बाहेरचा रस्ता सुधारला !

असें कसें झालें ?

# प्रकरण १८ वें

# मोहन

चंदासाहेबाकडून मीनाक्षीराणीच्या सहीचा खलिता घेऊन जे जासूद रवाना झाले ते योग्य वेळीं मुरारराव घोरपड्यांकडे जाऊन पोंचले. त्या खलित्याप्रमाणें मुरारराव मीनाक्षीराणीचा साह्यकर्ता म्हणून त्रिचनापल्लीला जाण्याच्या तयारींत आहे तोंच दोघे घोडेस्वार त्याच्या समोर दत्त म्हणून उभे राहिले. त्या दोघांपैकीं एक घोडेस्वार तर अगदीं तरुण सुमारें वीशीच्या आंत बाहेर असेल नसेल इतका कोवळा होता व त्याच्या चेहऱ्यावरील कोमलता आणि सौंदर्य हीं पाहून तर 'विधात्यानें इतका नाजूक व सुंदर चेहरा पुरुषाला दिला त्यापेक्षां एखाद्या स्त्रीला दिला असता तर' असेंही कोणा रसिकाच्या मनांत आलें असतें. त्या तरुण घोडेस्वाराच्या सौंदर्याचें व चापल्याचें वर्णन करून किती करावयाचें, एका शब्दांत सांगावयाचें तर त्याला पहातां-क्षणींच मुरारराव घोरपडे अगदीं मोहित होऊन गेला. दुसरा घोडेस्वारही रूपानें सुंदर पण वयानें कांहींसा मोठा असावा. तो वयानें किती मोठा व किती सुंदर असावा याचें अनुमान मुराररावांना प्रथम दर्शनीं करतां आलें नाहीं. याचें कारण तो जो आंत आला तो किंचित् पाठ फिरवून अंमळ बाजूलाच उभा राहिला होता. मुराररावांना तें जरा चमत्कारिक वाटलें, परंतु परिचय नसल्यामुळें भीड पडून ते तिकडे बळेंच दुर्लक्ष करून दुसऱ्या तरुण घोडेस्वाराला म्हणाले, " तुम्ही कुणीकडून आलां ? "

" मी त्रिचनापल्लीहून आलों. " तरुण घोडेस्वार उत्तरला. त्याची दृष्टि मुराररावाच्या चर्येवर सावधपणें खिळून बसली होती. जणूं काय मुराररावाच्या चर्येवर आपल्या आगमनानें आणि आपल्या संभाषणानें कोण-कोणते मनोविकार प्रतिबिंबित होतात याचेंच तो तरुण कल्पकतापूर्वक गूढ सावधपणें करीत होता.

" तुमचें नांव काय ? " मुराररावांनीं विचारलें.

" माझें नांव मोहन. मी आपणाकडे मीनाक्षी राणीसाहेबांकडून कांहीं अत्यंत निकडीच्या कामासाठीं आलों आहें. त्यांचा स्वदस्तुरचा खलिता आप-णांला पोंचलाच असेल. "

" हो ! आणि म्हणूनच मी आतां तिकडेच त्यांच्या साह्यासाठीं निघणार

होतों. राणीसाहेबांना मी माझ्या पाठची बहीण मानतों. चंदासाहेबा-सारख्या कसायाच्या सुरीखालीं मान सांपडलेल्या त्या गरीब गायीला वांच-विणें हें माझें पवित्र कर्तव्य आहे. मला वाटतें तुम्हीदेखील मला त्यांच्या वतीनें तातडीनें बोलावणें करण्यासाठीं आला असाल."

"नाहीं. मी आलों आहें तो अशासाठीं कीं, आपलें साहाय मीनाक्षी-राणींना तर पाहिजेच आहे. परंतु आज आपणांला मिळालेला खलिता हा चंदासाहेबाच्या खोडसाळपणाचा एक मासला आहे; त्यामुळें आपण फसूं नये म्हणून आपणांला वेळींच सावध करण्यासाठीं मी इथें आलों आहें." असें म्हणून मोहननें त्या खलित्याबाबत त्रिचनापल्लीच्या बंदिशालेंत घडून आलेला सर्व शोचनीय प्रकार मुराररावांना निवेदन केला. तो ऐकून मुराररावांना अचंबा वाटला व तितकाच चंदासाहेबाचा तिरस्कारहि आला. त्याच क्षणीं त्यानें उद्‌गार काढले, "असें आहे काय? तो विश्वासघातकी हरामखोर मुसंडा मला अशा डावपेचांनीं जाळ्यांत अडकवून कर्नाटकांतील मराठ्यांची सत्ता नामशेष करूं पहातो काय? ठीक आहे. त्याला म्हणावें, बेट्या, ह्या मुरार-राव घोरपड्याशीं गांठ आहे. तुझाच डाव तुझ्यावरच उलटवला नाहीं आणि त्याखालीं तुझी राखरांगोळी केली नाहीं तर मी घोरपड्याचें नांव सांगणार नाहीं." ते किंचित् वेळ स्वतःच्या मनाशीं काला तरी विचार करीत उभे होते. त्यांच्या चर्येवर प्रतिबिंबित होणाऱ्या भावना मोहनला स्पष्टपणें वाचतां येत होत्या. चंदासाहेबाचा सूड कोणत्या उपायानें बेमालूम घेतां येईल याचें संशोधन करण्यांत मुराररावांचें मस्तक पूर्णपणें भ्रमून गेलें आहे हें मोहननेंच काय पण त्या दोघांचा संवाद जवळच उभ्यानें ऐकणाऱ्या त्या दुसऱ्या घोडेस्वारानेंही ओळखलें.

"पण सध्यां मीनाक्षी राणीची काय स्थिति आहे? समजा, मी चंदासाहे-बाचें पारिपत्य करण्याचें मनांत आणलें, तर त्याचा त्यांच्या आयुष्यावर कांहीं विपरीत परिणाम तर होणार नाहीं ना?"

"कांहीं देखील विपरीत परिणाम होणार नाहीं. द्रौपदीचा भगवान श्रीकृष्ण पाठिराखा तसे आपण पाठीराखे भाऊ भेटलां असेंच राणीसाहेबांना वाटेल." मोहन उत्तरला.

"तुमचा आणि राणीचा काय संबंध?" मुराररावांनी विचारलें. वास्त-

विक हा प्रश्न त्यांनीं प्रथमच करावयाचा. पण त्यांना प्रथदर्शनींच मोहनविषयीं इतका विश्वास वाटला कीं त्यानंतर त्याच्याविषयीं कोणतीही शंका मुरार-रावांच्या मनांत उद्भवणें शक्यच नव्हतें. आणि आतां तर त्यांनीं तसा प्रश्न केला तो केवळ कुतुहलानें राणीचा कुशल समाचार आपणांला यथावत् कळावा म्हणून.

"मी राणीसाहेबांचा एक विश्वासू अनुचर आहें. त्रिचनापल्लीवर ओढवलेल्या सध्यांच्या महत्संकटांत माझ्यासारख्या राणीच्या कैवाऱ्यांना कसें जीव मुठींत घेऊन वागावें लागतें आहे, भावी सत्कार्यावर दृष्टी ठेवून कशीं नानापरींचीं संकटें सोसावीं लागत आहेत, याची आपणांसारख्या समर्थ भाग्यवंतांना कल्पना यावयाची नाहीं." मोहन क्षणभर मागें वळून आपल्या साथीदाराकडे पहात पुढें उद्गारला, "आतां राणीसाहेबांच्या वतीनें आपल्याला माझी एवढीच विनंति आहे कीं आपण त्या दुष्टाचें यथावत् पारिपत्य करा व त्रिचनापल्लीच्या जनतेला लाजिरवाण्या यवनदास्यांतून मुक्त करा. त्या चांडाळानें त्रिचनापल्लींत कसकसा हलकल्लोळ माजविला आहे, हिंदुधर्म, हिंदु देवदेवता, हिंदु स्त्रिया यांची कसकशी विटंबना चालविली आहे—हरहर ! त्या अघोर पापांचा उच्चार करतांना जीभ अडखळूं लागते." असें म्हणून मोहननें एक दीर्घ उसासा सोडला. त्याच्या जोडीदाराची त्यावेळीं तशीच अनुकंपनीय अवस्था झाली होती.

"बरें, पण राणीसाहेब सध्यां कुठें आहेत ?" मुराररावांनीं विचारलें.

"त्यांनीं हरप्रयत्नांनीं त्रिचनापल्लीच्या बंदिशालेंतून आपली मुक्तता करून घेतली असून आपल्या एका मैत्रिणीसह त्या सध्यां कुठें तरी रानोमाळ भटकत आहेत. त्यांनीं मला आपणांकडे पाठविलें त्या वेळीं त्या नुकत्याच त्रिचनापल्लीच्या किल्ल्यापार होऊन मार्गाला लागलेल्या होत्या. कदाचित् त्यांचा विचार आपल्या राज्यांतील कांहीं शेलक्या विश्वासू प्रजाजनांना भेटून सैन्यसामुग्रीची करतां येईल तेवढी उभारणी करून शत्रूशीं सामना देण्याचा असेल असें मला वाटतें. दहा–पंधरा दिवस तरी त्या असा प्रयत्न करून पहाणार आहेत, व मग शिवगंगेला मराठ्यांच्या लष्करी छावणींत जाऊन त्यांच्या व आपल्या विचारें पुढील धोरण ठरविण्याचा त्यांचा मानस आहे." हे उद्गार काढतांना मोहन मधून मधून एकसारखा आपल्या साथी-

दाराकडे वळून पहात होता. मुरारराव मधून मधून प्रश्नार्थक दृष्टीनें त्याच्या कडे पहात होतेच. त्यांना संशय आल्याचें मोहननें त्याच्या चर्येवरून ओळखलें तोंच मुराररावांनी प्रश्न केला "तुमचा साथीदार कांहींच कां बोलत नाहीं ?"

"सरदारसाहेब, तो माझा अनुचर आहे. तो काय बोलणार ! अनुचराचें काम क्षणोक्षणीं धन्याच्या शब्दाची री ओढण्याचें नव्हे, धन्यावर प्रसंग पडेल तेव्हांच निष्ठावंत अनुचराची निष्ठा पाहून घ्यावी." हे शब्द मोहन इतक्या निर्भयतेनें बोलून गेला कीं, मुराररावांच्या मतें आतां संशयाला मुळींच जागा उरली नाही. मोहनना तो अनुचर मात्र कां न कळे तें संभाषण ऐकून क्षणोक्षणीं जास्त ओशाळा होत होता. मोहनच्या तें तेव्हांच ध्यानीं आलें. तो मुराररावांना म्हणाला, "सरदारसाहेब, याला अंमळ बाहेर विश्रांति घेऊं द्या. अविश्रांत घोडदौडीनें तो फारच श्रमी झालेला दिसतो" असें म्हणून मोहननें त्या अनुचराला बाहेर जाऊन विश्रांति घेण्याला सांगितलें. मुराररावांना वाटलें कीं, कांहीं विशेष महत्त्वाच्या गोष्टी आपल्याशीं बोलण्यासाठीं मोहनला एकान्त पाहिजे होता, तो मिळविण्यासाठीं त्यानें ही युक्ति योजिली आणि फुला मोलाला गांठ पडून त्यांचा तो तर्क खरा ठरला. मोहननें चंदासाहेबाचीं आजवरचीं सर्व कृष्ण कृत्यें व त्याचे पुढील बेत क्रमाक्रमानें मुद्देसूद रीतीनें मुराररावांना निवेदन केलें. त्याबरोबरच तंजावरांत महाराजांच्या सापत्न मातेनें, व तिचा एक हस्तक कोयाजी घाटगे यांनीं तंजावरचें राज्य एका बटकीच्या पोरासाठीं बळकावण्याचा कसा डाव रचला आहे हेंही सविस्तर निवेदन केलें. मुराररावांना त्याचें एवढें मोठेसें आश्चर्य वाटलें नाहीं. ते ओघानेंच बोलून गेले, "यांत नवल तें काय ! अपरूपाराणीला आणि कोयाजी घाटग्याला मी आज ओळखतों असें नव्हे. मराठ्यांच्या नांवाला कलंक लावण्यासाठींच तीं दोघं जन्माला आलीं आहेत. परंतु तंजावरच्या राज्याचें भूषणसर्वस्व अशा त्या दोन प्रासादिक तरवारी त्या बदफैली स्त्रीनें चोरून चंदासाहेबासारख्या शत्रूच्या घरीं पोंचत्या कराव्या ही मात्र त्या दोघांच्या नीचपणाची कमाल आहे खरी."

"त्या तरवारी आपण दक्षतेनें हस्तगत केल्या पाहिजेत. कारण चंदासाहेब त्यांचें महत्त्व पूर्णपणें ओळखून आहे व त्याची अशा दैवी चमत्कारावर श्रद्धाही

आहे. आपली हरकत नसेल तर मी आपल्या संमतीनें त्या तरवारी हस्तगत करतां आल्यास पाहीन."

"त्या कशा काय ?" मुराररावांनी विचारलें.

"रामस्वामी नांवाचा माझा एक विश्वासू सेवक खालीं आहे त्याला कृपा करून वर बोलावून घ्या." मोहन म्हणाला.

लगेच मुराररावानें रामस्वामीला हुजऱ्याकरवीं बोलावणें पाठविलें. मोहननें निवेदन केलेल्या वृत्तांतांत रामस्वामीचा उल्लेख येऊन गेल्यामुळें त्याच्या कार्यक्षमतेबद्दल मुराररावांना शंका येण्याचें कांहींच कारण नव्हतें. थोड्याच वेळांत रामस्वामी वर आला व दरबारी पद्धतीनें अभिवादन करून नम्रतापूर्वक दूर उभा राहिला, मोहन त्याला म्हणाला, "रामस्वामी, चंदासाहेबानें खेळू घातलेला डाव त्याच्यावर उलटवणें आतां सर्वस्वी तुझ्या स्वाधीन आहे. तूं आतां तांतडीनें त्रिचनापल्लीला जा आणि मुरारराव घोरपडे मीनाक्षी राणीच्या साह्याला घोडदौडीनें चालून येत आहेत असा बेमालूम बहाणा करून तेथलें सर्व वातारण आमच्या पुढील योजनेला अनुकूल असें निर्माण करून ठेव. आणि हें पहा, त्या दोन प्रासादिक तरवारींविषयीं तुला माहीत आहेच. त्या कोणत्या उपायानें हस्तगत केल्या जातील तें तुझें तूं पाहून घे. मुरारराव तिकडे आल्यावर तूं त्यांची भेट घे म्हणजे पुढील आवश्यक त्या गोष्टी तुला वेळोवेळीं कळून येतीलच. जा, कशी कामगिरी सोळा आणे करतोस पाहूं."

रामस्वामीनें संमतिदर्शक मान तुकवून पुन्हा एकवार अभिवादन करून तिथून प्रयाण केलें. आणखी थोडा वेळ मोहन आणि मुरारराव यांचे चंदासाहेबाच्या पारिपत्याविषयीं बेत चालले होते. तोंच द्वारपालानें येऊन वर्दी दिली, "शिवगंगेहून जासूद थैली घेऊन आला आहे."

मुराररावांनी ताबडतोब त्या जासूदाला बोलावून घेतलें आणि त्याच्या जवळची थैली घेऊन उघडून वाचून पाहिली. तों त्यांतही तोच मजकूर. प्रतापसिंहमहाराजांकडून छत्रपती शाहूमहाराजांना साह्यार्थ केलेल्या विनंतिपत्रावरून रघूजी भोंसले, बाबूजी नाईक वगैरे मंडळी नुक्तीच चंदासाहेबाच्या पारिपत्यासाठीं व तंजावरच्या रक्षणासाठीं शिवगंगेला आपल्या छावणीत येऊन पोंचली होती; व रघूजी भोंसल्यानें कर्नाटकची मोहीम अर्धवट थांबविलेली फिरून ताबडतोब जोमानें सुरू करण्याची इच्छा त्या थैलींत दर्शविली असून मुराररावांपाशीं पूर्ववत् साह्याची याचना करण्यांत आली होती.

"योगायोग असा आहे पहा माझ्या मनांत चंदासाहेबाचें पारिपत्य करण्याची योजना यावयाला व तिकडून मातब्बर मराठ्यांचा पाठिंबा मिळावयाला एक गांठ पडली. आतां मला प्रथम जाऊन रघूजी भोंसल्यांची भेट घेतली पाहिजे. ते आणि मी एक जिवानें तंजावरप्रमाणेंच त्रिचनापल्लीच्या रक्षणाचीही निश्चित तजवीज करीत आहों असें तुम्ही राणीसाहेबांना सांगा. बरें आतां तुमची आमची भेट पुन्हां केव्हां ?"

"आपण आतां शिवगंगेला जाताच आहां तेव्हां मी व शक्यतर राणीसाहेबसुद्धां आपणांला तिथेंच येऊन भेटूं. मराठ्यांचें एवढें जबरदस्त साह्य मिळाल्याचें ऐकून राणीसाहेबांच्या अंगावर डोंगराएवढें मांस वाढेल." असें म्हणून मोहन मुराररावाचा निरोप घेऊन आपल्या अनुचरासह माघारा वळला. त्याच दिवशीं मुरारराव पूर्व संकल्पाप्रमाणें शिवगंगेकडे जावयाला निघाले.

# प्रकरण १९ वें

# बैराग्यांच्या तांड्यांत करुणाराणी!

मानाजी आणि संभाजी यांची अगदीं थोडी चुकामूक झाली तरी पुढील दोन तीन दिवसांत त्यांचा बेत कांहीं नक्की होऊं शकला नाहीं. संभाजीचा त्या गोष्टीला नाइलाज होता. परंतु मानाजीला तें काय माहीत! तो पूर्व संकेताप्रमाणें त्या विविक्षित ठिकाणीं बैराग्यांच्या तांड्यापाशीं येऊन संभाजी-विषयीं चौकशी करूं लागला तों तिथें संभाजी आलाच नाहीं असें त्याला कळून आलें. त्याबरोबर संभाजीविषयीं भलभलते विचार मानाजीच्या मनांत येऊं लागले. तो फितूर तर नसेल ना? त्यानें आपल्या भेटीची अपरूपाराणी आणि कोयाजी यांच्याकडे चहाडी तर केली नसेल ना? असे अनेक विचार एका मागून एक मानाजीच्या डोक्यांत घोळूं लागले; पण जें झालें तें होऊन गेलें त्याला त्याचा तरी आतां काय इलाज होता!

मात्र त्या बैराग्यांच्या तांड्यांत त्याला एक अनाथ अबला दोन दिवसां-पूर्वींच आश्रयाला आल्याचें कळून आलें. त्याबरोबर त्यानें त्या स्त्रीची जाऊन भेट घेतली. भेट कसली ती? ती स्त्री दोन दिवसांपूर्वीं जी तिथें आली ती तेव्हांपासून या घटकेपर्यंत बेशुद्ध स्थितींतच होती. मानाजीनें जाऊन पाहिलें तों तिच्या सर्वांगावर पुरुषाचे कपडे दिसून आले व केंस मात्र बेशुद्धा-वस्थेंत मोकळे सुटून अस्ताव्यस्त पसरलेले दिसले. शिरस्त्राण नाहींसें झाल्यावर ती कोणी तरी पुरुषवेषधारी स्त्री असावी असें कोणाही अपरि-चिताला ओळखतां येण्याजोगें होतें; व त्याचमुळें बैराग्यांनीं ती स्त्री असावी असें ओळखलें होतें. मानाजीनें त्या स्त्रीला पहातांच त्याला तर तेवढादेखील संशय वाटला नाहीं. त्यानें पहातांक्षणींच ओळखलें. ती करुणा होती. अशा अकल्पित रीतीनें करुणेची भेट झाल्यानें मानाजीला इतका संतोष वाटला कीं त्यामुळें त्याचे दोन तीन दिवस सतत भटकल्यामुळें झालेले सर्व परिश्रम जणूं दूर झाले. त्यानें त्या बैराग्यांच्या तांड्यांतील मुख्य बैराग्याला विचारलें, "ही स्त्री इथें आली तेव्हां ती कोणीकडून आली वगैरे चौकशी तुम्हीं केली काय?" बैरागी उत्तरला, "आम्हीं चौकशी केली. परंतु ती विशेष बोल-ण्याच्या स्थितींत तेव्हां नव्हतीच. प्रथम आम्हांला वाटलें कीं हा कोणीतरी वाट चुकलेला तरुण रानावनांतील श्वापदें किंवा चोर लुटारू पाठीला लागल्यामुळें

जीव घेऊन आमच्या आश्रयाला आली आहे. मला वांचवा, मला वांचवा, असाच तिनें पहिल्यानेंच टाहो फोडला व मी चौकशी करतों तोंच ती बेशुद्ध होऊन खालीं पडली. तेवढ्यांत तिच्या मस्तकाचा फेटा सुटून मोकळा झाल्यामुळें तर ती स्त्री आहे अशी माझी खात्री पटली. तेव्हां पासून तिला शुद्धीवर आणण्याचे आमचे सतत प्रयत्न चालले आहेत. ती क्षणभर शुद्धीवर येते, पुन्हां बेशुद्ध होते. शुद्धीवर आली की अस्पष्ट असें कांहीं कांहीं बडबडते. अपरूपाराणीला तिनें असाच तीन चार वेळा हांका मारून आपणाशीं वैर न साधण्याबद्दल विनंति केली. त्याप्रमाणेंच संभाजी नांवाच्या कुणाची तरी आठवण करून त्याच्या विषयीं कळवळ्याचे उद्गार काढतांना दोन तीनदां तिला आम्ही ऐकलें."

मानाजी त्या वैराग्याच्या त्रुटित शब्दांना स्वतःच्या मनाशीं मेळ घालूं लागला. संभाजी आणि करुणा यांची भेट झाली असली पाहिजे., अपरूपाराणी आपल्या नाशाला टपून बसल्याचें करुणेला माहीत असलें पाहिजे, एवढें त्यानें ओळखलें. परंतु संभाजी कुठें आहे, आणि करुणा कुठून आली याविषयीं त्याला कांहींच तर्क करतां येईना. वैराग्यांच्या मुख्याला सांगून त्यानें प्रथम करुणेला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न जोरानें सुरू केला. त्या प्रयत्नांना पूर्वीच्या दोन दिवसांपेक्षां जास्त यशही आलें. वनस्पतिजन्य औषधींची त्या मुख्य वैराग्याला चांगली माहिती असल्यामुळें तो आज दोन दिवस तेच उपचार करुणेला शुद्धीवर आणण्यासाठीं करीत होता, आणि एक रामबाण औषधी अरण्यांतून कोठून आणण्यासाठीं दोन दिवसांपूर्वीच त्यानें आपल्या एका शिष्याला पाठविलें होतें. तो शिष्यही ती औषधी घेऊन यावयाला त्याला वेळ लागला. त्या औषधी वनस्पतीच्या मुळ्या ठेंचून त्यांचा रस काढून तो करुणेच्या मस्तकाला चोळण्यांत आला. तिच्या सर्वांगालाही तीच औषधी लावणें आवश्यक होतें व मानाजी तिथें आला नसता तर त्या वैराग्यानें निष्पाप भावनेनें करुणेला आपली कन्या समजून तिच्या जीवनरक्षणासाठीं तिच्या अंगाला तेवढाच स्पर्श करण्याला कमी केलें नसतें. परंतु मानाजी तिथें आला व त्यानें तिला पाहिलें, त्यावरून तिची मानाजीची चांगलीच ओळख असल्याचें हेरून त्या वैराग्यानें मानाजीला सांगितलें, "तो रस घे, आणि त्या मुलीच्या छातीला त्याचा लेप कर. तसेंच तिच्या पायाचे तळवेही त्या रसानें चोळ कीं

ती ताबडतोब शुद्धीवर आलीच म्हणून समज." मानाजी तें ऐकून अंमळ ओशाळल्यासारखा झाला. परंतु गुरूची आज्ञा म्हणून त्याला तसें करणें प्राप्तच होतें. त्यानें करुणेच्या पायांना स्वतः तो रस चोळला. त्याबरोबर थोड्या वेळांत ती दिव्य औषधी आपला प्रभाव दाखवूं लागली.

"तसाच तिच्या छातीलाही तो रस चोळला पाहिजे म्हणजे ती ताबडतोब शुद्धीवर येईल." मुख्य बैरागी म्हणाला. परंतु मानाजीला तसें करण्याला संकोच वाटूं लागला. तो लाजूं लागलेला पाहतांच बैराग्यानें, "अरे, ती रुग्णाईत आहे. अशा वेळीं स्त्री-पुरुष—भाव मनांत धरून चालावयाचें नाहीं. आपद्ग्रस्त जीव भेटला म्हणजे मग तो स्त्री-पुरुष कोणीहि असो त्याचा जीव रक्षण करण्यासाठीं आपण कांहींहि केलें तरी तें पाप नव्हे. मीं स्वतः तसें केलें नाहीं, याचें कारण तुझी आणि त्या मुलीची ओळख असावी असें मला वाटलें. ती शुद्धीवर आल्यावर मीं तिच्या अंगाला स्पर्श केला असें तिला कळून आलें असतें, तर तिला लाजल्यासारखें झालें असतें. म्हणून तुला तें काम मीं सांगितलें." इतकें तो बैरागी बोलतो आहे तोंच त्याचा एक दहा-अकरा वर्षांचा बालशिष्य हनुमान या नांवाचा तिथें आला. त्याबरोबर मानाजीनें त्याला हांक मारून त्याला म्हटलें, "हनुमान, गुरुजी सांगतात त्याप्रमाणें कर. तो रस घे आणि या बाईच्या सर्वांगाला चोळ."

बैराग्यानेंहि हनुमानाला तशी आज्ञा केली. निष्पाप वृत्तीचा तो कोंवळा बालक गुरुजींची आज्ञा प्रमाण मानून करुणेच्या सर्वांगाला रस चोळूं लागला.

तें बैराग्यांचें वास्तव्यस्थान कांचनगडापासून अवघ्या दोनतीन कोसांवर एका अगदीं एकान्त स्थळीं निबिड झाडींत एका जुन्या मोडकळलेल्या देवालयांत होतें. तेथें बरेचसे बैरागी होते. त्यांतला एक मुख्य असून बाकीचे त्याचे शिष्य होते व मानाजीदेखील त्यांपैकींच एक होता हें वाचकांना कळून चुकलेंच आहे. यवनांनीं दाही दिशांना मांडलेल्या हलकल्लोळामुळें जे कांहीं धर्मात्मे हिंदू वैतागून सर्वसंग—परित्याग करून परागंदा झाले होते त्यांपैकींच पूर्वोक्त बैरागी हा एक अधिकारी ब्राह्मण होता. तो तंजावरचा राहणारा. तेव्हांपासून मानाजीचा व त्याचा परिचय आणि तो सत्पुरुष गणला गेल्यामुळें मानाजीनें लहानपणींच त्याचें शिष्यत्व पतकरिलें होतें. पुढें अनेक कारणांमुळें तो बैरागी तंजावर सोडून तपश्चर्या करीत देशोदेशीं हिंडतां हिंडतां आतां त्या ठिकाणीं वास्तव्य

करून राहिला होता. धर्मरक्षण हें त्याचें प्रधान कर्तव्य असल्यामुळें आपल्या परमपूज्य हिंदु धर्माचें जिवाभावाच्या मोलानें रक्षण करणारी तरुण पिढी हिंदूंतून निर्माण झाल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें त्याचें मत होतें, व म्हणूनच अशी तेजस्वी पिढी निर्माण करण्यासाठीं त्यानें जे जे उपाय आंखले होते त्यांतीलच एक उपाय हा होता कीं, आपल्यासारखेच स्वार्थशून्य व धर्मसेवापरायण असे शिष्य गोळा करून त्यांना संन्यासदीक्षा द्यावयाची व त्यांना देशाच्या, देवाच्या व धर्माच्या सेवेसाठीं कार्यक्षम करावयाचें. या ध्येयानुसार त्या बैराग्याचा उद्योग चालला होता.

त्या दिव्य औषधीनें हां हां म्हणतां आपला प्रभाव दाखविला. करुणा त्यापूर्वींच हलचाल करूं लागली होती, ती आतां उठून बसण्याचा प्रयत्न करूं लागली व डोळे उघडून सभोंवार पाहूं लागली. मानाजी तिला म्हणाला, " राणीसाहेब, जागच्या हालूं नका. असेच तशाच स्वस्थ रहा. श्रम तुमच्या शरीराला सोसवणार नाहींत." करुणेनें मानाजीचा शब्द मानिला. ती किंचित् स्वस्थपणें करुणापूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पाहात उद्गारली, " मानाजीराव, आपण इकडे कुठें ?"

" आणि आपण इकडे कुठें ?" मानाजीनें उलट विचारिलें.

" काय या राणीसाहेब आहेत! " बैराग्यानें आश्चर्यपूर्वक प्रश्न केला.

" होय. या तंजावरच्या राणीसाहेब आहेत." मानाजी उत्तरला.

करुणेनें किंचित् ओशाळेपणानें मान जरा बाजूला फिरविली.

"हें मला माहीत नव्हतें. एकूण आज आमच्या हातून राणीसाहेबांची बहुमोल सेवा झाली म्हणावयाची. मात्र या सेवेचा मोबदला आम्हांला मिळाला पाहिजे, हें मी आमच्या राणीसाहेबांना वेळींच सांगून ठेवितों. आमच्या धर्माचा, समाजाचा किंवा राष्ट्राचा उद्धार कर्त्या राजपुरुषांच्या कर्तव्यतत्परतेवर अवलंबून आहे, आणि राजपुरुषांना कार्यक्षम करणें सर्वस्वी या त्यांच्या देवतेच्या हातीं आहे. " बैरागी उद्गारला.

"पण ही देवतेची मूर्ति तूर्त तरी भंगली आहे, दृष्टावली आहे." करुणा विपण्ण चित्तानें म्हणाली.

" भंगलेली मूर्ति पुन्हां अभंगतेनें सांधली जाईल आणि दृष्ट लावणाराच्या डोळ्यांत मीठ-मोहरी पडून पुन्हां सर्व कांहीं पूर्ववत् आनंदमय होईल.

आपण ईश्वराच्या ठिकाणीं अढळ श्रद्धा ठेवा, कीं तो आपल्याला कधींही अंतर देणार नाहीं. पण आपण अगोदर मला सांगा, इकडे आपलें येणें कसें घडलें?" मानाजीनें विचारिलें.

" संभाजी मला देवदूतासारखा भेटला म्हणून मीं हा दिवस पाहिला आहे, नाहींपेक्षां तुम्हांला ही करुणा आज या जागेंत मुळींच जिवंत दिसली नसती, पण संभाजी कुठें आहे ?"

मानाजीला संभाजीच्या वर्तनाविषयीं संशय वाटूं लागला होता. पण करुणेनें संभाजीची इतक्या आदरपूर्वक आठवण करतांच त्यानें मनांत खूणगांठ बांधली कीं, संभाजी आपणाला वाटला तसा विश्वासघातकी नाहीं. तो कांहीं तरी अपरिहार्य अडचणीमुळें कुठें तरी गुंतून पडला असला पाहिजे. एरव्हीं तो येथें येऊन घडल्या प्रकाराची खबर द्यायला चुकला नसता. संभाजी कोणत्या महत्त्वाच्या कामगिरींत गुंतला होता याचा अर्धवट उलगडा करुणेच्या उद्गारांवरून झालाच होता. बाकीचा उलगडा करून घेण्यासाठीं मानाजीनें करुणेला पुन्हां प्रश्न केला. तेव्हां तिनें तीन दिवसांचा वृत्तांत निवेदन केला, "हें पहा, माझ्या आयुष्याचा सत्यनाश करण्यासाठीं फारां दिवसांपासून खुद्द आमच्या राजवाड्यांत सासूबाई आणि कोयाजी वगैरे त्यांच्या पक्षाचे लोक यांच्याकडून भयंकर कारस्थान रचलें जात होतें; याची मला परवांपावेतों दाददेखील नव्हती. बाबा आजारी असल्याचें एक पत्र कोठूनसें तंजावरांत माझ्या हातीं आलें व सासूबाईंनीं माझ्या वतीनें तिकडे रदबदली करून मला बाबांच्या समाचारासाठीं पाठविलें. पण मी बाबांना भेटून पाहातें तर ते मुळींच आजारी नव्हते. माझ्या मागोमाग मला, तुम्हांला आणि बाबांना बंदिवान् करण्यासाठीं राजदूत निघाले तेव्हां आपल्या रक्षणाचा भार परमेश्वरावर घालून आम्ही तशींच घर सोडून निघालों तों सुरक्षितपणासाठीं कांचनगडाच्या आश्रयाला गेलों.

" पण महाराजांना तरी आपल्याविषयीं किंवा माझ्याविषयीं संशय येण्याचें व आम्हांला दोषी ठरविण्याचें काय कारण ?" मानाजीनें मध्येंच विचारिलें.

करुणा उत्तरली," तो सारा आमच्या हितशत्रूंचा डाव होता. सासूबाईंनीं आमच्या देवघरांतील त्या प्रासादिक तरवारी तिथून चोरून नेल्या आणि मानभावीपणानें त्या चोरीचा आरोप माझ्यावर लादला. तुम्ही माझ्यापूर्वींच सासूबाईंच्या कारस्थानाचा तलास लावण्यासाठीं बाहेर पडलां होतां त्याचा

फायदा घेऊन माझा आणि तुमचा अनीतिकारक संबंध असल्याचा विषय अप्रत्यक्षपणें महाराजांच्या कानीं घालण्याला त्या चांडाळणीनें कमी केलें नाहीं." बोलतां बोलतां करुणेचा कंठ दाटून आला. ती क्षणभर स्तब्ध राहिली. मानाजीचे नेत्र संतापानें खदिरांगरांसारखे लाल झाले. तो आवेशानें म्हणाला, " माझ्याविषयीं ती कुलटा अशा पापी संशयाचा फैलाव करते काय? थांब, म्हणावें, हा मानाजी जर अस्सल मराठ्याच्या पोटचा असेल तर कुलटे, तुला आणि तुझ्या साथीदारांना या अघोर अपराधाबद्दल यथायोग्य शासन करील. करुणेसारख्या पतिव्रतेची निंदा म्हणजे त्यांना पोरखेळ वाटला काय ?"

करुणा पुढें म्हणाली," आम्ही कांचनगडावर आलों पण तेथला किल्लेदार मीरकासीम इतका नीच विश्वासघातकी असेल याची आम्हांला तेव्हां कल्पना नव्हती. त्यानें पापवासनेनें प्रेरित होऊन मला जन्मांतून उठविण्यासाठीं प्रथम बाबांना कैदेंत लोटलें आणि तेव्हांच त्या नरपशूच्या हातीं माझ्या स्त्रीजन्माची इतिश्री व्हावयाची! पण तेवढ्यांत सासूबाई आणि कोयाजी किल्ल्यावर आलीं. त्यांना भेटण्यासाठीं मीरकासीमला तेथून माझा छळ अर्धवट सोडून बाहेर जावें लागलें. मला प्रथम सासूबाईंचा मोठा आधार वाटला. पण अंमळशानें संभाजी अकस्मात माझ्या महालांत आला व मला जेव्हां सांगूं लागला कीं, माझ्यावर मन मानेल तसा अत्याचार करण्याला सासूबाईंकडून मीरकासीमला मुभा मिळाली आहे, तेव्हां मी सर्व बाजूंनीं हतबल होऊन गेलें. मीरकासीमनें महाराजांना स्थानभ्रष्ट करून सासूबाईंच्या आवडत्या दासीपुत्राला तंजावरचा राजा करण्याचें कबूल केल्यामुळेंच त्याला लांचेदाखल माझा बळी द्यावयाला व त्या निमित्तानें आपल्या वाटेंतला माझा काटा दूर करावयाला सासूबाई तयार झाल्या. आमच्या राजवाड्यांतून चोरीला गेलेल्या प्रासादिक तरवारीही कोयाजीमार्फत त्यांनीं चंदासाहेबाच्या हवालीं केल्या आहेत आणि त्यांचें चंदासाहेबाशीं संगनमत झालें आहे, असेंही संभाजीनें मला सांगितलें. त्यानें लगेच मी नको नको म्हणत असतां आपले कपडे उतरून मला दिले आणि त्या पुरुषी वेषांत मला हरयुक्तीनें महालाबाहेर काढून दिलें. कदाचित् मीरकासीमला तेवढ्यांतच महालांत येण्याची इच्छा होईल आणि मी तिथून नाहींशी झाल्याचें कळल्यास, तो मी कुठें तरी सुरक्षित ठिकाणीं पोंचण्यापूर्वीच माझा पाठलाग करील, या भयानें स्वत: संभाजी माझीं वस्त्रें नेसून बुरखा घेऊन त्या ठिकाणीं बसला.

मी पुरुषी वेषांत किल्ल्यांतून बाहेर पडल्यें तों संभाजीनें सांगितल्याप्रमाणें याच बैराग्याच्या वसतिस्थानाचा शोध करीत सतत तीन दिवस रानोमाळ हिंडत होत्यें; पण शोध कांहीं लागला नाहीं. उलट माझा सुगावा लागल्यामुळें शत्रू मात्र माझा पाठलाग करूं लागले. म्हणून मी जीव आणि अब्रू बचावण्यासाठीं सैरावैरा पळूं लागलें तों धापा टाकीत इथें येऊन पोंचलें. त्यापुढें काय घडलें हें मला माहित नाहीं. " करुणेचें निवेदनही संपलें आणि तिला अशक्ततेमुळें ग्लानीही आली. ती किंचित् मान टाकून स्तब्ध राहिली. आतां संभाजीचा शोध कसा लागणार या फिकिरींत मानाजी होता; तोंच अकस्मात् तेथें संभाजी हजर.

# प्रकरण २० वें

# संकट आलें पण टळलें

संभाजीला पाहातांच मानाजीला जितका आनंद झाला, त्यापेक्षां करुणेला जास्त आनंद झाला. संभाजीला तर करुणा तेथें सुखरूप येऊन पोंचली असें पाहून इतका आनंद झाला कीं, त्याला योग्य अशी उपमाच नाहीं.

"संभाजी, तूं सुखरूपपणें त्या राक्षसाच्या जबड्याबाहेर पडलास? —परमेश्वरा, तुझी लीला अगाध आहे!" करुणा संभाजीला पाहून कृतज्ञ अन्तः-करणानें आकाशाकडे पहात हात जोडून म्हणाली.

"राणीसाहेब, ही आपल्या—पतिव्रतेच्या पुण्यव्रताची पुण्यायी माझ्या रक्षणाला धांवून आली." असें उद्गारून संभाजीनें तात्काळ करुणेसमोर मस्तक नमविलें.

"पण तुझी सुटका तेथून कशी झाली?" मानाजीनें विचारिलें.

"तुम्हांला तो सर्व प्रकार राणीसाहेबांकडून कळला आहे एकूण!" संभाजी उद्गारला.

"होय. राणीसाहेबांना बंदिवासांतून मुक्त करून तूं तिथें ओलीस राहिलास, त्यानंतर काय झालें तें सांग."

"त्यानंतर काय, अगदीं माझ्या अपेक्षेसारखें झालें. त्या नीच राणीची अत्याचाराला मान्यता मिळालेली मीं ऐकली, तेव्हांच अंदाज केला कीं, रातो-रात आतां मीरकासीम राणीसाहेबांना गांजावयाला येणार. त्याप्रमाणें तो आलाच व पशूसारखे नाना चाळे करूं लागला. मींदेखील त्याला प्रथम हुल-कावण्या दाखवून तो अंमळ बेसावध आहे असें पाहतांच त्याला यमसदनाला पाठविलें व तसाच स्त्रीवेषांत बाहेर पडलों...."

"स्त्रीवेषांत तुला कोणींदेखील ओळखलें नाहीं?" करुणेनें मध्येंच विचारिलें.

"नाहीं. उलट माझा स्त्रीवेषच माझी जिवंतपणीं तेथून मुक्तता करूं शकला. जसा धनी पागल तसे त्याचे सेवकही झाडून सारे पागलच. शिवाय स्त्री ही वस्तू अशीच आहे कीं, ती विचारवंत पुरुषाला देखील पागल बनवूं शकते.

मीं जो जो माणूस भेटला त्याला त्याला त्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें थापा देऊन माझी मुक्तता करून घेतली. शेवटच्या दरवाजावरील पहारेकरी मात्र जरा खमंग भेटला. त्यानें मी स्त्री नाहीं हें जरी ओळखलें नाहीं तरी ही किल्ल्यांतली कोणीतरी दासी—बहुधा हिंदु दासी नुकतीच बळजबरीनें बाटवलेली अशी पळून जात आहे असें त्याच्या मनानें घेतलें, व लगेच मला घेरून "हरामजादी! असें पळून जावयाचें होतें तर प्रथमच सुखाच्या नादानें बेहोष होऊन इथें कशाला मरावयाला आलीस! थांब. किल्लेदार साहेबांना सांगून तुझी चांगली गाढवावरून धिंड काढावयाला लावतों." असें तो म्हणाला, त्यावरून मीं त्याचा मानस ओळखला. मीं अंमळ गयावया करतांच व 'मला तूं जीवदान देशील तर मी तुझी जन्मभर दासी होऊन रहावयाला तयार आहें' असें सांगतांच तो मूर्ख हुरळला, व 'तसें असेल तर चल मी तुला माझ्या घरांत नेऊन लपवून ठेवतों व उद्यां रात्रौ आपण येथून मोंगलाईंत पळून जाऊन तेथें आपला टुणटुणीत नवा संसार थाटूं' असें म्हणाला. मी त्याच्याबरोबर त्याच्या घरापात्रेतों गेलों आणि तो किंचित् बेसावध असतांना त्याला खंजीराच्या एका घावाबरोबर यमसदनाला पाठविलें."

"वा:! वा:! तूं फारच बहार केली म्हणावयाची! याबद्दल तुला काय बक्षीस पाहिजे बोल." करुणा हर्षभरित होऊन म्हणाली.

"ऐका तर खरें!" संभाजी पुढें सांगूं लागला, "एथवर झालें तें कांहींच नाहीं असे दुर्धर प्रसंग मला पुढें गेल्या तीन दिवसांत सहन करावे लागले व त्या प्रसंगांतून पार पडतांना माझ्या हातून अशा कांहीं चुका घडल्या आहेत कीं, त्यांबद्दल आपण—आणि मानाजीराव तुम्हींही मला अगोदर क्षमा केली पाहिजे."

"सांग सांग काय काय घडलें तें सारें सांग! तूं कांहींही केलें असलेंस तरी तें सद्धेतूनें केलेलें असल्यानें तुला सात खून माफ!" असें उद्गारून मानाजी संभाजीच्या तोंडचा पुढील वृत्तांत ऐकण्यासाठीं कान टंवकारून बसला.

संभाजी सांगूं लागला," तसें पाहूं गेल्या मीच त्या अपराधाबद्दल जबाबदार आहें असें नाहीं. आणि एका परीनें तो अपराधही नाहीं. दुर्जन म्हटले कीं ते मग कोणीही असोत, त्यांना यथायोग्य शासन झालेंच पाहिजे. ईश्वराला तो न्याय तांतडीनें करावासा वाटला, म्हणून तो माझ्या आणि इतर हिंदूंच्या मुखीं उभा राहून न्याय करूं शकला."

"पण काय झालें तें तर सांग ना!" करुणा अधीर होऊन म्हणाली, "अगोदर मला बाबांविषयीं कांहीं खबर असली तर ती सांग."

"झुंझाररावांची मुक्तता झाली व ते आतां आपल्या साहाय्याप्रीत्यर्थ सैन्य जमविण्याच्या उद्योगावर गेले आहेत."

"एकूण बाबांची सुटका झाली तर! ईश्वरा! तूं आमचा खरा पाठीराखा आहेस." करुणा संतोषपूर्ण स्वरांत आकाशाकडे नजर लावून दोन्ही हात जोडून उद्‌गारली. मानाजीलाही तितकाच संतोष वाटला. बैराग्याला झुंझारराव हे कोण हें माहीत नसल्यानें त्यानें मानाजीपाशीं त्याची चवकशी केली व मानाजीनें 'ते राणीसाहेबांचे पिताजी' एवढेंच सांगितलें.

"असें का? ते कोणत्या बाजूला सैन्याची जमवाजमव करण्यासाठीं गेले आहेत?" बैराग्यानें विचारिलें.

"त्यांनीं चार दिवसांनंतर मला श्रीरंगाच्या मंदिरांत भेटण्याचें कबूल केलें आहे. या गोष्टीला आज एकच दिवस होऊन गेला." संभाजी म्हणाला.

"ठीक आहे. तर मग मीही त्यांच्या साहाय्यार्थ तिकडे जाणार." बैरागी मानाजीला म्हणाला, "बेटा मानाजी, यावनी छळापासून कर्नाटक मुक्त होण्याची शुभ वेळा अगदीं जवळ येत चालली, तूं आतां धीरानें कार्यप्रवृत्त हो, असा माझ्या श्रीरंगानें मला काल रात्रींच स्वप्नांत येऊन दृष्टांत दिला. त्याअर्थीं आतां मला त्याच उद्योगाला लागलें पाहिजे. राणीचें रक्षण करण्याला तूं आतां समर्थ आहेसच. याशिवाय या टापूंत तुला जी काय जागृति करतां येईल ती तूं करावी व अनुयायी मिळतील तेवढे माझ्या नांवावर मिळवून शक्य तितक्या लवकर श्रीरंगाच्या मंदिरांत माझी भेट घ्यावी. यापुढें प्रस्तुतच्या झगड्याचा सोक्षमोक्ष होईतों आमचें वास्तव्य श्रीरंगाच्या चरणांपाशीं आहे असें समजावें. तुझ्या मदतीसाठीं येथें माझे दोन शिष्य ठेवून मी आतां माझ्या नियोजित कार्याची सिद्धता करण्याला निघतों." असें म्हणून बैरागी तेथून जाऊं लागला. मानाजी, संभाजी व करुणा यांनीं त्याच्या पायांवर मस्तक ठेवून त्याचा आशीर्वाद मिळविला. करुणेनें कृतज्ञतापूर्वक विनंति केली "गुरुदेव, आपण माझे धर्मपिते आहां. आपल्या कृपेनें माझें मंगल होवो."

"मुली, तुझें सर्वतोपरी मंगल होईल बरें! कांहीं देखील चिंता करण्याचें कारण नाहीं." असा तिला आशीर्वाद देऊन बैरागी तेथून प्रसन्न चित्तानें बाहेर पडला.

करुणेच्या सुटकेनंतरच्या रहस्याचें निवेदन अगदीं भरांत आलें असतांना तिकडे दुर्लक्ष करून तो बैरागी निघून गेला. तें पाहून संभाजीला अंमळ चमत्कारिक वाटलें. मानाजीनें तें संभाजीच्या चर्येवरून ओळखलें व म्हटलें, "गुरुमहाराज म्हणजे एक अवलिया आहेत. सांसारिक सुखदुःखांत अगर राजकारणाच्या भानगडींत त्यांचें मन मुळींच रमत नाहीं. ते पूर्ण विरक्त वृत्तीचे आहेत; केवळ देशाच्या व धर्माच्या मंगलासाठीं अर्थात् विश्वमंगलासाठींच ते शरीर धारण करून आहेत."

"बरें; पण तूं आतां कोणाचा कसला न्याय देवानें केला म्हणालास?" करुणेनें संभाजीला विचारिलें.

संभाजी सांगूं लागला," मीं त्या पहारेकऱ्याला ठार मारून त्याचा पेहराव धारण करून तसाच रातोरात गडावर गेलों व एकदम अशी हूल उठवून दिली कीं, मुरारराव घोरपडे किल्लेदाराच्या विरुद्ध बोभाटे ऐकून ऐकून चिडून गेले असून उजाडण्यापूर्वींच त्यांचा गडाला वेढा पडणार आहे. किल्लेदारसाहेब सैन्याची जमवाजमव करून गडाच्या पायथ्याशीं बंदोबस्त राखण्याकरितां तांतडीनें आतांच तिकडे निघून गेले असून तसाच प्रसंग पडल्यास गडांतून शत्रूवर मारा करतां यावा म्हणून दारूगोळ्यांचीं कोठारें खुलीं राखून सरबत्तीची तयारी राखण्याचा त्यांचा हुकूम आहे. ही हूल उठविण्यांत माझा हेतु दारूगोळ्याच्या कोठारांचा तलास करण्याचा होता, व तो चांगल्या प्रकारें सफल झाला. सुदैवाची गोष्ट ही कीं, त्यांतलें एक कोठार अपरूपाराणी व कोयाजी हीं दोघें त्या रात्रीं ज्या महालांत विश्रांति घेत होतीं त्याच महालाखालीं होतें. मीं पहाटेच्या वेळीं सर्वत्र सामसूम आहे असें पाहून त्या कोठाराला बत्ती ठोकली आणि तसाच गडाबाहेर किल्लेदार साहेबांना सर्वत्र आबादीआबाद असल्याची खबर देण्यासाठीं म्हणून जो निसटलों, तो पुन्हां माघारा कशाला जातों! गडाच्या पायथ्याशीं असलेल्या एका खेड्यांत राहून गडाचें पुढें काय होतें तें पहात बसलों होतों."

"पुढें काय झालें?" मानाजीनें उत्कंठेनें विचारिलें. वास्तविक संभाजी सारा वृत्तांत सांगतच होता. परंतु तेवढादेखील मानाजीला धीर निघेना. कारण, संभाजी गडावरील दारूगोळ्याच्या कोठाराला बत्ती देऊन चुकला होता!

"पुढें काय; व्हावयाचें तेंच झालें. दारूचें कोठार पेटलें व धाड् धुडुम्

अशा आवाजांच्या धुमधडाक्यांत त्या कोठारावरचा महाल कोसळून पडला! गडावरील सर्व मंडळी घाबरी होऊन इकडे तिकडे सैरावैरा पळूं लागली! हें सर्व मला कोयाजीच्याच तोंडून कळलें. महाल कोसळून पडला तेव्हांच कोयाजी देखील ठार व्हावयाचा. परंतु त्याचें मरण तेथें नेमलेलें नव्हतें."

"आणि सासूबाई? त्यांची काय अवस्था?" करुणेनें भयभीत चित्तानें प्रश्न केला.

"थोरल्या राणीसाहेब त्या धूमधडाक्यांत निजधामाला गेल्या असाव्या हें मला तरी कोयाजीनें सांगितलें."

"अरेरे! सासूबाई मृत्युमुखीं पडल्या, त्यापेक्षां कोयाजी मेला असता तर फार बरें झालें असतें." करुणा म्हणाली.

"कां कां? त्या तुमच्या सासूबाई म्हणून?" मानाजीनें विचारिलें.

करुणा यावर काय बोलणार! अपरूपाराणीची कड घेऊन तिनें तरी कोणत्या तोंडानें बोलावें! ती संभाजीकडे वळून विचारूं लागली, "गडाची त्या आगीमूळें अगदीं वाताहत उडाली असेल!"

"अगदीं वाताहात उडाली, अगदीं राखरांगोळी झाली! बहुतेक सारीं माणसें कोणी भाजून तर कोणी चेंगरून तर कोणी प्राणभयानें पळतां पळतां अपघातानें यमसदनाला गेलीं." संभाजी म्हणाला.

"अरेरे! फार वाईट झालें!" मानाजी म्हणाला.

"तुम्हाला माहीत नाहीं मानाजीराव, फार चांगलें झालें. एरव्हीं कांचनगड पाडाव करणें आपणांला फार जड गेलें असतें. दगलबाज मीरकासीमनें एकजात आपल्या हो ला हो म्हणणारीं माणसें गडावर भरलीं होतीं, व त्या गडाच्या जोरावर दमलचेरीच्या टापूंत आपला सवता सुभा स्थापन करण्याचा त्याचा मानस होता. त्या शत्रूचा बींमोड झाल्याशिवाय आपणाला दमलचेरीच्या घाटाचा पूर्वीच्याप्रमाणें नव्या मोहिमेंत उपयोग तर झालाच नसता, उलट घाटांत नाकेबंदी करून दबा धरून बसलेल्या त्या मुसंड्या शत्रूंशीं झगडतां झगडतां आपलें सामर्थ्य निष्कारण खर्ची पडलें असतें." संभाजी उद्गारला.

"असें होतें तर झालें तें फार छान झालें. पण एवढ्या हाः हाः कारांतून आपला प्रबळ शत्रु कोयाजी तेवढा नेमका जिवंत राहिला, हें मात्र ठीक झालें नाहीं." मानाजी म्हणाला.

" नाहीं. कोयाजीदेखील बचावला नाहीं. त्याचा नायनाट करण्यासाठीं तर माझा सारा हा खटाटोप होता! तो त्या अनर्थांतून बचावला व आपल्या मंडळीच्या आश्रयाला म्हणून आला, परंतु त्या मंडळीला मीं प्रथमच खोटचा थापा देऊन दूर पांचचार कोसांवर दौडत जावयाला लावल्याकारणानें तो अचानक नेमका माझ्या हातीं लागला. मी लगेच श्रीरंगाच्या नांवानें त्याचा बळी घेऊन मोकळा झालों. एवढें आटोपल्यावर मी ताबडतोब तुमच्याकडे यावयाचा. परंतु येतांना मार्गांत कोयाजीच्या लोकांनीं मला गांठलें, त्यांना चुकवीत हिंडतां हिंडतां एथें यावयाला मला ही वेळ उजाडली. "

" एकूण माझ्यापायीं सासूबाई आणि कोयाजी यांचे बळी पडले, किल्लेदाराचा बळी पडला, कांचनगडावरील आणखी कैक निरपराधी जीवांचा सत्यनाश झाला! " असें म्हणून करुणेनें दु:खाश्रू गाळले.

" झाला हा अनर्थ कांहींच नाहीं, असे अनर्थ आपल्या पायीं यापुढेंही घडून येतील आणि त्यांना आपण स्वत: साक्षी असाल. " असें कठोर वाणीनें उद्गारून मानाजीनें संभाजीला विचारिलें, " बरें; आणखी कांहीं खबरबात?"

" आणखी खबर नाहीं आणि बात नाहीं. आतां आपण प्रथम येथून मुक्काम हलविला पाहिजे. कारण मीनाक्षी राणी आणि मोहना नांवाची एक रक्षा—"

" ती श्रीरंगाच्या देवालयांतून सय्यद खानानें बलात्कारानें पळविलेली ?"

" होय! तीच. तिला चंदासाहेबानें सय्यद खानाच्या पश्चात् तेथून आपल्या रंगमहालांत पळवून नेली होती तीच मोहना. त्या दोघी अकस्मात् त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांतून बेपत्ता झाल्या असून त्यांच्या शोधार्थ चंदासाहेबाचे सैनिक सर्वत्र हिंडत आहेत. त्याप्रमाणेंच कोयाजीचे लोकदेखील अगदींच स्वस्थ बसावयाचे नाहींत. त्यांना जर आमचा सुगावा लागला—विशेषत: राणीसाहेब आपल्यापाशीं आहेत व त्यांचें आपल्याला रक्षण करावयाचें आहे. आपण येथून दुसऱ्या एखाद्या सुरक्षित एकान्तस्थळीं ताबडतोब गेलेंच पाहिजे."

एवढें संभाजी बोलतो आहे तोंच मानाजीच्या एका गुरुबंधूनें अर्थात् पूर्वोक्त बैराग्याच्या शिष्यानें येऊन वर्दी दिली," मानाजी, आपल्या मकाणाला शत्रूचा वेढा घालण्याचा बेत असून सभोंवार शत्रूचे कोणी दोघे हेर पहाणी करीत हिंडत आहेत. आतां कसें करावयाचें? "

" कसें करावयाचें आणि काय करावयाचें! मूर्खा, इतके दिवस गुरुजींच्या

सान्निध्यांत तूं फुकट काढिलेस. हेर हिंडतांना तुला दिसले तर त्यांना ताबड-तोब कैद करून कां नाहीं आणिलेंस? " मानाजीनें रागारागानें विचारिलें.

" मीं सांगितलें त्याचें हें प्रत्यंतर पाहा! " संभाजी म्हणाला, " आतां प्रथम राणीसाहेबांच्या रक्षणाची काय ती तजवीज करा."

" यांच्या रक्षणाची तजवीज! " मानाजी जरा डोकें खाजवून करुणेकडे वळून म्हणाला," राणीसाहेब, आतां आपणाला कसें काय वाटतें? आपणांला थोडीशी तरी घोडदौड करतां येईल काय? "

" हो! प्रसंग आला खरा. आतां त्याला तोंड न देऊन कसें चालेल! " करुणा आंथरुणावर उठून दसतां बसतां म्हणाली. तिची प्रकृति फारच क्षीण झाली होती. परंतु प्राण आणि अब्रू यांच्या भयानें तिच्या अंगांत त्यावेळीं नव्या धैर्याचा व बलाचा संचार झाला. तिच्या अंगीं होती नव्हती तेवढी सुप्त शक्ति एकाएकीं जागृत झाली. ती अंगावरील वस्त्र सांवरीत म्हणाली,"माझी तयारी आहे. तुम्हांला काय मार्ग आंखावयाचा तो आंखा. "

" पण आपणाला आतां पुरुष वेष घेतला पाहिजे. सध्यांच्या स्थितींत आपली ओळख दुसऱ्या कोणाला पटणें इष्ट नाहीं. " मानाजी म्हणाला.

" कां? मी तुमच्या बरोबर आहें आणि महाराजांना तुमच्या व माझ्या वर्तनाचा संशय आला आहे म्हणून काय? " करुणेनें विचारिलें. तोंच "ती पहा राणी! पहातां काय; पकडा तिला... आणि तो पहा मानाजी... तो संभाजी ...सर्व चोरटीं बरीं एकत्र सांपडलीं. चला घाला त्यांना गराडा. आपलें काम फत्ते झालें. " असे उद्‌गार काढीत एक मराठा सैनिक पुढें धांवत आला. त्याच्या मागोमाग बरीच सैनिक मंडळी होती

" ती कोण ती राणी? " एका तरुण वीरानें विचारिलें.

" ती करुणा राणी. " म्होरका उत्तरला. संभाजी, एकदम त्याला ओळ-खून त्याच्या वर तुटून पडला. मानाजी त्या तरुण वीरावर तुटून पडण्याच्या पवित्र्यांत उभा होता, तोंच त्या वीरानें त्याला एका हातानें आवरीत म्हटलें, " मानाजीराव, भिऊं नका. राणीसाहेब, आम्ही तुमचे शत्रु नसून मित्र आहोंत.

" म्हणजे? " तो म्होरका त्या तरुण वीराच्या तोंडाकडे संशयित मुद्रेनें पाहूं लागला. पहातां पहातां त्यानें आपल्या कमरेच्या तरवारीला हात घातला देखील. पण संभाजीनें ' नीचा, हें घे तुझ्या दुष्कर्माचें बक्षीस! ' असें म्हणून

त्याच्या त्या सरसावल्या हातावर एक वार अशा शिताफीनें केला कीं, त्या-सरसा तो हात एकदम कलम झाला. तो तरुण वीर व त्याचा साथीदार यांनींही आपल्या तरवारी म्यानांतून बाहेर काढिल्या व कोयाजींच्या पक्षांतील लोकांशीं चांगलीच झुंज मांडली. पण ते दोघे व प्रतिपक्षी दहाबारा त्यामुळें त्या दोघांचा त्यांच्या समोर टिकाव लागेना. मानाजीला ते दोघे वीर आपले शत्रू कीं मित्र हेंच कळेना. म्हणून तो जवळच स्तब्ध उभा होता. परंतु करुणेनें आपणाला अभय देणाऱ्या त्या दोघा वीरांचा बचाव करणें हें आपलें कर्तव्य आहे असें मानाजीला निक्षून सांगितलें, तेव्हां त्याला तिची आज्ञा मानणें प्राप्तच झालें. तो मध्यें पडला, म्हणून त्या दोघां वीरांचा बचाव झाला.

# प्रकरण २१ वें
# दोघा वीरांची ओळख.



ते दोघे अपरिचित वीर आपल्या साहचार्थ कोण धांवून आले याचा करुणेला उमज पडेना, व मानाजीला देखील त्यांची ओळख पटेना. वाचकांना मात्र एथें सांगावयाला हरकत नाहीं कीं, मुराररावघोरपड्यांकडे परिचयाचे झालेले तेच ते वीर होते. मुराररावाचा निरोप घेऊन ते दोघे जे निघाले, ते चंदासाहेबा-विरुद्ध हिंदु लोकांना चिथावणी देत एकसारखे वणवण हिंडत होते. चंदासाहेबा-बाचा अंमल हिंदूनाच केवळ दुःसह झाला होता असें नसून मुसलमानांनाही तो अगदीं नको नकोसा झाला होता. हिंदूपेक्षां मुसलमानांना चंदासाहेब कांहीं जादा सवलती देत असे, नोकरी चाकरी देतांना धर्मभेदाचा विचार अवश्य करीत असे हें खरें. परंतु तेथेंही पक्षपात होताच, व अनीतिदेखील होतीच. शिवाय नबाबाच्या मुसलमानी अंमलाच्या आकाशांत चंदासाहेब हें एक अशुभ शेंडेनक्षत्र उगवलें आहे, असाही सर्व हिंदु–मुसलमान रयतेचा ग्रह झाला होता. मुसलमानांना झाला तरी नबाबाचा अभिमान होता, नबाबाला ग्रासून नबा-बाचें राज्यवैभव बळकावून बसणाऱ्या चंदासाहेबाचा त्यांना नुसता दरारा होता. फार काय, त्या प्रांतीं जे मुसलमान नबाबांच्या चालत्या काळीं त्यांच्या पदरच्या मुल्ला-मौलवींच्या चिथावणीवजा शिकवणीमुळें मुसलमान तेवढा बंधु व हिंदु तेवढा काफर असा अज्ञानमूलक दुरभिमान हृदयाशीं बाळगून तंजावरच्या मराठी राज्याचा–हिंदु राजसत्तेचा ते तिटकारा करीत होते, ते-देखील आतां अनुभवानें म्हणूं लागले होते कीं, चंदासाहेबासारख्या अन्यायी व जुलमी नबाबाच्या सत्तेपेक्षां हिंदूचें रामराज्य शतपटींनीं चांगलें. याचें कारण हिंदु राजांनीं अगर सरदारांनीं अमुक एक मुसलमान म्हणून त्याला परका माना व अमुक हिंदु म्हणून त्याला जवळ करा, हिंदूंना वैभवाला चढवा आणि मुसल-मानांना भुकें मारा असला अन्याय कधीं करूं नये. त्यांच्या सैन्यांत, त्यांच्या राज्यकारभारांत, त्यांच्या किल्लेदारांत–राज्यकाजाच्या हरएक बाबींत मुसल-मानांना हिंदूप्रमाणेंच अधिकाराचें व मानाचें स्थळ होतें. हिंदु राजांच्या उदार-

मनस्कतेची ओळख दरम्यानच्या नवाबी सत्तेच्या चालत्या काळांत मुसलमान विसरत चालले असले, तरी चंदासाहेबाच्या अनीतिकारक राज्यकारभारानें त्या बहुतेकांवर सुद्धां 'हिंदु राज्य यापेक्षां शतपटीनें बरें' असें म्हणण्याचा प्रसंग आणिला होता. त्यामुळें चंदासाहेबाच्या विरुद्ध हिंदु समाजांत चेतना उत्पन्न करून त्यांना युद्धप्रवृत्त करण्याचा क्रम त्या दोघां वीरांनीं आरंभिला, तेव्हां मुसलमान बरेचसे आपण होऊन त्यांना साह्य करण्याच्या इराद्यानें त्यांच्या निशाणाखालीं जमा होऊं लागले.

अगदीं कडवे ऊर्फ हाडामांसानें देखील मुसलमान असणारे कांहीं लोक मात्र त्यावेळीं चंदासाहेबाविरुद्ध शस्त्रग्रहण करण्याला नाखूष होते; मुसलमानी सत्तेविरुद्ध शस्त्र धरणें व हिंदूंना ऊर्फ काफरांना कोणत्याही निमित्तानें बंधुभावानें साह्य करणें हा मुसलमानी धर्मांप्रमाणें 'हराम' ऊर्फ अधर्म होय, अशी त्यांच्या कांहीं मुल्ला मौलवींच्या आगलाव्या भेदमूलक शिकवणींवरून चुकीची समजूत झाली असल्याचा तो परिणाम होता. परंतु सर्वच मुसलमान कांहीं असे हाडामांसाचे मुसलमान नव्हते; बरेचसे बळजबरीनें बाटविले गेल्यानें शरीरानें बाह्यात्कारी मुसलमान पण अंतरंगानें हिंदु असे होते. त्यांना त्यांची धर्मांतर करण्यांत झालेली चूक नानापरींच्या कटु अनुभवानें आतांच कळूं लागली होती.

शिवाय आज कर्नाटकांत यवनसत्तेला उतरती कळा लागल्यानें कार्यसाधु मुसलमानांचा बराचसा ओढा पुन्हां प्रबळ होऊं पहाणाऱ्या हिंदु राजसत्तेकडे वळला होता. जगांतील कोणत्याहि धर्माच्या अनुयायांचें अंतरंग अत्यंत सूक्ष्म दृष्टीनें अजमावून पाहिल्यास जीवनार्थ कलहाचा व्यक्तिमात्राच्या धर्माभिमानाशीं निकट संबंध असतो असें हटकून दिसून येतें. कर्नाटकांतल्या पूर्वोक्त मुसलमानांनाच त्याबद्दल हंसावयाला नको, दिल्लीच्या मोंगल बादशाहीच्या चालत्या अमदानींत अनेक रजपूत राजांनीं देखील आपल्या राजकन्यांचीं मातबर मुसलमानांशीं—बादशहांशीं, शहाजाद्यांशीं किंवा सरदारांशीं लग्नें लावून दिलीं, त्याच्या मुळाशीं तरी या स्वार्थपरायणतेशिवाय दुसरें काय होतें? भीतीनें एकादा मनुष्य असें धर्मनिषिद्ध व नामुष्कीचें कृत्य करण्याला तयार झाला तरी त्या भयाचा उगमदेखील ऐहिक स्वार्थाच्या पोटीं झालेला असतो, हें कटु सत्य सहसा कोणाला नाकबूल करतां यावयाचें नाहीं

असा बहुजन समूहाचा प्रत्यक्ष पाठिंबा मिळवीत ते दोघे वीर तंजावर–त्रिचनापल्ली–गुत्ती दमलचेरी वगैरे टापूंत हिंडत असतांना त्यांना दमलचेरीच्या आसमंतांत् कोयाजी घाटग्याचे अर्थात् अपरूपा राणीचे सैनिक करुणा, मानाजी वगैरेविरुद्ध मंडळींच्या शोधार्थ भिरभिर हिंडतांना आढळले. कांचनगडाचा अकल्पितपणें नाश झाल्याचें कळतांच तर त्यांचें पित्त अगदीं खवळून गेलें होतें. त्यांना मोहन भेटला व आपण अपरूपा राणीच्या पक्षाचे असून आमच्या प्रतिस्पर्ध्यांचा शोध करण्यासाठीं हिंडत आहोंत असें त्यानें त्या लोकांना सांगितलें, तेव्हां ते लोक फंसले व मोहनबरोबर प्रतिस्पर्ध्यांचा शोध करीत हिंडूं लागले. मोहनाला त्या प्रांताची व अपरूपा वगैरे मंडळींची ओळख नसल्यानें ती ओळख पटवून देणारे लोक त्यालाहि पाहिजेच होते. अपरूपा व कोयाजी यांचा कांचनगडच्या प्रलयांत नाश झाल्याचें त्यांपैकीं कोणालाच माहीत नव्हतें.

तो शोध करतां करतां करुणा वगैरे मंडळी अमूक एकान्त स्थळीं आहे असा तपास कोयाजीच्या लोकांना लागला असल्यानें चुलींतला खोबऱ्याचा तुकडा काढून घेण्यासाठीं वानरानें मांजराच्या पंज्याचा उपयोग करून घ्यावा त्याप्रमाणें मोहननें त्यांचा उपयोग करून घेतला होता. तो त्याचा कार्यभाग होतांच त्यानें त्या मूर्खांना कशी यमसदनाची वाट दाखवून दिली, हें वाचकांना मागील प्रकरणांत कळून चुकलेंच आहे.

करुणाराणी, मानाजी, वगैरे सारीच मंडळी आपणाविषयीं बुचकळ्यांत पडलेली आहे असें मोहननें पाहिलें, तेव्हां तिच्याजवळ जाऊन तिची समजूत करण्याला त्यानें सुरुवात केली, " राणीसाहेब, आपण मला ओळखीत नसाल व म्हणूनच माझ्याविषयीं आपलें मन साशंक असेल. परंतु तशी शंका घेण्याचें कांहींदेखील कारण नाहीं. मी आपला पाठीराखा भाऊ आहें असें समजा. "

बोलतां बोलतां मोहननें करुणेचा हात आपल्या हातीं घेतला व करुणेनें तो एकदम मागें ओढला. आश्चर्य हें कीं त्या स्पर्शानें करुणेच्या चित्तवृत्ति जितक्या थरारल्या तितक्या मोहनच्या कांहीं थरारल्या नाहींत. मात्र तो बोलतां बोलतां अंमळ थबकून आपल्या साथीदाराकडे पाहूं लागला एवढें खरें.

" राणीसाहेब, हा तरुण आपल्या परिचयाचा आहे का ? " मानाजीनें संदेहपूर्ण वृत्तीनें प्रश्न केला.

"नाहीं." करुणा उत्तरली.

"ओळख नसली तरी मला वाटतें राणीसाहेब, पाठीराखा भाऊ या नात्यानें माझा स्वीकार करण्याला आपणाला कांहींच प्रत्यवाय नाहीं." मोहन निर्मल चित्तानें उद्‌गारला.

परंतु त्याच्या चित्ताची निर्मलता मानाजी व संभाजी यांच्या—फार काय, करुणेच्या देखील मनाला पटली नाहीं

"तूं राणीसाहेबांना ओळखीत असशील; तूं त्यांचा हितकर्ताहि असशील. परंतु कुत्रा कितीही इमानी झाला तरी धनिणीचें तोंड चाटावयाला धावून गेला तर तें कोणी कसें सहन करावें? एकवार हा अतिप्रसंग मीं सहन केला; पुन्हां असले चाळे करशील तर चांगली अद्दल घडेल याद राखून ठेव." मानजी रागारागानें उद्‌गारला.

परंतु आश्चर्य हें कीं मोहनच्या मनाला त्याचें कांहींदेखील वाटलें नाहीं. तो इतक्या बेफिकीरपणें हंसत तेथें उभा होता कीं पहाणाराला तो एक अति निर्लज्ज माणूस आहे असें तरी वाटावें, किंवा करुणेचा आणि त्याचा पूर्वीचा कांहींतरी निगूढ संबंध असल्यामुळेंच तो इतक्या निर्भय चित्तानें वागतो आहे असें वाटावें. पैकीं करुणेची व त्याची ओळख असणें तर शक्यच नव्हतें. तसें असतें तर तिनें तें लपवून कां म्हणून ठेवलें असतें? इतकेंच काय पण मोहन इतकें झालें तरी हंसत समोर निर्लज्जासारखा उभा आहे असें पहातांच करुणेच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन झोंबली. ती कपाळाला आंठ्या घालून म्हणाली, "कोण निर्लज्ज मनुष्य आहे हा! याला अगोदर एथून हाकलून द्या पाहूं!"

संभाजी इतका वेळ अगदीं स्तब्ध राहून सर्व प्रकार अवलोकन करीत होता. तो मोहनच्या तोंडाकडे संशयग्रस्त मुद्रेनें न्याहाळून पहात उद्‌गारला, "नाहीं. राणीसाहेब, ह्या माणसाला याप्रमाणें मोकळें सोडणें मला धोक्याचें वाटतें. प्रथम मला एक शंका आली आहे तिचा निर्णय करून घेऊं दे. घेऊं का?"

"कसली शंका?" करुणेनें विचारलें.

"याला कांहींतरी बित्तं सुगावा लागलेला दिसतो." मानाजी म्हणाला, "हे बदमाष एथें शत्रूच्या वतीनें हेरगिरी करण्यासाठीं आलेले असावे, व आपल्या प्राणावर बेतणार असें पाहून यांनीं आपल्या संवगड्यांना विश्वासघातानें ठार करून आमच्या डोळ्यांत धूळ फेंकली." बैराग्याचा एक शिष्य मध्येंच म्हणाला.

"मला माझ्या शंकेचें निरसन करून घेऊं देच!" असें म्हणून संभाजीनें एकदम पुढें जाऊन मोहनच्या मस्तकावरचा मंदिल हिसकावून खालीं ओढला. त्यासरसा वस्तुस्थितीवर लख्ख प्रकाश पडला. तो मोहन नसून ती मोहना होती.

"राणीसाहेब, आतां तरी मी आपल्या शरीराला स्पर्श केला यांत कांहीं अपराध केला नाहीं ना? आतां आमचें वेषांतर उघडकीला आलेंच आहे. आतां हातचे राखून ठेवण्यांत मौज नाहीं. राणीसाहेब, मानाजीराव, आमचा रहस्यभेद कोणापाशींही करणार नाहीं अशी आपण सर्वांनीं शपथ दिली तर मी हें रहस्य याहीपेक्षां जास्त खुलासेवार उलगडून दाखवावयाला तयार आहें." मोहन—नव्हे, मोहना म्हणाली.

"आमच्यापैकीं कोणीही ह्या रहस्याचा भेद करणार नाहीं. खरें काय तें एकदांचें कळूं दे." करुणा म्हणाली.

"राणीसाहेब, आतां आपणदेखील खऱ्या स्वरूपांत प्रगट झालें पाहिजे. ही मंडळी आपणाला कोणी परकी नाहींत." असें म्हणत मोहनेनें आपल्या साथीदाराच्या मस्तकावरील मंदिल ओढून काढला. तों ती देखील एक स्त्री होती—ती राणी मीनाक्षी होती.

"काय, राणीसाहेब?" मानाजीनें आश्चर्यचकित वृत्तीनें नेत्र विस्फारीत करून मीनाक्षी राणीकडे पहात विचारलें, "ही कोण आणखी अभागी राणी? आणि तूं कोण?"

मीनाक्षीनें खिन्न वदनानें खालीं मान घातली. तिनें कोणत्या धीरानें वर तोंड करून पहावें? तिच्या हातून पूर्वायुष्यांत घडलेल्या चुका तिला एकीमागून एक आठवूं लागल्या. ती मुळमुळु रडूं लागली.

मानाजी वगैरे मंडळीनें मीनाक्षीराणीचें नांव त्रिचनापल्लीची एक दुराचारी राणी म्हणून अनेकवार ऐकलें होतें. तीच ती असावी असा तर्क करून मानाजीनें म्हटलें, "ही मीनाक्षीराणी आपल्या जातिधर्मावर लाथ मारून—आपल्या उभय कुळींच्या बेचाळीस पूर्वजाना नरकांत लोटून एका हलकट मुसलमान जाराशीं व्यभिचार करणारी—"

किती कठोर शब्द हे!

# प्रकरण २२ वें

# शिवगंगेकडे

लौकिकांत मनुष्याचें शील भ्रष्ट झालें, शरीर भ्रष्ट झालें, तरी मन काय-मचें भ्रष्ट होतेंच असें नाहीं. आपल्या कृतकर्माबद्दलच्या पश्चात्तापानें पावन झालेल्या मीनाक्षीला ते अपमानकारक शब्द दुःसह वाटले. वस्तुतः तिनें मोहनेबरोबर आपली मोकळीक करून घेतली, तेव्हांपासून ती मोहनेला विनवीत होती कीं जग मला हंसेल, माझ्या तोंडावर थुंकेल, मी समाजाच्या उघडया पटांगणांत वावरणें बरें नाहीं. तरीही मोहनेनें तिचें शांतवन करून तिला धीर देऊन आत्महत्येपासून तिचें मन परावृत्त केलें होतें. मीनाक्षी तरीही आत्महत्येच्या निश्चयापासून परावृत्त झाली नसती. परंतु मोहनेनें तिला जाणीव दिली कीं तुम्हांला मरावयाचेंच आहे तर आपल्या अखेरच्या पापाची निष्कृति करून मग तरी मरा! तें अखेरचें पाप म्हणजे मुराररराव घोरपडयांना पाठविलेला स्वदस्तुरचा खलिता होय. मोहनेनें तें पाप किती अघोर आहे व त्या पापाचें निराकरण आतां माणसाकडून होणें कसें अशक्य आहे हें अत्यंत परिणामकारक वाणीनें मीनाक्षीला पटवून दिलें, व तेवढा कार्यभाग आटोपून चंदासाहेबाचा एकदांचा नाश झाल्यावर आपण स्वतःदेखील आत्महत्त्या करून ह्या भ्रष्ट स्त्रीदेहाची इतिश्री करण्याला तयार आहों असेंही सांगितलें, म्हणून मीनाक्षी तेवढी मनाचा धडा करून मोहने-बरोबर नाना जागीं हिंडत होती. तरीही मीनाक्षीनें 'आपल्या खऱ्या स्वरूपांत जगाला आपला परिचय होतां कामा नये, तो परिचय होतांच मी माझ्या जीविताची इतिश्री करून घेईन' असें मोहनेला पूर्वींच निक्षून बजावलें होतें, व मोहनेनेंही तें तेव्हां मान्य केलें होतें. आपली सर्वस्वीं बेअब्रू झाल्या-मुळें जग आपणाला अत्यंत हीनतापूर्वक वागवील ह्या भयानें मीनाक्षी असें बोलत आहे, हा उद्वेगाचा झटका हळुहळू आपोआप दूर होईल, असा दूरवरचा अंदाज बांधून निदान मुराररराव घोरपडयांचा गैरसमज दूर करण्यापुरता तरी आपण तिचा उपयोग करून घ्यावयाचाच असें मोहनेनें आपल्या मनाशीं

ठरविलें होतें. ह्या व इतर सर्व वडामोडी सुसंगतीनें आपल्या हातून पार पडाव्या यासाठींच तिनें व मीनाक्षीनें त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांतून बाहेर पडल्यावर पुरुष वेष धारण केला होता. मोहनेला तो पुरुष वेष फारच खुलून दिसे; तो एक विशीच्या उमरीचा अद्याप मिशीदेखील न फुटलेला गोंडस तरुण आहे असें पहाणाराला वाटे. परंतु मीनाक्षी राणीचा पुरुषवेष सहजासहजी पचला जाण्याजोगा नव्हता. ती मोहनेच्या मानानें वयस्क होती. अशा बिन्मिशीच्या पण कोमल चर्येच्या प्रौढ पुरुषाला पाहून संशय कोणाला कसा येणार नाहीं !

मीनाक्षीला ह्या अडचणीची जाणीव होती. म्हणूनच पुरुष वेषांत झालें तरी प्रामुख्यानें कांहींदेखील न करण्याचें तिनें आपल्या मनाशीं ठरविलें होतें. याचा अर्थ ती चंदासाहेबाच्या बंदिवासांतील ज्वलज्जहाल मीनाक्षी बंदिवास कपाळींचा टळल्यावर हेतुपुरस्सर कर्तव्यच्युत होऊं पहात होती असा नव्हे. परंतु कर्तव्यनिष्ठेची मोहनेच्या अंतःकरणांत तेवणारी ज्योत जितकी तेजस्वी व शीघ्रप्रभावी होती, तितकी मीनाक्षीच्या अंतःकरणांतील ज्योत तेजस्वी व प्रभावी नव्हती. याचें कारण बाह्यतः जरी मीनाक्षी व मोहना या दोघीही पतिता असल्या तरी मोहना अंतःकरणानें गंगाजलाप्रमाणें निर्मल होती;– ती स्त्रीजन्मामुळें प्रतिकूल परिस्थितीशीं टक्कर देतां देतां आपल्या कौमार्याचें रक्षण करण्याला असमर्थ ठरल्यामुळेंच केवळ पतिता बनली होती. मीनाक्षीचें तसें नव्हतें. ती आपण होऊन चंदासाहेबाशीं निषिद्ध मैत्री करून पापाच्या गर्तेत खितपत पडली होती. पहिला कांहीं काळ तर–चंदासाहेबानें आपला केंसानें गळा कापला हें तिला स्पष्टपणें कळूं लागे पावेतों–तिला आपण करतों हें पाप आहे याचीदेखील जाणीव तिच्या मनांत उत्पन्न झाली नव्हती. उलट तिला तेव्हां असेंही वाटत असेल कीं मी एवढ्या धनंतर राज्याची धनीण आहें. ही माझी एकटीची दौलत आहे. या दौलतीचा मीं माझे विलासविहार साजरे करण्याच्या कामीं उपयोग केला तर त्याविरुद्ध ब्र काढण्याचा कोणाला काय अधिकार आहे. त्यानंतर तिला उपरति झाली तीदेखील तिच्या विलाससेवनांत चंदासाहेबाच्या नीचतेमुळें खंड पडला म्हणून ! मोहनेच्या सहवासांत तिच्या सद्भावना जागृत झाल्या, ती कांहीं काळ कार्यप्रवृत्त झाली. परंतु ती प्रवृत्ति अखेरपावेतों कायम टिकूं शकली नाहीं याचें कारण तिला आपण

जगांत कांहीं सत्कार्य करूं शकूं असा आत्मविश्वास वाटत होता. तशी तिची मुळींच इच्छा नव्हती असें नाहीं. परंतु खरें कांहीं तरी कार्य करण्यासाठीं म्हणून जन्माला आलेलीं कांहीं माणसें असतात असें जें आपण म्हणतों त्यांतलीं ती नव्हती. ती एक सामान्य स्त्री, तारुण्यांत तिला विलासविहाराची आवड, त्या दुर्दमनीय आवडीमुळेंच ती तरुणपणीं विधवा झाल्याकारणानें चंदासाहेबाच्या नादीं लागली, आणि आतां तिला जें मरण बरेंसें वाटत होतें त्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे एका बाजूनें चंदासाहेबाविषयीं पूर्ण निराशा व कटु अनुभव, दुसऱ्या बाजूनें ऐहिक सुखवासनेचा भर वयपरत्वें ओसरल्यामुळें सुचूं लागलेला विवेक, तिसऱ्या बाजूनें पश्चात्ताप व त्या पश्चात्तापाच्या ऐन वेळीं घातलेलें मोहनेनें तिच्या डोळ्यांत उपदेशाचें झणझणीत अंजन, आणि चवथ्या बाजूनें स्वतःच्या सार्वत्रिक अधःपातामुळें व परावलंबीपणामुळें आपला सर्वनाश झाला, आतां आपणाला सुखही लाभणें शक्य नाहीं आणि मानमान्यता लाभणें तर शक्य नाहींच नाहीं अशी दुबळ्या मनाची होऊन चुकलेली बालंबाल खात्री. अशा स्थितींत मोहनेनें तिला हाताशीं धरलें नसतें तर तिनें यापूर्वींच आत्महत्त्या केली असती. ती अर्थात् आपल्या हातून घडलेल्या अक्षम्य पातकांचें परिमार्जन म्हणून केवळ नव्हे, तर जगांत आशेनें जगण्याला जागा नाहीं म्हणून !

मोहनेचा विचार मात्र मीनाक्षीला हाताशीं धरण्यांत अगदीं निराळा व सखोल असा होता. तिला पहिलें भय असें होतें कीं न जाणो, आपण एकटचानें कोणत्याही मिषानें मुराररावांकडे जाऊन चंदासाहेबाच्या दुष्ट हेतूविषयीं त्यांना सावध करण्याचा प्रयत्न केल्यावर देखील त्यांनीं सावध होण्याचें नाकारलें तर ! त्यांचा आपणावर विश्वास बसेलच असा भरंवसा तिला वाटत नव्हता, व स्वतः मनांत आणलेल्या सार्वत्रिक मंगलाच्या इच्छेला सफलता प्राप्त होण्यासाठीं मुराररावांसारख्या हिंदु धर्माभिमानी तेजस्वी वीरांचें रक्षण होतें तर तिला अवश्य वाटत होतें. मीनाक्षी राणीनें आपण होऊन मुराररावांपाशीं त्या खलित्याविषयीं रहस्यभेद केल्यास ते त्यावर तरी खास विश्वास ठेवतील अशा खात्रीनें मोहनेनें मीनाक्षीला हाताशीं धरलें होतें. तो कार्यभाग मीनाक्षीची मुराररावांना ओळख न होतांही पार पडला होता. लोकमत आपल्या बाजूनें तयार करण्याच्या कामीं मीनाक्षीचा उपयोग करून

घेण्याचाही मोहनेचा मानस होता. मीनाक्षी कितीही बहकली असली तरी ती जर लोकोपकारासाठीं समाजांत प्रगटपणें वावरूं लागली, तर चंदासाहेबाऱ्या जुलमी अंमलामुळें सर्वत्र संत्रस्त झालेल्या हिंदु रयतेची तिला सहानुभूति मिळेल व चंदासाहेबानें सर्वत्र चालविलेल्या यावनी अत्याचारांचा परिणामकारक बंदोबस्त करतां येईल, अशी मोहनेला आशा होती.

परंतु मोहना मीनाक्षीला एथवर तरी कार्यप्रवृत्त करूं शकली नाहीं. मुरारराव घोरपड्यांची संशयनिवृत्ति होईपावेतों ती आपणाकडे कोणाचें लक्ष जाऊं नये यास्तव पुरुष वेषांत मोहनेचा नव्हे, मोहनाचा अनुचर या नात्यानें वागली. पण तो कार्यभाग आटोपतांच तिनें 'माझें कार्य संपलें, आतां मला माझ्या मार्गानें जाण्याला मोकळीक दे' असें मोहनेच्या मागें टुमणें लावलें होतें. मोहना मीनाक्षीच्या मनाची चलबिचल ओळखून वागण्यांत वाकबगार होती. म्हणूनच ती मिनाक्षीला मुराररावांकडून निघाल्यापासून आज चार सहा दिवस आपल्या बरोबर राखूं शकली. असें करण्यांत मोहनेचा हेतु काय होता तें तिचें ती जाणे !

पण मानाजीच्या एका कठोर वाक्यासरसा मीनाक्षीच्या चित्ताचा आलंब ढांसळला. ती निराशापूर्ण असे उसासे सोडीत कांपऱ्या स्वरांत मानाजीचें वाक्य पूर्ण होण्यापूर्वींच मोहनेला म्हणाली, "ऐक मोहने, माझ्या अभागिनीच्या जीविताचें जगाच्या बाजारांत काय मोल आहे याचा हा दाखला ऐक ! हें ऐकून घेण्यासाठींच आतां मी जगायचें ना ?"

मानाजी बोलून गेला खरा. पण ते शब्द इतके मीनाक्षीच्या जिव्हारीं झोंबलेले पाहून त्याला हळहळ वाटली कीं आपण उगाच बोलूं नये तें बोललों. करुणादेखील त्याला म्हणाली, "मानाजीराव, त्या माउलीच्या दुःखावर तुम्हीं अशा डागण्या द्यावयाच्या नव्हत्या."

"माझी चूक झाली; त्याबद्दल मी त्यांची क्षमा मागतों." असें म्हणून मानाजीनें मीनाक्षीसमोर मस्तक नम्र केलें. मीनाक्षी त्याला दोन्ही हात जोडून उद्गारली, "तुम्हीं माझी क्षमा मागण्याचें कांहींच कारण नाहीं. तुम्ही बोललां तें अगदीं बरोबर बोललां. जगांतील माझ्या विषयींच्या मताची पडसाद परमेश्वरानें मला तुमच्या तोंडून ऐकविली. मी तुरुंगांतून सुटल्यापासून असे उद्गार ऐकण्याचा हा पहिला प्रसंग मी अनुभवत्यें आहें असें नव्हे.

हे सत्योद्‌गार ऐकतां ऐकतां माझे कान अगदीं किटले आहेत. माझी मला क्षणोक्षणीं अधिकाधिक लाज वाटूं लागली आहे कीं मी जगांतील पतिता नारींतील अगदीं हलक्या पायरीची पतिता नारी आहें. देहान्त शासनानें-देखील माझ्या पापांचें परिमार्जन होणार नाहीं, हें मी जाणत्यें. हे विचार मला अत्यंत दुःसह होत आहेत. मरणाच्या यातना देखील ह्या मानसिक यातनांहून शतशः सौम्य ठरतील." मीनाक्षी मोहनेकडे वळून म्हणाली, "मोहने, चांडाळणी, अशा यातनांच्या नरकांत मला जिवंत ठेवणारी तूं माझी मैत्रीण नव्हेस, हाडवैरीण आहेस. मला आतां तुझाही सहवास नको आणि ह्या जगांत वास्तव्यही नको."

आणि नुसतें वास्तव्य नको म्हणून मीनाक्षी थांबली नाहीं, तिनें तेथून तडक प्रयाण केलें. मोहना तिचें शांतवन करण्यासाठीं तिच्यामागोमाग जाऊं लागली. पण मीनाक्षीनें तिला निक्षून सांगितलें, "मोहने, माझ्या मागोमाग कोणी याल तर खबरदार! हा पहा हा खंजीर माझ्या हातीं आहे. यानें मी इथल्या इथें आत्महत्या करून घेईन."

"पण आपण अशा आतां जाऊन जाणार तरी कुठें?" मोहनेनें विस्मय-चकित वृत्तीनें विचारलें.

"परमेश्वर नेईल तिथें." एवढेंच मीनाक्षी उत्तरली.

"नाहीं—मी आपणाला अशा आततताईपणानें जाऊं देणार नाहीं." असें म्हणून मोहना तिच्या मागोमाग धांवत जाऊं लागली.

"काय; तूं माझी पाठ सोडीत नाहींस? तर मग ये—माझ्या मागोमाग ये!" असें म्हणून मीनाक्षीनें खरोखरच आपल्या हातांतील जंबिया छातींत खुपसून घेतला!

* * *

"ईश्वरी योगायोगच तसा होता!" असें म्हणून मोहना, करुणा, मानाजी वगैरे मंडळीनें मीनाक्षीच्या कलेवराकडे पाहून दुःखाचे उसासे सोडले. आणि खरोखरच ईश्वरी योगायोग तसा होता! मृताला देखील दिव्यौषधींच्या संजी-वनीनें जिवंत करणारा मानाजीचा गुरू अंमळशानें तेथें आला. परंतु त्यापूर्वी एक घटकाभरच मीनाक्षीची चिता धड्‌धड् पेटूं लागली होती!

# प्रकरण २३ व
# सर्पाला दूध!

कांचनगडाला अकस्मात् आग लागल्यामुळें विलक्षण हाहा:कार उडाला. असंख्य लोक त्या आगीच्या डोंबाळ्यांत भाजून मरून गेले. किल्लेदार मीर कासीम याच्या बहुतेक कुटुंबाचीही तशीच दुर्दशा झाली. जे कांहीं थोडें लोक बचावले, ते आजूबाजूंच्या भागांत असहाय स्थितींत तिष्ठत राहिले. दौलतीची तर केवळ राखरांगोळी झाली.

त्या संकटांतून बचावलेल्या थोड्या लोकांपैकीं एक निम म्हातारा पुरुष व एक निम म्हातारी स्त्री अशीं दोघेजणें कांचनगडापासून बऱ्याच अंतरावर एका जलाशयाच्या कांठीं असलेल्या धर्मशाळेंत स्वसंरक्षणार्थ थांबलीं असतांना करुणाराणीला जीवदान देणारा तो बैरागी मनांत कांहीं तरी बेत योजून तंजावराकडे निघाला होता तो मुक्कामासाठीं आपल्या हनुमान नांवाच्या अनुचरासह विश्रांतीसाठीं तेथें येऊन उतरला. त्यानें धर्मशाळेंतील त्या म्हाताऱ्या माणसाची ती आसन्नमरण स्थिति पाहिली व जवळच्या बाईला चिंतामग्न स्थितींत पाहिलें तेव्हां अनुकंपापूर्वक विचारिलें., "माते, हा काय प्रकार आहे ?"

त्या स्त्रीनें बैराग्याला वंदन करून उत्तर दिलें, "गुरुदेव, आम्ही प्रवासी आहों. चोरट्यांनीं आमच्यावर हल्ला करून माझ्या या सेवकाला मारझोड केली आणि आमच्या जवळची सारी संपत्ति लुटून नेली."

"मग, तुम्हांला कांहीं द्रव्यसहाय्य पाहिजे काय ?" बैराग्यानें प्रश्न केला.

"नको. मला द्रव्यसहाय्य नको. परंतु हा परका मुलूख आणि आम्हीं अशीं हीं अनोळखी. तशांत माझ्या सेवकाची ही दशा !" असें म्हणून ती स्त्री डोळ्यांना पदर लावून स्फुंदूं लागली.

बैराग्याला त्या दोघांचीही दया आली. त्यानें त्या माणसाची प्रकृति नीट तपासून पाहिली, तों तो माणूस बेसुमार मार बसल्यामुळें अगदीं मृत्यूच्या दारांत घुटमळत पडला होता. त्याच्या शरीरावर झालेल्या जखमा जरी विशेष भयंकर स्वरूपाच्या नव्हत्या, तरी त्याच्या छातीला मार बसून मेंदूलाही जरासा धक्का लागल्यामुळें त्याची अवस्था मोठी कठीण झाली होती.

बैराग्यानें क्षणभर स्वतःशीं विचार करून लगेच हनुमानाला कांहीं औषधी तेथल्या रानांतून शोधून आणण्याला सांगितलें, व तो ती औषधी घेऊन येईतों स्वतः आपल्याजवळच्या औषधी दिव्य तेलाचें त्या माणसाच्या शरीराला मर्दन सुरू केलें.

"तुम्ही कोठून आलां ?" बैराग्यानें त्या आसन्नमरण म्हाताऱ्याच्या आंगाला तेल चोळतां चोळतां त्या बाईला प्रश्न केला.

"आम्ही फार दुरून आलों." ती स्त्री उत्तरली.

"दुरून म्हणजे कोठून ?"

बैराग्याचा तो प्रश्न अगदीं साधा व सरळ होता. पण त्या स्त्रीला मात्र त्याचें उत्तर देणें अवघड वाटूं लागलें. ती बुजट वृत्तीनें उत्तरली, "आम्ही कांचनगडावरून आलों."

"कांचनगड नुक्ताच अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडून तेथें मोठा अनर्थ उडाला हें खरें काय ?" बैराग्यानें विचारिलें.

"होय. पण गुरुदेव, तें आपणाला कसें माहीत झालें ?" त्या स्त्रीनें विस्मयचकित वृत्तीनें विचारिलें.

"मला माझ्या माणसांनीं तो प्रकार सांगितला."

"आपल्या माणसांनीं आपणाला काय सांगितलें ?"

"कांचनगडाला आग लागली म्हणून."

"आणखी कांहीं सांगितलें नाहीं काय ? ?" त्या स्त्रीनें जास्त संशय घेऊन विचारिलें.

"नाहीं. आणखी कांहीं सांगण्यासारखें तेथें घडलें काय ?"

"नाहीं. आपलें विचारिलें."

"पण तुमच्या विचारण्यांत कांहीं तरी गूढार्थ भरलेला दिसतो."

"गूढार्थ कांहीं नाहीं."

"तरी पण..." बैराग्यानें चौकस दृष्टीनें त्या स्त्रीच्या दृष्टीकडे पहात प्रश्न केला, "तुम्ही कांचनगडाच्या रहिवासी काय ?"

"होय." ती स्त्री उत्तरली.

"तेथें आणखी आपलीं कोणी माणसें त्या प्रलयांत सांपडलीं काय ?"

"होय." ती स्त्री कांहीं क्षण स्वतःशीं गोंधळून पण त्या गोंधळलेल्या

वृत्तीचा आपल्या चर्येवर मागमूसदेखील दिसू न देतां उद्गारली, आम्ही तेथील रहिवासी नाहीं..."

"आतांच तुम्ही म्हणालां कीं, आपण तेथील रहिवासी म्हणून बैराग्यानें पूर्वीपेक्षां जास्त चौकस नजरेनें त्या बाईकडे पहात वि

"तें मी स्वसंरक्षणार्थ खोटें बोलल्यें, याबद्दल गुरुदेवांनीं मला क्षमा व पण आम्ही कांचनगडावरील रहिवासी कांहीं नाहीं."

"तुम्ही तेथील रहिवासी असल्याचें दिसतही नाहीं."

"बरोबर आहे. पण आपणाला आमच्या करुणाराणीविषयीं कांहीं कळली काय ?"

"कां बरें? तुमचा करुणाराणीशीं कांहीं संबंध आहे काय ?"

"होय. आम्ही करुणाराणीचे अनुचर आहों." ती स्त्री बैरा चर्येकडे टक लावून पहात सावधपणानें म्हणाली, "राणीसाहेबांच्ये निमित्तानें कांचनगडावर वास्तव्य घडलें होतें; त्यांच्या तैनातींत आम्ही इतक्यांत त्या रात्रौ गडावर एकदम भडका उडाला व त्या धांदलींत गडावरच्या इतर अनेक लोकांबरोबर तेथून वाट सांपडली तसा पळ का तेव्हां आमची आणि राणीसाहेबांची चुकामूक झाली. राणीसाहे जिवासाठीं आम्हांला एकसारखी तळमळ लागून राहिली आहे. आम्ही तिकडून येणाऱ्या माणसांपाशीं चौकशी करून पाहिली. तों म्हणाला कीं, राणीसाहेब सुरक्षित बचावून आगींतून बाहेर पडल्या, त म्हणाला कीं त्या गडावर आपल्या महालांत झोंपीं गेल्या होत्या त्या ज जागीं बेसावधपणानें भाजून मृत्युमुखीं पडल्या. पण खरा प्रकार कळत नाहीं."

"तुमच्या राणीसाहेब देवदयेनें सुखरूप आहेत."

"सुखरूप आहेत ?"

"होय. तुमच्या या संवगड्याची आतां आसन्नमरण अशी अवस्था आहे, तशीच करुणाराणीचीही झाली होती. परंतु तिच्या आयुष्याची खबरदार, म्हणून ती तशा स्थितींत मला भेटली. मीं तिला लगेच योग्य केले व परमेश्वरानें माझ्या हातांना यश देऊन तिला जीवदान दिलें."

"अस्सें! ही आनंदाची वार्ता ऐकली, एक जीव भांड्यांत पडला

आतां आमची आणि आमच्या राणीसाहेबांची भेट कुठें आणि केव्हां होईल ?"

बैराग्याला वाटलें कीं आपलें वास्तव्यस्थान त्या स्त्रीला सांगून टाकावें, म्हणजे तेथें जाऊन तिला करुणाराणीची भेट घेणें सोईचें पडेल. परंतु पुन्हा त्याला वाटलें कीं नको. त्यापेक्षां आपण आपल्या विश्वासू माणसामार्फत त्यांची भेट करवून द्यावी म्हणजे झालें. तो त्या स्त्रीला म्हणाला, "मीच तुमची आणि करुणाराणीची भेट घडवून आणीन."

"कां? आपणाला आमच्याविषयीं संशय येतो काय ?" त्या स्त्रीनें संशयी वृत्तीनें विचारिलें.

"असें कांहीं नाहीं. पण करुणाराणी सध्यां कोणत्या संकटांत सांपडली आहे याची तुम्हांला माहिती आहे ना ?"

"राणीसाहेब संकटांत सांपडल्या आहेत ? हें मला माहीत नव्हतें."

"म्हणजे ? तुम्ही करुणाराणीच्या सेवकगणांपैकीं ना ?"

"होय."

"कांचनगडावर तुम्ही करुणाराणीपाशीं होतां ना ?"

"होय."

"आणि तरीही करुणाराणीवर ओढवलेल्या संकटाची तुम्हांला माहिती नाहीं ? हें मोठेंच आश्चर्य आहे म्हणावयाचें." हे शब्द उच्चारून बैराग्यानें अशा कांहीं अविश्वासू दृष्टीनें त्या स्त्रीकडे पाहिलें कीं आंगाला आगीची झळ लागावी त्याप्रमाणें त्या स्त्रीचें तें चित्र बैराग्याच्या त्या तीक्ष्ण दृष्टिपातानें अस्वस्थ झालें. ती ओशाळलेल्या वृत्तीनें बैराग्याकडे पाहूं लागली.

"गुरुदेव, आपणाला आमचा संशय आलेला दिसतो." ती स्त्री म्हणाली.

बैरागी कांहीं न बोलतां गंभीर चर्येनें त्या स्त्रीकडे पहात होता.

ती स्त्री पुढें आणखी म्हणाली, "आपणाला संशय आला तो बरोबर. माझ्या वृत्तींत इतका वेळ तशी धरसोड होती खरी. राणीसाहेबांवरील संकट आम्हां त्यांच्या सभोंवारच्या सेवकजनांना माहीत नाहीं, असें होईल तरी कसें ? आम्हांला सर्व कांहीं माहीत आहे. पण असें पहा, तोंड असून बोलायचें नाहीं आणि डोळे असून पाहायचें नाहीं अशी आमची केंविलवाणी स्थिति सध्यां झाली आहे. राणीसाहेबांची अब्रू व त्यांचें जीवितही आज मुळींच सुरक्षित नाहीं. आपण ज्या माणसाशीं बोलावें, तो माणूस तरी विश्वासाला पात्र

असेल, तो शत्रुपक्षाचा नसेल, याचा काय नेम? आपण तसे नाहीं. पण मांजराचें दुधानें तोंड भाजलें म्हणजे तें ताकदेखील फुंकून पितें. आम्हांला यापूर्वी अनेक वार असे कटु अनुभव आले असल्यानें फार सावधपणानें वागावें लागतें."

इतकें ती स्त्री बोलते तोंच हनुमानानें पाहिजे ती वनौषधि शोधून आणिली. बैराग्यानें आपल्या तळ हातावर त्यांतला थोडा पाला चोळून आपल्या जवळ-च्या वाडग्यांत त्याचा चांगला चार गोकर्णें भरतील इतका रस काढला व त्याचे चार थेंब त्या आसन्नमरण म्हाताऱ्याच्या नाकांत सोडून बाकीचा रस त्याच्या छातीला चांगला चोळला. पाल्याचा जो चोथा होता, तो त्या म्हाता-ऱ्याच्या शरीरावर जेथें जेथें मार बसला होता तेथें तेथें चोळावयाला हनुमानाला त्यानें सांगितलें.

थोडयाच वेळांत तो म्हातारा हळूहळू शुद्धीवर येऊं लागला. तेव्हां त्या बैराग्याला आनंद वाटला व त्या स्त्रीची चर्याही प्रफुल्ल दिसूं लागली.

"आणखी थोडया वेळानें हा चांगला शुद्धीवर येईल. मात्र तुम्ही आणखी एक दिवस तरी येथून दुसरीकडे जाण्याच्या भानगडींत पडूं नका. हा माणूस बराच अशक्त झाला आहे व त्याला पुरा एक दिवस तरी पूर्ण विश्रांतीची फार आवश्यकता आहे." बैरागी म्हणाला.

"पण आम्हांला राणीसाहेबांची भेट कशी होणार?" त्या स्त्रीनें अधीर चित्तानें विचारिलें.

"आजची रात्र व उद्यां दोन प्रहर पावेतों तुम्ही इथेंच रहा; उद्यां हा अगर दुसरा कोणी तरी माझा मनुष्य येथें येईल व तुम्हांला तुमच्या राणीसाहेबांकडे नेऊन पोंचवील."

"इतकी तसदी आपण घेतली नाहीं तरी चालेल. आपण आम्हांला राणीसाहेबांचा नुसता पत्ता सांगितला तरी आम्ही त्यांचा शोध करीत जाऊं." ती स्त्री म्हणाली.

परंतु बैरागी पुन्हां म्हणाला, "माझा मनुष्य येऊन तुमची योग्य ती व्यवस्था लावून देईल. येथें तुमच्या खाण्यापिण्याची कांहीं व्यवस्था करावयाला पाहिजे आहे काय?"

"कांहीं नको. एवींतेवीं आमच्या जवळची पुंजी सारी चोरीला गेलीच आहे, आतां आम्हांला चोरांपासून भय बाळगण्याचें कांहींच कारण उरलें

नाहीं. आमची इतर संवगडी मंडळी आमचा तपास करीत हिंडत असतील. तीं आम्हांला येऊन भेटतील. तसाच प्रसंग पडला तर मी जवळच्या गांवांत जाऊन गोळाभर अन्न मिळवून आणीन. मात्र आपण आम्हांला राणी-साहेबांचा पत्ता सांगितला असता तर फार उपकार झाले असते. आमची सारी मंडळीदेखील आमच्याप्रमाणेंच त्याच काळजींत आहेत. एकदां राणी-साहेबांची भेट झाली असती म्हणजे सर्वांचा जीव हायसा झाला असता."

बैरागी हनुमानाकडे वळून म्हणाला, "हनुमान, तूं असाच्या असाच माघारा जा व करुणाराणीला ही वर्दी दे." त्यानें त्या स्त्रीकडे वळून विचारिलें, "तुमचें काय नांव राणीसाहेबांना सांगावें म्हणजे त्यांना ओळख पटेल?"

"नांव?" ती स्त्री स्वतःशीं अंमळ घोंटाळत म्हणाली, "झुंझारराव असें नांव सांगावें, म्हणजे राणीसाहेब ओळखतील."

"पण तुमचें नांव काय म्हणून सांगूं?" हनुमानानें विचारिलें.

हनुमानाचा प्रश्न अगदीं सरळ होता. पण तो प्रश्न विचारण्याच्या त्याच्या एकंदर रोंखावरून त्या स्त्रीला वाटलें कीं आपणांविषयीं या माणसाला कांहीं संशय तर नाहीं ना आला? ती उत्तरली, "अम्मा असें माझें नांव राणी-साहेबांना सांगा म्हणजे त्यांना ओळख पटेल."

"ठीक आहे." असें म्हणून बैरागी तेथून निघून गेला. हनुमान मात्र तेथेंच थांबला. कारण त्याला बैराग्याच्या आज्ञेप्रमाणें करुणाराणीला निरोप पावता करावयाचा होता.

"हनुमान!" बैरागी तेथून गेल्यावर त्या स्त्रीनें हनुमानाला हांक मारून विचारिलें, "तूं माझें एक काम करशील काय?"

"काय काम करूं?" हनुमानानें प्रश्न केला.

"तुला निष्कारण तसदी पडूं नये म्हणून सांगत्यें, करुणाराणीचा पत्ता तूं मला सांग, आणि मग तुला खुशाल जावयाचें तिकडे जा. मी त्यांची भेट मग घेईन."

"गुरुजींची मला तशी आज्ञा नाहीं." हनुमान उत्तरला.

"मला कांहीं जरूरीच्या कामासाठीं शक्य तितक्या लवकर राणीसाहेबांची भेट घ्यावयाची आहे." ती स्त्री पुन्हां म्हणाली, "तूं एवढें माझें काम करशील तर मी तुझे श्रम वायां जाऊं देणार नाहीं. तूं मागशील तें बक्षीस तुला देईन."

एवढें त्या दोघांचें संभाषण होतें आहे, तोंच एक सैनिक त्या धर्मशाळेपाशीं आला व त्या स्त्रीला पहातांच म्हणाला, " राणीसाहेब, आपण सुरक्षित आहां ना ? "

त्या स्त्रीनें हातानें त्या सैनिकाला गप्प रहावयाला खूण केली. तेवढ्यांत तो सैनिक काय उमजावयाचें तें उमगला. आणि आपली चूक सांवरून घेण्यासाठीं म्हणाला, " मला वाटलें, राणीसाहेब येथें असतील. त्यांचा कांहीं पत्ता लागला काय ? "

" हो ! पत्ता लागला आहे. आपण फार थोर नशिबाचीं माणसें आहों. करुणाराणीसाहेब कांचनगडाच्या प्रळयांतून सुखरूप बाहेर पडल्या असून एका महाभागांच्या कृपेनें आपणांला लवकरच त्यांची भेट होणार आहे. हा हनुमान—हा त्यांचा—गुरुदेवांचा शिष्य आपणांला राणीसाहेबांपाशीं नेऊन सोडणार आहे. " असें म्हणून ती स्त्री हनुमानाकडे अपेक्षापूर्वक पाहूं लागली.

परंतु हनुमान असल्या तोंडचलाखीला फंसणारा नव्हता. त्याला मुळांतच संशय होता व तो नवखा मनुष्य तेथें येऊन प्रथमच 'राणीसाहेब' अशी हांक मारूं लागला त्यावरून तर त्याची खात्रीच झाली होती कीं ही राणी म्हणजे अपरूपाच होय. अर्थात् तिच्या बरोबरचा तो आजारी म्हातारा म्हणजे कोयाजीच होय हें हनुमानानें धूर्तपणानें ओळखलें. तरीही आपली आणखी खात्री करून घ्यावी या मनांतल्या संकल्पानें त्यानें आपल्या मनांत काय डावपेंच लढवावयाचे ते लढवून अपरूपाराणीला म्हटलें, " राणीसाहेब, आपण आपली ओळख चोरून ठेविली तरी मीं आपणां उभयतांना ओळखलें. " तो तसाच धैर्यानें कोयाजीकडे वळून म्हणाला, "पण कोयाजीराव, तुम्हींही मला ओळखलें नसेल.' "

" नाहीं. मीं तुला ओळखलें नाहीं. " कोयाजी चट्कन् बोलून गेला. हनुमानाची खात्री होऊन चुकली.

अपरूपाराणीलाही आतां आपल्या नांवाचा गुप्तपणा राखणें शक्य नव्हतें. ती आपल्या त्या वेळेपावेतोंच्या वर्तनाची संपादणी करून नेण्याच्या इराद्यानें म्हणाली, " हनुमान, तूं खरोखरच फार चतुर आहेस. आम्हीं आमची ओळख अशासाठीं प्रथम दिली नाहीं कीं,— तुला कदाचित् माहीत असेलच,—चंदासाहेब आमच्या वाईटावर टपून बसलेला आहे. त्याचे लोक शिकारी कुत्र्यां-

सारखे आमच्या मागावर रानोमाळ हिंडत आहेत. आम्ही या आसमंतात् कोठें तरी संचार करीत आहोंत असा सुगावा त्याला लागला आहे. त्याचा विशेषत: करुणाराणीवर डोळा आहे. म्हणूनच त्याच्या पापी दृष्टींतून करुणाराणीला एकदांची बचावून सुखरूपपणें तंजावरला नेण्यासाठीं मी तिला भेटण्याला इतकी उतावीळ झालें आहें. आतां तुला आमची ओळख पटलीच आहे, तेव्हां तूं जर करुणाराणीची मला ताबडतोब भेट करून दिलीस तर मी तंजावरला जातांच महाराजांना सांगून तूं म्हणशील ते तुझे मनोरथ पूर्ण करायला भाग पाडीन."

हनुमानाला कांचनगडावरील सारा वृत्तांत कळला होता, व त्या निमित्तानें अपरूपा आणि कोयाजी यांच्या राक्षसी कारस्थानाचीही वार्ता कळली होती. करुणाराणीला पुन्हां संकटांत लोटण्याकरितां अपरूपा तिला भेटण्यासाठीं इतकी उत्सुक झाली आहे हें मनांतून पूर्णपणें ओळखून तो जशास तसें या न्यायानें तोंडदेखलें म्हणाला," आईसाहेब, आपण मला अशी लालूच दाखविणें म्हणजे माझ्या स्वामीनिष्ठेला कवडीमोलाची ठरविण्यासारखें आहे. आपण केवळ राजवटीच्या व करुणाराणीसाहेब आणि प्रतापसिंह महाराज यांच्या हितासाठीं इतके जीवापाड कष्ट घेत आहां; अशा वेळीं आपला एक नम्र राजनिष्ठ प्रजाजन या नात्यानें आपली हीच काय पण याहीपेक्षां अवघड अशी एकादी आज्ञा असली तरी ती मान्य करणें हें माझें कर्तव्यच आहे. त्याबद्दल मला कांहींदेखील मोबदला नको आहे. चला. मी आतांच्या आतां आपली आणि करुणाराणीसाहेबांची भेट करवून देतों."

कोयाजी नुकताच शुद्धीवर येत असल्यानें त्याला यापूर्वीचा तेथील प्रकार कांहींच माहीत नव्हता. तो एकदम आश्चर्यचकित मुद्रा करून तोंड वासून विचारूं लागला," आँ ! करुणाराणीची मीरकासीमच्या मगरमिठींतून अखेर सुटका झालीच काय ? "

अपरूपाराणीनें कोयाजीला डोळ्यानें खूण करून म्हटलें, "होय. राणीसाहेबांची सुटका झाली व त्या या हनुमानाच्या गुरूच्या कृपेनें सुरक्षित आहेत. देवदयेनें आतां लवकरच आपणांला त्यांची भेट होणार आहे. आपण आतांच त्यांच्या भेटीला निघालों असतों. पण तुम्हांला इतक्यांत चालवणार नाहीं."

अपरूपाराणीच्या मनांतून हनुमानाला बरोबर घेऊन करुणा राणीकडे जावयाचें

नव्हतें. कारण मग सारेंच कारस्थान उघडकीला आलें असतें. आपण परस्पर आपल्या हस्तकाकडून आपलें वास्तव्य गुप्त ठेवून करुणा व मानाजी, झुंझारराव वगैरे जे जे कोणी तिचे कैवारी सांपडतील त्यांचा एक घाव कीं दोन तुकडे करून नायनाट करावयाचा होता. तें समक्ष हनुमानसारख्याला बरोबर घेऊन गेल्यानें कसें साधणार ? हनुमानाच्या आतांच्या उद्‌गारांवरून तो अगदीं भोळसट आहे असा अपरूपाराणीचा ग्रह झाला होता. त्याला चकवून त्याच्याकडून करुणेचा ठावठिकाणा काढून घेण्याच्या हेतूनें ती त्याला म्हणाली, " हनुमान, आपणाला आजच्या आज करुणाराणीला जाऊन भेटतां येईल काय ? "

" हो ! न यायला काय झालें ? तें मकाण येथून कांहीं फार दूर नाहीं. पाहिजे तर कोयाजीरावांना मी पाठंगुळीला मारून घेतों म्हणजे झालें " हनुमान म्हणाला. त्याचा हेतु हा कीं आपण एकदां या विश्वासघातकी देशद्रोही दुक्कलीला मानाजी व करुणाराणी यांच्या स्वाधीन करावें, म्हणजे यांचा योग्य तो बंदोबस्त त्यांच्याकडून होईल. हेंही हनुमानाला दिवसगतीवर पडावयाला नको होतें. त्याचा काय नेम ! आजचें काम उद्यांवर गेल्यास तेवढ्यांत ही दुक्कल आपल्या नजरेआड कोठें तरी काळें करावयाची व त्यांचीं करुणाराणी वगैरे विरोधी मंडळींच्या नाशाचीं कृष्ण कारस्थानें पुन्हां नव्या जोमानें सुरू व्हावयाचीं. त्या क्षणीं एकदां तर त्याच्या मनांत असाही विचार आला कीं आपण एथल्या एथें त्या दुक्कलीला ठार करावें. परंतु अपरूपा काय किंवा कोयाजी काय, सामान्य मनुष्यें नव्हतीं. शिवाय तसें करण्याला हनुमानाला त्याच्या गुरूची आज्ञा कोठें होती ? करुणाराणीच्या मनाची पर्वा त्यानें वेळीं केली नसती. परंतु गुर्वाज्ञा नसतां अशी कोणतीच गोष्ट करण्याला त्याची तयारी नव्हती.

" एथून तें मकाण कितीसें दूर आहे ? " अपरूपाराणीनें करुणाराणीच्या वास्तव्याचा नक्की तलास हनुमानाच्या तोंडून काढून घेण्यासाठीं मुद्दाम पुन्हा विचारिलें

" फार तर एका कोसाचें अंतर असेल " हनुमान उत्तरला. वास्तविक करुणा जेथें होती, तें बैराग्याचें निवासस्थान तेथून चांगलें पांचसात कोसांवर होतें. पण खरें सांगितल्यास अपरूपा व कोयाजी तिकडे जाण्याचा आजचा

बेत उद्यांवर टाकतील; असें होऊं नये म्हणून त्यानें मुद्दाम थोडें अंतर सांगितलें.

"म्हणजे कुठेंसें?" अपरूपाराणीनें पुन्हां विचारिलें.

आतां तरी आपणाला नक्की मकाण कळेल अशी अपरूपाराणीची अपेक्षा होती. पण हनुमान कसला वस्ताद! तो उत्तरला, "त्या गांवाचें अंतर अगर मकाणाचें नांव मला नक्की माहीत नाहीं. "

अपरूपाराणी मनांतून हनुमानाच्या भोळसटपणाबद्दल त्याच्यावर खूप चड-फडली. पण बाह्यतः शान्तपणाचा आव आणून म्हणाली, "मग आपण असें करूं, हा आमचा मनुष्य तुझ्यावरोबर आतां येईल. त्याला तूं तें मकाण दाखवून ठेव म्हणजे झालें. मग उद्यां, अगर मेण्याची सोय येथें झाल्यास आजच्या आजदेखील आम्ही कोयाजीरावांना मेण्यांत घालून तिकडे घेऊन जाऊं."

"इतका कांहीं मी थकलेला नाहीं. मला आतां चांगलीच हुषारी वाटत आहे. आणि तें मकाणही कांहीं फार दूर नाहीं. आपण तिन्ही सांजांना येथून निघालों तरी घटकाभर रात्रीला सहज तेथें जाऊन पोंहोचूं. आतां हा जग-देव तें मकाण मात्र पाहून येऊं दे." कोयाजी म्हणाला.

हनुमानाला त्यांच्या त्या चेंगटपणाचा आतां अगदीं वीट आला होता. असे डावावर प्रतिडाव करण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें मनांत आणून व कांट्यानें कांटा कसा काढावयाचा याची कांहीं निश्चित योजना आपल्या मनाशीं ठरवून तो जगदेवाला बरोबर घेऊन जाण्याला तयार झाला. लगेच ते दोघे-जण निघाले. हनुमान पुढें व जगदेव त्याच्या मागाहून जात होता. जगदेव झाला तरी अपरूपा व कोयाजी यांचाच अनुयायी. तो मनांत मारे मांडे चुरीत होता कीं आपण तें मकाण हेरल्यावर हनुमानाला एकट्याला अचानक गांठून ठार केलें कीं काम झालें. पण हनुमान त्याला आपल्या मागोमाग कोठें नेत होता व त्याचें काय करणार होता हें त्याला काय माहीत!

## प्रकरण २४ वें

# जगदेवाला देहांत शासन

हनुमानानें आपल्या परीनें कोयाजी व आपल्या राणी यांना पायबंद लावण्याची शिकस्त केली. तो त्यांच्यापासून जगदेवाला बरोबर घेऊन, करुणाराणीचें मकाण दाखविण्यासाठीं म्हणून निघाला, तो जातां जातां मुद्दाम त्या लोकांचें मार्गांत एक भुयारी वसतिस्थान होतें तेथें गेला. जगदेवाला तें काय माहीत! त्या गुप्त स्थळीं हनुमानासारखेच आणखी बरेच लोक त्या वैराग्याच्या पंथांतील होते. त्या लोकांची कांहीं सांकेतिक भाषाही आपसांत ठरलेली होती. जे कोणी देशद्रोही अथवा असाच दुसरा एकादा महान् अपराध करणारे लोक हातीं लागत, त्यांना देहान्तशासन देण्याची गुप्त व्यवस्था त्या भुयारांत करण्यांत आली होती. तें भुयार अगदीं गुप्त होतें. वरून त्याचा मागमूसही कोणाला दिसत नसे. तेथें एक मोठा—म्हणजे फारच मोठा वटवृक्ष होता, त्याच्या बुंध्यांतून भुयारांत जावयाची वाट होती. आंत गेल्यावर एकापुढें एक अशीं दोन प्रशस्त दालनें असून दुसऱ्या दालनाच्या एका कोपऱ्यांतून आणखी खालीं जाण्याचा मार्ग आहेसें वाहेरून दिसे. पण वास्तविक तो आंत जाण्याचा मार्ग नव्हता. वर वर पाहणाराला फसविण्यासाठीं त्या तीनचार पायऱ्या बांधलेल्या होत्या व त्यांखालीं खोलच खोल अशी एक दरी होती. त्या दरींत कांटेकुटे, मोडकींतोडकीं हत्यारें वगैरे काय काय परब्रह्म सांचलेलें होतें तें सांगण्याची सोयच नाहीं. शिवाय तेथें देहान्त शासनाला पात्र झालेल्या अभागी जीवांचीं प्रेतें कुजून दुर्गंध सुटूं नये यासाठीं बराचसा चुना त्या जागीं कायमचा ओतून ठेवण्यांत आला होता.

हनुमानानें जगदेवासह त्या भुयाराच्या दाराशीं येतांच 'स्वातंत्र्य' हा खुणेचा परवल सांगून आंत प्रवेश मिळविला. त्याचें इतर साथीदारांशीं सांकेतिक भाषेंत पुढीलप्रमाणें संभाषण झालें.

"बरोबर कोण आहे? शत्रु कीं मित्र?"

"शत्रु."

"त्याचें काय करावयाचें?"

"देहान्तशासन."

"गुरुजींची अनुज्ञा आहे?"

"नाहीं. परंतु वेळ अशी आहे कीं या वेळीं गुरुजींच्या अनुज्ञेची वाट पहात बसावयाला वेळ नाहीं. आपल्या देशाचें व धर्माचें समूळ वाटोळें करणाऱ्या चंदासाहेबाच्या पक्षाचा हा माणूस आहे. याला देहान्तशासन देण्याशिवाय ठार करण्याला दुसरा मार्गच नाहीं."

"ठीक आहे."

याप्रमाणें सांकेतिक संभाषण झाल्यावर एकजण नेहमींची जी अपराध्याला शासन करण्याची रीत, त्या रीतीप्रमाणें पुढें येऊन म्हणाला, "तुझें नांव काय?"

"जगदेव." जगदेव उत्तरला.

"प्रतारणा करणार नाहीं ना?"

"नाहीं."

"तर मग प्रथम देवीचें दर्शन घेऊन ये."

"मला फक्त करुणाराणीसाहेबांचा पत्ता पाहिजे आहे. बाकीच्या गोष्टींशीं मला कांहींच कर्तव्य नाहीं."

"पण राणीसाहेब सध्यां आमच्या आश्रयाला आलेल्या आहेत. त्यांचा हितकर्ता म्हणून तूं त्यांचें दर्शन घेऊं इच्छितोस ना?" हनुमानानें विचारिलें.

"होय." जगदेव उत्तरला.

"तर मग तुला आमच्या रिवाजाप्रमाणें देवदर्शनानें प्रथम पावन झालेंच पाहिजे. तो कोंपऱ्यांत दरवाजा दिसतो त्या दरवाजानें पायऱ्या उतरून खालीं जा आणि आंत देवीमंदिर आहे, तिथें जाऊन दर्शन घेऊन ये. आंत आंधार आहे. परंतु भिण्याचें कांहीं कारण नाहीं."

जगदेवानें जास्त आढेवेढे न घेतां हनुमानाच्या सांगण्याप्रमाणें केलें. हनुमानानें दरवाजा उघडून दिला व त्यानें आंत प्रवेश केला. लगेच त्याच क्षणीं हनुमानानें त्याला आंत लोटून दिलें व भुयाराचा दरवाजा लावून घेतला.

"शत्रुसंहार झाला, आतां पुढें काय?" हनुमान आपल्या साथीदाराला म्हणाला, "आपण तंजावरची दानवी अपरूपाराणी आणि तिचा साथीदार कोयाजी घाटगे यांच्या देशद्रोही पाशवी लीलांविषयीं इतके दिवस फारच

बोभाटा ऐकत होतों. खरें ना ?"

"होय."

"त्यांचाच हा गुप्त हेर होता." असें म्हणून हनुमानानें करुणाराणी ही बैराग्याच्या आश्रमाला आल्यापासून काय काय प्रकार घडला तो तेथल्या आपल्या सर्व साथीदारांना निवेदन केला. तो ऐकून हनुमानाचा साथीदार म्हणाला," असें जर आहे, तर अशा वैऱ्यांना मोकळें सोडणें मुळींच इष्ट नाहीं."

"मी तरी तेंच म्हणतों." हनुमान म्हणाला.

"तूं यावर काय उपाययोजना सुचवितो आहेस ?"

"पहिला उपाय म्हणजे आपण त्या दोघांनाही अटक केली पाहिजे. मग त्यांना कोणतें शासन द्यावयाचें, हा प्रश्न गुरुजी, करुणाराणी अथवा प्रतापसिंह महाराज कसाही सोडवूंद्यात. मात्र त्यांना पकडणें हें सोपें काम नाहीं. त्यांच्यामागें मनुष्यबळ असेलच. हातघाईला प्रसंग आला तर आपला कितपत टिकाव लागेल याचा विचार प्रथमच केला पाहिजे. एवढ्याचसाठीं मी त्यांना त्यांच्या पायांनीं आपल्या कह्यांत आणूं पहात होतों. पण त्यांनीं तें मान्य केलें नाहीं. आतां हा जगदेव येण्याची वाट पहात तीं दोघेंही तेथें बसलीं असतील. आपण जर आजच्या आज त्यांच्यावर छापा घातला तर आपला कार्यभाग होण्यासारखा आहे."

"आपलें संख्याबल अवघें दहा आहे." आणखी आपले लोक बोलावून आणविले पाहिजेत.

"मग त्याला उशीर कां ?"

हनुमानाच्या संमतीनें लगेच बैराग्याच्या पंथांतील आणखी लोक बोलावून आणावयाचे ठरून ती योजना ताबडतोब अमलांतही आली. सायंकाळपावेतों तेथें शस्त्रास्त्रांनीं सज्ज असे एकंदर पंचवीस बैरागी वेशाचे पण लढाऊ पेशाचे तरुण लढवय्ये जमा झाले. तें लहानसें लढाऊ पथक गनिमी काव्याच्या थाटानें अपरूपा राणी व कोयाजी यांच्यावर छापा घालण्याचा संकल्प करून तेथून निघालें.

पण त्या जागीं जाऊन पहातात तों काय; अपरूपा राणी अगर कोयाजी तेथें नाहींत. त्यांच्या कोणा हस्तकानें शत्रूचा हल्ला होणार अशी बातमी येऊन सांगितल्यामुळें त्या दोघांनींही तेथून पाय काढला होता. तथापि हनुमा-

ाचें कारस्थान मात्र त्यांना कळलें नसावें. कारण, हनुमान आपल्या इतर साथी-शरांना मागें निरनिराळ्या जागीं दबा धरून बसावयाला लावून त्या स्थळीं ेला तेव्हां अपरूपाराणीचा राणोजी नांवाचा एक शिपाई तेथें वाट पहात उभा असलेला त्याला दिसला. त्याला हनुमानानें विचारिलें, "हें काय? राणीसाहेब कुठें आहेत?"

"कोणत्या राणीसाहेब?" राणोजीनें विचारिलें, "तूं कुठून आलास?"

हनुमान धाडसी वृत्तीनें उत्तरला, "भल्या माणसा, मी कोणी शत्रूचा ाणूस नाहीं! तुझें भय मीं ओळखलें. पण ज्या सत्पुरुषानें कोयाजीरावांना ीवंत केलें त्यांचा मी शिष्य आहें. मी अपरूपा राणीसाहेबांच्या विनंती-रून जगदेवाला तें मकाण दाखविण्यासाठीं गेलों होतों."

"मग जगदेव कुठें आहे?"

"तें मग सांगतों. अगोदर मला तूं सांग, तूं कोण?"

"मी अपरूपा राणीसाहेबांचाच सेवक. त्यांनींच मला येथें जगदेवाची ाट पहात थांबावयाला सांगितलें आहे."

"पण राणीसाहेब कुठें आहेत? अशा अणीबाणीच्या वेळीं त्या इथें अवश्य ाहिजे होत्या. आतां त्या न भेटल्यामुळें शत्रूचा डाव जर यशस्वी झाला आणि यांच्यावर संकट कोसळलें तर त्याला जबाबदार कोण?"

"कसलें संकट?"

"तें तुला सांगून समजावयाचें नाहीं."

"मी राणीसाहेबांना ताबडतोब तो वृत्तांत कळविण्याची व्यवस्था करीन."

हनुमानानें ओळखलें कीं राणोजी अपरूपाराणी व कोयाजी यांचा पत्ता ांगावयाला तयार नाहीं. तेव्हां त्यानें तो विषयच सोडला व म्हटलें, "या ाऱ्या आसमंतात् शत्रूच्या कारस्थानाचें जाळें विणलें गेलें आहे. त्या जाळ्यां-त राणीसाहेब व कोयाजी यांची कशी सुटका होणार याची मला फारच ंता वाटत आहे."

"कोणत्या शत्रूविषयीं तूं बोलत आहेस?" राणोजीनें विचारिलें.

"कोणता शत्रु म्हणजे? राणीसाहेबांचा शत्रु आमच्या शत्रूहून निराळा ाहे कीं काय?" हनुमानानें राणोजीच्या प्रश्नांतील गूढार्थ ओळखून विचारलें. ापरूपा राणीनें आपण व करुणाराणी एकच असल्याचें बैरागी व हनुमान

यांना सांगितलें तो प्रकार राणोजीला माहीत नव्हता. त्याच्या दृष्टीनें, राणीसाहेबांचा व कोयाजीचा शत्रुपक्ष म्हणजे करुणा राणी व मानाजी यांचा पक्ष होय. अपरूपा राणीला तरी हनुमान इतका पाताळयंत्री असेल याची काय कल्पना? तिनें आपल्या मतें हनुमानाला चांगलेंच चकविलें होतें व जगदेव काम फत्ते करून येणार अशी तिची खात्रीच होती. तो आल्यावर त्याला आपणाकडे पाठवून देण्याची कामगिरी फक्त तिनें राणोजीला सांगून ठेविली होती.

"तसें नव्हे." राणोजी हनुमानाच्या प्रश्नानें जरा गोंधळून म्हणाला, "मीं उगाच आपलें विचारिलें. पण जगदेव कुठें आहे?"

"जगदेव शत्रूच्या हातून ठार झाला."

"ठार झाला?"

"होय. मीदेखील त्याच्याबरोबरच यमसदनाला जावयाचा. परंतु मोठ्या शिकस्तीनें बचावलों."

"कोणीं तुमच्यावर हल्ला केला?" राणोजीनें पुन्हां विचारिलें. त्याला प्रश्न पडला, करुणाराणीच्या लोकांनीं हें कृत्य केलें कीं काय?

जणूं काय आपण त्या गांवचेच नाहीं असा बहाणा करून हनुमान उत्तरला, "कोणीं हल्ला केला म्हणजे? चंदासाहेबाच्या लोकांनीं हल्ला केला."

"आणि त्या लोकांनीं जगदेवाला ठार मारलें?" राणोजीनें आश्चर्य-पूर्वक विचारिलें.

"होय. त्यांत तुला एवढें आश्चर्य कसलें वाटलें?"

"आश्चर्य नाहीं. पण... बरें; करुणाराणी सध्यां कोठें आहे?"

आतां काय उत्तर द्यावें याचा हनुमानाला पेंच पडला. पण त्यानें एकदम सांगून टाकिलें, "मध्यार्जुनांत मानाजीराव नांवाचा राणीसाहेबांचा सेवक चंदासाहेबाशीं सामना देण्यासाठीं सैन्यसामग्रीची जमवाजमव करण्यांत गुंतला असून राणीसाहेब तिकडेच जावयाला आज रवाना झाल्या."

"ठीक आहे. मी थोरल्या राणीसाहेबांना हा वृत्तांत कळवितों. तूं आतां जा." राणोजी म्हणाला.

"पण ताबडतोब कळविशील ना? मला तुझ्याबरोबर यावयाला नको ना?" हनुमानानें मुद्दाम विचारिलें.

"नको. कांहीं आवश्यकता नाहीं." राणोजी उत्तरला.

"ठीक आहे तर. मी जातों. मात्र ही बातमी राणीसाहेबांना कळविण्याला वेळ लावूं नकोस. कारण करुणाराणीसाहेब मध्यार्जुनांत देखील एकाद्या दिवसापेक्षां जास्त थांबतील अशी खात्री नाहीं. अपरूपा राणीसाहेबांना त्यांच्याकडे जावयाला वेळ लागला तर चुकामूक होण्याचा फार संभव आहे." असें म्हणून हनुमान तेथून निघून गेला, तो कांहीं अंतरावर जाऊन तेथें आणखी एक जलाशय होता व त्या जलाशयाला जाळीदार दगडी तट असून सभोंवार गर्द वनराजी होती, त्या वनराजींत त्या तटाआड लपून राहिला. तेथून त्याला सभोंवारच्या भागांत सर्व रस्त्यांवर चांगली नजर ठेवतां येत होती. राणोजी कोणत्या वाटेनें जातो हें हेरून अपरूपाराणीच्या मकाणाचा पत्ता काढावयाचा या हेतूनें तो दबा धरून बसला होता.

सुमारें पाव घटकेच्या आंत राणोजी घोड्यावर स्वार होऊन उत्तरेकडच्या मोठ्या रस्त्यानें घोडा फेंकीत जातांना हनुमानाला दिसला. तो लगेच तेथून उठला व आपल्या साथीदारांना भेटून त्यांच्याकरवीं श्रीरंगाच्या देवालयांत बैराग्याला व तिकडे करुणाराणीला या एकंदर घटनेची बातमी देण्याची व्यवस्था करून स्वतः राणोजीच्या ध्यानीं येऊं नये इतक्या अंतरावरून आडवाटेनें मागोमाग पळत सुटला. तेथून अर्ध्या कोसावर त्याला घोडा मिळवितां येण्याजोगा होता. परंतु इकडे घोडा मिळविण्याला जावें तर राणोजीवरची नजर ढळेल; म्हणून त्यानें पायीं धांवण्याचे कष्ट पत्करले.

सुदैवानें थोड्या अंतरावर त्याला एक मराठा शिलेदार कांहीं अनुचरांसह एका वृक्षाखालीं घोडा बांधून विश्रांति घेत पडलेला दिसला. त्या शिलेदाराला त्यानें पूर्वीं कधीं तरी एकदां बैराग्याच्या दर्शनाला तो आलेला असतांना पाहिलें होतें. तेवढ्या ओळखीवर त्यानें त्याच्यापाशीं जरूरीच्या कामासाठीं एक घोडा मागितला व त्या शिलेदारानेंही कांहीं आढेवेढे न घेतां त्याची मागणी पूर्ण केली.

सुमारें सहा कोस अंतर तोडावें लागलें असेल नसेल, तोंच राणोजी मुख्य रस्ता सोडून आडरस्त्याला वळला व घनदाट वनराजींतून मार्ग आक्रमीत एका रम्य उपवनापाशीं येऊन थडकला. हनुमान त्याच्या मागोमाग होताच. राणोजी घोड्यावरून खालीं उतरून उपवनांत प्रविष्ट झाला, तेवढ्या मुद-

तीत हनुमान जवळच एक भव्य कमानबाज विहिरीवर मोट चालू होती तेथें पाणी पिण्यासाठीं गेला. पाणी पिण्याचें हें हनुमानानें केवळ मिष केलें होतें. त्याला खरोखर मुळींच तहान लागली नव्हती. परंतु ज्याअर्थी राणोजी त्या उपवनांत शिरला व उपवनाच्या प्रवेशद्वारावर देखील सशस्त्र शिपायांचा खडा पहारा असलेला जेव्हां आढळून आला, तेव्हां हनुमानाला साहजिकपणेंच शंका आली कीं या उपवनांत कोणतें रहस्य आहे तें ओळखावें तरी ! तो शोध लावण्यासाठीं तो तेथें थांबला होता.

पाणी वगैरे पिऊन आल्यावर हनुमानानें सहज मोट हांकणाऱ्या शेतकऱ्याला विचारिलें," हें फार सुंदर उपवन दिसतें, आणि आंत वाडाही मोठा भव्य दिसतो. हा वाडा कोणाचा ? "

" हा वाडा ? हा वाडा आमच्या महाराजांचा. " शेतकरी उत्तरला.

" महाराज ? कोणते महाराज ? "

" कोणते महाराज म्हणजे ? आमचे शहाजी महाराज ! "

" शहाजी महाराज ? "

" होय. तंजावरचे शहाजी महाराज. हे सध्यांच्या तंजावरच्या राज्यारूढ असलेल्या प्रतापसिंह महाराजांचे चुलत बंधु. अपरूपा राणीसाहेबांचे पुत्र हे. यांना कांहीं काळ राज्यपदही लाभलें होतें. पण त्यांच्या प्रतिस्पर्धी लोकांच्या कारवाईमुळें त्यांना राज्यपदाला मुकावें लागलें. ते सध्यां येथेंच रहातात. "

" असें ! हें मला माहीत नव्हतें ! " हनुमान म्हणाला. थोड्या वर्षीपूर्वीं रूपी या नांवाच्या तंजावरच्या राजघराण्यांतील बटकीचा एक पुत्र अपरूपा राणीनें आपला पुत्र म्हणून भासविला व त्याला तंजावरचा राजाही केलें होतें, तो प्रकार हनुमानाला ऐकून माहीत होता. परंतु त्याचें नांव काय व तो कोठें रहातो हें त्याला माहीत नव्हतें.

" आणि महाराजांच्या आईसाहेबही आज इथें आल्या आहेत ना ? "

" होय. तें तुला कसें माहीत ? " शेतकऱ्यानें संशयी दृष्टीनें हनुमानाकडे पहात विचारिलें.

" मला माहीत आहे. मला त्यांनीं इथेंच भेट घ्यावयाला संगितलें आहे." हनुमान अगदीं साळसूदपणानें म्हणाला, " या वेळीं आईसाहेब अगदीं कामांत असतील नाहीं ? "

"होय. त्या नुकत्याच इथें आल्या आहेत ?" शेतकऱ्यानें संशयपूर्वक हनुमानाकडे पहात विचारलें, "त्यांच्याशीं तुझें काय काम आहे?"

"काम तुला सांगून समजावयाचें नाहीं. मी थोड्या वेळानें येऊन त्यांची भेट घेईन. तोंवर मी थोडा वेळ शेजारच्या खेड्यांत फेरफटका करून येतों." असें म्हणून हनुमान आपल्या घोड्याकडे वळला.

शेतकऱ्याला हनुमानाच्या त्या उत्तरानें जास्तच संशय वाटूं लागला. कारण, त्या मकाणाच्या आसपास खेडें असें सहज फेरफटका करून येण्याजोगें एकही नव्हतें. तो एक जवळ जवळ निर्जन असा जंगलमय प्रदेश होता. तेथें थोडीशी रानटी लोकांची काय ती वस्ती होती. बऱ्याच म्हणजे शेंपन्नास वर्षांपूर्वी तेथें कोणी एक योगी रहात होता. त्या जागेवर तंजावरच्या सरफोजी महाराजांची भक्ति असल्यानें त्यांनीं त्याच्या इच्छेनुरूप त्याला तेथें एक वाडा बांधून दिला होता. आपणांला संसारी जनांचा उपसर्ग पोंहोचूं नये म्हणून त्या योग्यानें मुद्दाम ती जागा स्वतःच्या वास्तव्यस्थानासाठीं मुकर केली होती. पुढें तो योगी वारला व तेव्हांपासून तो वाडा अगदीं ओस पडला होता. त्या गोष्टीला किती तरी वर्षें लोटून गेलीं होतीं. त्यानंतर अपरूपाराणीनें आपल्या वर्गांतील शहाजी नामक दासीपुत्राला तंजावरचा राजा करून, त्याच्या नांवावर सर्व राज्यसूत्रें आपल्या हातीं ठेवण्याचें कारस्थान फंसतांच कोयाजीनें कोणाला न कळत तो वाडा पुन्हां दुरुस्त करवून व सभोंवार बागबगीच्या वगैरे करवून तेथें त्या तोतया राजाला ठेवून दिलें होतें. हनुमानाशीं बोलणारा शेतकरी हाही त्या तोतया राजाचाच सेवक होता व तो मोट हांकून बाग शिंपीत होता तीही त्याचीच. तंजावरांत हरघडी चालणारीं राजकारस्थानें जरी त्या शेतकऱ्याला माहीत नव्हतीं तरी या गोष्टीचा कोठें बोभाटा करावयाचा नाहीं एवढा कानमंत्र त्याला कोयाजीकडून पूर्वींच मिळाला होता. पण त्या वाड्यांत कोण राहतें याची चवकशी करावयाला तरी कोण येणार ? अपरूपाराणी व कोयाजी हीं मनांतून महाराजांची शत्रुमंडळी असतील. पण जनांत दिसावयाला तसा बेबनाव त्यांच्यांत मुळींच नव्हता. दुसरें असें कीं, तंजावरच्या राज्यकारभारांत कोयाजी घाटग्याची चलती असतांना त्यानें तो वाडा व त्याच्या सभोंवारचा कैक योजनें मुलूख बक्षीस मिळवून घेतला होता. त्यामुळें तेथें कोण राहतें आणि काय करतें इकडे इतर लोकांचें

लक्ष वेधलें जाण्याचा कांहींच संभव नव्हता. शहाजी तोतया स्थानभ्रष्ट झाल्यावर तेथें जाऊन वास्तव्य करून राहूं लागला हें प्रतापसिंह महाराज व त्यांचे इतर कारभारी यांना माहीत नसेल असें नाहीं. परंतु अपरूपा राणी-कडे पाहून सर्व जण तिकडे कानाडोळा करीत असत. याचा फायदा कोयाजी आपला म्हणजे अपरूपाराणीचा मृतवत् पक्ष पुन्हां जिवंत करण्याच्या कामीं यथास्थित करून घेत होता. आपणाला पुढें मागें बंड करून प्रतापसिंह महा-राजांची सत्ता उलथून पाडावयाची आहे या धोरणानें त्यानें शस्त्रास्त्रें व दारू-गोळा यांची जमवतजमव अगदीं गुप्तपणें तेथें चालविली होती व सैन्यही बरेंच जमविलें होतें. तो त्याचा उद्योग अव्याहत सुरूच होता. या उद्योगाला साजून दिसतील असेच नोकरचाकर वगैरे त्यानें नीट परीक्षेनें तेथें ठेवून दिले होते. आतां त्या शेतकऱ्यासारख्या सामान्य माणसाला या राजकारणाच्या अंतर्गत उलाढाली काय कळणार? तथापि आपल्या धन्यांचें व प्रतापसिंह महाराजांचें तितकेसें सूत नाहीं हें ओळखण्याइतका धूर्तपणा—जो कोणाही नोकराच्या आंगीं साधारणपणें आपोआप असतो तो त्या शेतकऱ्याच्याही अंगीं होता. शिवाय स्वामीनिष्ठेच्या जोरावर आपलें भाग्य उदयाला आणण्याची इच्छा प्रत्येक नोकराला असतेच. त्या शेतकऱ्याला हनुमानाचा थोडासा संशय येतांच त्यानें हनुमानाला स्पष्ट सांगितलें, "गड्या, मला तुझा संशय येतो आहे. यास्तव मी तुला कोयाजीराव अथवा राणीसाहेब यांपैकीं कोणाची तरी परवानगी घेतल्याखेरीज इथून जाऊं देणार नाहीं."

प्राप्त प्रसंगाला तोंड कसें द्यावें हें चातुर्य हनुमानाच्या अंगीं उपजतच होतें. शिवया तो त्या वैराग्याच्या—चतुरस्त्र गुरूच्या तालमेंत तयार झालेला. तो थोडाच डगमगतो! तो म्हणाला, "एवढेंच ना! मग त्याला एवढी धमकावणी कशाला हवी? मी स्वसंतोषानें येथें थांबावयाला तयार आहें. तूंच मला राणीसाहेबांकडे घेऊन जा; म्हणजे तुझा संशय फिटेल. मात्र तूं आपणाला सांभाळ म्हणजे झालें. राणीसाहेब तूं मला त्रास दिल्यामुळें तुझ्यावर रागा-वल्या तर माझ्या कानीं हात!"

शेतकऱ्याला वाटलें कीं हा भलताच प्रसंग आपणावर येऊन ठेपला. कोणी परका अथवा ज्याचा अर्थाअर्थी राणीसाहेबांशीं कांहींच संबंध नाहीं, असा मनुष्य इतक्या आत्मविश्वासानें बोलेल तरी कसा? तो हनुमानाला म्हणाला,

"तूं कोणी भलता मनुष्य नाहींस अशी माझी खात्री होऊन चुकली आहे. तुला मी प्रतिबंध करूं इच्छीत नाहीं. मात्र तूं तुझें नांव काय तें मला सांगून ठेव."

"तूं राणीसाहेबांना सांग कीं माझें नांव हनुमान. मी करुणा राणी-विषयीं महत्त्वाची गुप्त बातमी देण्यासाठीं आलों होतों. व म्हणावें आणखी प्रहरभरानें मी माघारा येईन. आतां मला अंमळ बाहेरून हिंडून यावयाला कांहीं हरकत नाहीं ना ? "

" कांहीं हरकत नाहीं. " शेतकरी म्हणाला.

हनुमान लगेच आपल्या घोड्यावर स्वार होऊन माघारा निघून गेला.

## प्रकरण २५ वें

# गरीब बिचारी रूपी !

अपरूपा राणी व कोयाजी हीं दोघें जीं पूर्वोक्त ठिकाणाहून निघालीं, तीं या एकान्त स्थळीं येऊन पोंहोंचलीं होतीं. येथें येण्यांतील त्यांचा मुख्य उद्देश करूणाराणीला पकडून आणण्याची जय्यत तयारी करण्याचा होता. तो वाडा व त्याच्या आसमंतात् असणारा प्रदेश हा कोयाजी व अपरूपाराणी यांचा जणूं बालेकिल्लाच होय. तेथें येतांच अपरूपाराणी व कोयाजी यांनीं आपल्या एका विश्वासू शिलेदाराला हांक मारून शंभर सशस्त्र शिपायांची एक टोळी आज्ञा होतांच कूच करूं शकेल इतक्या तत्परतेनें तयार ठेवण्यास सांगितलें व लगेच आपल्या बनावट राजपुत्राला भेटण्यासाठीं दोघेंही राजपुत्राची चौकशी करीत आंत गेलीं.

अपरूपाराणीनें हा जो नवा राजपुत्र तंजावरच्या गादीला वारस म्हणून निर्माण केला होता, तो केवळ हीनकुलोत्पन्न होता इतकेंच नव्हे, तर कांहींसा वेडसरही होता. त्याला शहाणपण व आवश्यक तेवढें व्यवहारज्ञान शिकविण्यासाठीं निष्णात् शिक्षकांची योजना करण्यांत आली होती खरी, पण विद्यार्थि अगदीं मठ्ठ डोक्याचा भेटल्यावर शिक्षक तिथें तरी काय डोकें फोडून घेणार ! बरें; शिक्षकानें राजपुत्र शहाणा व्हावा या कळकळीनें जरा कडेपणा पत्करिला कीं तें राजपुत्राला सहन व्हावयाचें नाहीं. त्यानें त्या शिक्षकाचे सातपाट काढून त्याला घालवून द्यावें ! असे दोन शिक्षक बळी पडल्यावर तिसरा जो शिक्षक मिळाला होता तो मात्र फार धूर्त व मतलबी असा होता. आपण राजपुत्राची मर्जी खप्पा होऊं द्यावयाची नाहीं यापेक्षां दुसऱ्या कोणत्याही खऱ्या हितकारक गोष्टीकडे त्या शिक्षकानें मुळींच लक्ष दिलें नाहीं.

त्या शिक्षकाप्रमाणेंच तरवारीचे व पट्ट्याचे हात शिकविण्यासाठीं व बंदुकीचा नेम कसा मारावा वगैरे लढाऊ पद्धतीचें शिक्षण देण्यासाठीं आणखी एका सरदाराची योजना करण्यांत आली होती. त्याचा अनुभव देखील वरील शिक्षकांप्रमाणेंच होता, व त्यानेंही वरील शिक्षकांप्रमाणेंच स्वार्थसाधु-

पणाचें धोरण स्वीकारिलें होतें. इकडे राजपुत्राची मर्जी सुप्रसन्न राखावयाची, व कोयाजी, राणीसाहेब यांपैकीं कोणीं राजपुत्राच्या प्रगतीची विचारपूस केल्यास राजपुत्राची भरमसाट स्तुति करून हातभर लांब दुध्याची सवा हात लांब बी काढून दाखवावयाची, हा त्यांचा—किंबहुना राजपुत्राच्या तैनातीस असलेल्या सर्व मंडळीचा ठराविक सांच्याचा बाणाच बनून गेला होता.

तोच देखावा आज अपरूपाराणी व कोयाजी राजपुत्राच्या समाचाराला जातांच त्यांना पहावयाला मिळाला. राजपुत्राला लिहिण्यावाचण्याला शिकविणाऱ्या शिक्षकानें 'सरकार आतां बालबोध वाचूं लागले आहेत' असें सांगून अशा समारंभाच्या सोईसाठीं राजपुत्राकडून आगाऊ पाठ करून घेतलेला हस्तलिखित मराठी रामायणांतील एक उतारा राजपुत्राला वाचावयाला लावला व राजपुत्रानें तो वाचून—नव्हे, नांवापुरती हस्तलिखितावर नजर ठेवून पाठ म्हणून दाखविला. अपरूपाराणी व कोयाजी तें पाहून खूष झालीं व त्यांनीं शिक्षकाला एक दुपेटा बक्षीस देवविला.

लगेच अपरूपा राणीनें राजपुत्राला युद्धकेलेचें वगैरे शिक्षण देणाऱ्या सरदाराला बोलावून चौकशी केली, तेव्हां त्या सरदारानें सांगितलें, "सरकार आतां पट्टा चांगलाच खेळतात. व नेम तर इतका अचूक मारतात कीं आम्हीदेखील तोंडांत बोटें घालतों."

त्या सरदारानें आपल्या विधानाच्या पुष्टचर्थ पांचसहा हरिणांचीं कातडीं एक वाघाचें कांतडें, व एका हत्तीचे सुळे वगैरे साहित्य आणून अपरूपाराणीला दाखविलें व सांगितलें, "ही सारी मृगयेची कमाई बहुश: एकटचा सरकारांचीच आहे. आम्ही त्यांच्या आजूबाजूंना राहून त्यांच्यावर नुसती नजर ठेवीत असूं, इतकेंच."

"शाबास!" करुणाराणी प्रसन्न चित्तानें राजपुत्राला आपल्या जवळ घेऊन त्याच्या तोंडावरून हात फिरवीत म्हणाली, "आतां लवकरच आमचे बाळराजे प्रतापसिंहराजांबरोबर उघडचा समरभूमींत टक्कर देऊं शकतील व स्वपराक्रमावर राज्य मिळवूं शकतील."

राजपुत्र इतका वेळ गप्प होता. तो आपणावर आपल्या निरनिराळ्या सेवकांकडून होणाऱ्या स्तुतिवर्षावानें चण्याच्या झाडावर चढूं लागला होता. तो लडिवाळपणानें हंसत अपरूपाराणीला म्हणाला, "आईसाहेब, त्या

प्रतापसिंह राजाला कोणी जर हातपाय बांधून माझ्यासमोर आणून उभा करील तर मी त्याच्याशीं लढाई खेळून त्याचें शीर धडावेगळें करून टाकीन."

राजपुत्राच्या अंगचें खरें पाणी अकस्मात् त्याच्या उद्गारांच्या रूपानें बाहेर दिसूं लागतांच तेथल्या सर्वांच्या आनंदाचा एकदम विरस झाला. त्यांतल्या त्यांत राजपुत्राला युद्धकलेचें व मृगयेचें शिक्षण देणाऱ्या सरदारानें तोंड तर फारच हिरमुसलें झालें. त्यानें सरकारस्वारीच्या मृगयानैपुण्याचे इतके गोडवे गाइले होते ती केवळ अतिशयोक्तिपूर्ण कल्पित कथा होती. पारध्यांनीं रान उठवावें, सावज समोर येतांच मृगयानिपुण सैनिकांनीं तें अडवून धरावें, त्याच्यावर गोळ्या झाडून अथवा तरवारी–भाल्यांचे वार करून त्या सावजाला अर्धं मेलें करावें व मग त्या सावजाला शीघ्र जाईनों शस्त्रप्रहारांची आणि बंदुकीच्या गोळ्यांची सरबत्ती राजपुत्राला करूं द्यावी, हें राजपुत्राच्या मृगयानैपुण्यांतील इंगित होतें. त्या संवयीला अनुसरूनच राजपुत्रानें प्रतापसिंहराजाशीं आपण कशी लढाई करूं याविषयीं मुक्ताफळें उधळलीं होतीं.

तथापि त्या सरदाराला आपला बोज कायम राखण्यासाठीं ती वेळ शोभवून नेणें भाग होतें. तो अपरूपाराणीला म्हणाला, "आईसाहेब, सरकारांना प्रत्यक्ष लढाई कशी खेळतात हें माहीत नाही त्याचा हा परिणाम होय. मी त्यांना लवकरच मधून मधून लुटुपुटूच्या लढाईत लढावयाला लावणार आहें. तो प्रत्यक्ष अनुभव एकदां सरकारांना आला कीं इतक्या लहान वयांतही शत्रूशीं उघड्या रणमैदानावर टक्कर देण्याची पात्रता सरकारांच्या अंगीं खास आहे असें आपल्या निदर्शनाला येईल."

अपरूपाराणीला मुळांतच राजपुत्राच्या कर्तबगारीविषयीं फारशी आशा वाटत नव्हती, व कर्तबगार राजपुत्र म्हणून त्याला तिनें जवळही केलें नव्हतें. तिला तंजावरच्या गादीवर राजा म्हणून बसविण्याला एक जिवंत बाहुलें पाहिजे होतें व तेवढीच ती राजपुत्राची किंमत आपल्या मनांत ओळखून होती. तिनें नेभळ्या राजपुत्राचे ते नेभळे बोल फारसे आपल्या मनाला लावून घेतले नाहींत. परंतु कोयाजीला मात्र ते बोल ऐकून तिरस्कारानें हंसूं आलें.

कोयाजी जातिवंत लढवय्या व मुत्सद्दी होता. तो मनांत म्हणाला, "हत् दळभद्र्या ! आम्हीं इतकीं हाडांचीं काडें करून तुला राज्यावर बसविलें तरी तूं काय रडणार हें दिसतेंच आहे." त्याच वेळीं तो खुनशी समाधानानें

मनांत असेंही म्हणाला, " बाकी, तुझ्यासारखा षंढ राजा गादीवर येण्यांतच माझें खरें हित आहे. "

" आतां आमच्या महाराजांचें लवकरच लग्न करावयाला हवें, नाहीं का कोयाजीराव ? " अपरूपाराणी त्या विषयाचा अप्रियतेकडे वळणारा ओघ परतविण्यासाठीं म्हणाली, पण " आपल्या प्रयत्नांना यश येऊन महाराज खरेखुरे महाराज होईपावेतों थांबावें. "

तोंच केंस पिंजारलेली व वेडसर हातवारे करणारी एक कंगाल म्हातारी तेथें धांवत आली व थेट तीरासारखी राजपुत्राकडे जात कळवळ्यानें म्हणाली, " नको नको. माझ्या राजा, माझ्या जया, तूं मुळींच राजा होऊं नकोस. राजा होणें म्हणजे सुळावरची पोळी आहे. माझ्या राजा, तूं राजा होऊं नकोस."

त्या म्हातारीला पहातांच अपरूपाराणी दातओंठ खात सर्व नोकरांकडे संतापून पहात ओरडली, " या बयेला मोकळी कोणीं सोडली ? "

सर्व नोकर भयभीत चित्तानें एकमेकांच्या तोंडांकडे टकमकां पाहूं लागले. तोंच आणखी दोन दासी धांवत त्या म्हातारीमागोमाग वर आल्या व तिला आवरण्यासाठीं पुढें जाऊं लागल्या. परंतु राजपुत्रानें त्यांना हातानें थोपून राहण्याची खूण करतांच त्या जागच्या जागीं थबकल्या.

म्हातारी तेवढ्यांत राजपुत्राला आपल्या हृदयाशीं कंवटाळून प्रेमातिरेकानें त्याचें मुख कुरवाळीत त्याला म्हणाली, " माझ्या राजा, आज किती दिवसांनीं रे तूं हा मला भेटतो आहेस ? तें कांहीं नाहीं. आतां मी तुला मुळींच सोडावयाची नाहीं. तुला राजा होऊं द्यायची नाहीं. "

" रूपी, ए रूपी ! हा तूं काय गोंधळ मांडला आहेस ! अगोदर मागें सर पाहूं ! " कोयाजी दरडावणीच्या स्वरांत उद्गारला.

" मी मागें सरूं ? माझ्या बाळाला तुमच्या कैदेंत सोडून मी मागें सरूं? माझ्या पोटच्या गोळ्याला भेटण्यालादेखील मी चोर ठरल्यें काय?" लगेच राजपुत्राला पूर्वीपेक्षां जास्त घट्ट मिठी मारून रूपी म्हणाली, " नाहीं— नाहीं. मी आतां प्राण गेला तरी माझ्या बाळापासून दूर सरायची नाहीं. आजवर तुम्हीं माझी आणि माझ्या बाळाची निर्दयपणें ताटातूट केलीत आणि मला वेडी ठरवून खोलींत कोंडून ठेविलेंत, पण मी वेडी नाहीं हो मी वेडी नाहीं. मी शहाणी आहें ; मी अगदीं पुरी शुद्धीवर आहें. "

" तूं शुद्धीवर आहेस तर हा काय तमाशा मांडला आहेस ? " कोयाजीनें तिला विचारिलें.

" हा तमाशा मीं मांडला आहे काय ? तमाशा मीं मांडला आहे ? खासा न्याय बाबा, हा न्याय खासा ! शेळी जाते जिवानिशीं आणि खाणारा म्हणतो वातड असें म्हणतात त्यांतलाच हा न्याय झाला. माझ्या मुलाला तुम्हीं माझ्यापासून ओढून नेलेंत, मी नको नको म्हणत असतांही माझ्या शब्दाची मुळींच पर्वा केली नाहींत आणि त्यासाठीं माझा जीव तळमळून मी बोलू लागल्यें तर तो तमाशा होतो नव्हे काय ? "

" यालाच म्हणतों आम्ही वेड ! " कोयाजी अपरूपाराणीकडे वळून कावेबाजपणानें स्मित हास्य करीत म्हणाला, " हिला आम्हीं किती वेळां सांगितलें कीं तुझा मुलगा केव्हांच मेला, आमच्या युवराजांचा आणि तुझा कांहींच संबंध नाहीं. तरी हिची खात्री पटत नाहीं! याला आतां काय करायचें?"

"माझा मुलगा मेला काय ? माझा मुलगा मेला ?" रूपी आपल्या मुलावर घारीसारखी झडप घालून त्याला हृदयाशीं कंवटाळीत म्हणाली, " माझ्या राजसा, इडा पिडा टळो आणि अमंगळ दूर पळो ! तुझ्याविषयीं असें अभद्र बोलणाराच्या मुखांत माती पडो ! " ती कोयाजीकडे खाऊं कीं गिळूं अशा संतप्त नजरेनें पहात जोराजोरानें दांत ओंठ चावीत उद्गारली, " दुष्टा ! चांडाळा ! तूंच कां मरेनास ! पुन्हां जर कां असलें भलतें सलतें अभद्र माझ्या बाळाविषयीं बोललास, तर मी तुझ्या नरडीचा घोंट घेईन, याद राखून ठेव ! "

" अग तुझा मुलगा पूर्वींच मेला ! " कोयाजीचा एक अनुचर म्हणाला.

" तूं मेलास गुलामा ! " असें ओरडून रूपीनें त्या माणसावर झडप घातली. कोयाजी मध्यें पडला म्हणून बरें. नाहींपेक्षां तिनें त्या माणसाचा चावा घ्यावयाला कमी केलें नसतें.

रूपी वास्तविक मूळची वेडी नव्हती. परंतु तिला सर्वांनीं नाहीं नाहीं तें बोलून चिडवून तिला जणों बळेंच वेड लावलें होतें. राजवाड्यांत अपत्यांची अदलाबदल करण्यांत येऊन रूपीच्या पुत्राला राजपुत्र म्हणून संबोधण्यांत आलें हा प्रकार प्रथमच झाला तेव्हां तो रूपीच्या संमतीनेंच झाला होता. तिनें तेव्हां विचार केला कीं अनायासें आपल्या पुत्राचें भाग्य उदयाला येतें

आहे, त्याला आपण आडकाठी कां म्हणून करा ! तेव्हां रूपीला अशीही आशा होती कीं आपला पुत्र राजपुत्र ठरल्यावर गाड्याबरोबर नाळ्याला यात्रा घडावी त्याप्रमाणें आपलाही राजमाता या नात्यानें बराच बोज वाढेल. जगाला दिसावयाला अपरूपाराणी ही राजमाता ठरली तरी आपला पुत्र आपणाला विसरणार नाहीं, असा भरंवसा रूपीला वाटत होता. तिचें तेवढ्यांतच समाधान होतें. बोलून चालून राजवाड्यांतील बटीक ती ! ती अपरूपाराणीप्रमाणें राजमातेच्या मानासाठीं थोडीच हपापलेली असणार ! बरें ; प्रथमच तिची व तिच्या अर्भकाची ताटातूटही कोणीं केली नाहीं. राजपुत्राची दाई म्हणून तिचीच योजना झाली. मात्र शहाजी जसजसा मोठा होऊं लागला व मातेचें दूध सुटलें, तसतसा माता आणि पुत्र यांच्यांत प्रतिबंधाचा आडपडदा उत्पन्न होऊं लागला. शहाजी राजपुत्र ठरलाच होता, व रूपी बोलून चालून बटीक असल्यानें तिला मग त्याच तोलानें वागविण्यांत येऊं लागलें. तो भेदभाव रूपीला प्रथमच जाणवला. तरीही तिला आपल्या पुत्राची सेवा करण्यांत आनंदच वाटे व अपरूपाराणी आणि कोयाजी यांच्या सक्त ताकिदीप्रमाणें ती कधींही आपण त्या मुलाची माता असें कोणाला सांगत नसे.

तथापि अपत्यप्रेमाचा उमाळा रूपी किती दिवस व कसा थोपवून धरणार ? मधून मधून अपत्यवत्सलतेच्या भरांत तिच्या हातून अशा कांहीं गोष्टी घडत कीं त्यांवरून कोणालाही संशय उत्पन्न व्हावा, हीच बटीक अपरूपाराणीच्या पुत्राची खरी माता नसेल ना ?

त्याबरोबरच शहाजीचेंही त्याच्या जन्मदात्या मातेशीं वर्तन प्रथम निसर्गतःच इतकें प्रेमळपणाचें होतें कीं, तो रूपीचाच मुलगा असावा असा तर्क करण्याला कोणालाही तेवढी एकच गोष्ट पुरली असती.

तो मायलेकरांचा प्रेमा हां हां म्हणतां इतक्या परिणतीला पोंचला कीं अपरूपाराणी आणि कोयाजी यांना तें एक नवें संकटसें वाटूं लागलें. लोकांचा जो समज कीं अपरूपाराणीनें गरोदरपणाचें व बाळंतपणाचें ढोंग करून हा कोठून तरी बनावट राजपुत्र पैदा केला आहे, त्या समजाला बळकटी आणणाऱ्या अशा गोष्टी एकीमागून एगक घडूं लागतांच त्यांना आळा घालणें अपरूपाराणी व कोयाजी यांना अगदीं अवश्य होऊन बसलें. त्यांनीं तर्क

केला कीं रूपीला राजमाता म्हणून आपलें स्तोम पुढेंमागें वाढवावयाचें असेल, त्या धोरणानें तिनें आपल्याला न कळत शहाजीच्या—आपल्या मुलाच्या जन्माविषयींचें रहस्य त्याच्यापाशीं उघडें केलें असेल. त्यामुळें त्यांनीं संगनमतानें रूपीला राजवाड्यांतून बाहेर काढून लावलें, व तिची एकाद्या बटकीला सुखानें जीवन कंठतां यावें अशी अन्नवस्त्राची व्यवस्था अलग करून दिली. परंतु रूपीलाही पुत्रविरह सहन होईना व त्याहीपेक्षां विशेष म्हणजे शहाजीला मातेशिवाय करमेना ! तो तर आपल्या आईसाठीं—नव्हे, आईहूनही प्रेमळ अशा त्या दाईसाठीं हट्ट घेऊन बसला. त्याच्या समजुतीसाठीं रूपीला पुन्हां माघारें बोलावून आणून राजवाड्यांत ठेवण्यांत आलें.

परंतु रूपीच्या पूर्वींच्या आणि आतांच्या स्थितींत जमीन—अस्मानाइतकें अंतर होतें. पूर्वीं तिला जें स्वातंत्र्य होतें, तें आतां नव्हतें. तिला स्वतःच्या पुत्राची भेट घ्यावयाची झाली तरी ती अगदीं क्वचित् व तीही कोयाजी अथवा अपरूपा राणी यांपैकीं कोणाच्या तरी साक्षीनें घ्यावी लागे. तिला कामधंदा कांहींच सांगण्यांत येत नसे. तिनें खावें प्यावें, आणि राजवाड्यालगतच्या इमारतींत एका कोठडींत पडून रहावें. हा सासुरवास रूपीलाही अगदीं असह्य होता. अपरूपाराणीनें तिच्या पुत्राच्या भाग्योदयाच्या रसाळ गोष्टी सांगून तिचें चित्तरंजन करण्याचा प्रयत्न करावा व तेवढ्यानेंही भागेनासें होतांच तिनें रूपीला धमकी द्यावी, "याद राख. शहाजी आतां पूर्णपणें माझ्या ताब्यांत आहे. तूं जर तो राजपुत्र नसून आपला मुलगा आहे असा बोभाटा करशील अगर तशी वागशील तर मी तुझ्या मुलाला ठार करायलाही कमी करणार नाहीं."

अपरूपाराणी येवढें घोर पातक करण्याइतकी उरफाटच्या काळजाची खास आहे अशी रूपीची रोजच्या अनुभवावरून खात्रीच होती. म्हणूनच तिनें मुकाट्यानें अपरूपाराणीचें म्हणणें मान्य केलें व स्वतः केवळ स्वतःच्या मुलाच्या कल्याणाकडे लक्ष देऊन नजरकैद पतकरिली.

असे कांहीं दिवस लोटले. पण शहाजी जसजसा मोठा होऊं लागला, तसतसा त्याचा आपल्या खऱ्या आईकडे—रूपीकडे जास्त ओढा दिसूं लागला. अपरूपा राणी व कोयाजी यांनीं संगनमतानें रूपीला विषप्रयोग करून ठार करण्याचेंही एकदां मनांत आणलें होतें. पण शहाजी वयांत येईतों त्याला

जन्मदात्या आईचा लळा सुटणें शक्य नव्हतें, व त्याच्या प्रकृतीवर मातृनिधनामुळें कांहीं अनिष्ट परिणाम होईल कीं काय या भयानें रूपीला त्या दोघांनीं जिवंत ठेविलें होतें. तथापि तिला वेडी ठरविण्याला—तिला वेड लागलें आहे असा सर्वत्र बोभाटा करावयाला मात्र त्यांनीं कमीं केलें नाहीं. त्यामुळें तेव्हांपासून ती आतां वेडी रूपी म्हणून सर्वत्र ओळखली जात होती. शहाजीचाही सभोंवारच्या त्या कांगावखोर गलबल्यांत असा ग्रह झाला होता कीं आपल्या जन्मदात्या आईला वेड लागलें आहे. पण वेडी आई झाली म्हणून ती शहाजीला कधीं अप्रिय मात्र झाली नाहीं. त्यानें आग्रहपूर्वक तिला आपणापाशीं ठेवून घेतलें होतें. त्यालाही आपल्या आईची ती लाजिरवाणी परवशता कष्टप्रद वाटे. परंतु अपरूपाराणी आणि कोयाजी यांच्यापुढें त्याचा नाइलाज होता. आपण बोलून चालून बटकीचें पोर असतांना आपणाला ज्या दोघांनीं स्वार्थासाठीं कां असेना पण राजपुत्र बनविलें, त्यांची भीड शहाजीसारख्या बावळटानें मातेच्या कैवारासाठीं तरी एकदम कशी तोडावी !

रूपीला वेडी ठरविण्याचे—तिला वेड लावण्याचे प्रयत्न अपरूपाराणी व कोयाजी यांनीं आपल्या हस्तकांकडून अगदीं पद्धतशीर व जारीनें चालविले होते. त्या प्रयत्नांपैकींच एक म्हणजे आज अनेक वर्षांपासून एकसारखे रूपीवर कटु वचनांचे घाव घालण्यांत येत असत, " तुझा मुलगा केव्हांच मेला, राजकुमार सवाई शहाजीराजा हा कांहीं तुझा मुलगा नव्हे. " त्याबरोबरच शहाजीची समजूत करण्यासाठीं त्याला अपरूपाराणीनें वारंवार समजावून सांगावें," रूपी मूळपासूनच वेडी आहे. तिला तुझा लळा आहे म्हणून ती तुला आपला मुलगा समजते. पण तिच्या या वेडचाचाळ्यांमुळें तूं मात्र हकनाहक राजपुत्र नव्हेसा ठरत आहेस. असला गैरसमज समाजांत जास्त फैलावूं नये यास्तव तूं प्रथमपासूनच सावधपणें वागलें पाहिजेस.

राज्यलोभ, व अपरूपाराणी आणि कोयाजी यांच्या कारवाईमुळें मूळपासूनच 'आपली खरी जन्मदाती आई अपरूपा असेल अथवा ही रूपीही असेल' असा झालेला बुद्धिभेद यांमुळें अपरूपाराणीच्या वरील उद्‌गारांतही शहाजीला बरेंच तथ्य आढळून आलें, व रूपीला वेड लागलें आहे अशी तर त्याची जवळजवळ खात्रीच होऊन चुकली. तो तिला पूर्ववत् सहानुभूतीनें पण ती वेडी आहे या भावनेनें वागवूं लागला.

आज रूपी मोकळी कशी सुटली याविषयीं दांतओंठ चावून चौकशी करीत अपरूपाराणीनें दासींना आज्ञा केली, " हिला अगोर इथून घेऊन जा पाहूं"

" मी इथून जाणार नाहीं. राणीसाहेब, मी इथून जाणार नाहीं. माझा मुलगा चोरून वर मलाच हांकलून देतां काय ? मी इथून जाणार नाहीं. रूपी पुन्हां शहाजीपाशीं जाऊन त्याला मिठी मारून म्हणाली, " मी इथून तुला एकट्याला टाकून कशी जाऊं रे माझ्या राया ! "

" चल दूर हो ! " शहाजी रागारागानें रूपीला दूर लोटीत म्हणाला. त्यालादेखील त्या शोभेचा कंटाळा आला होता. विशेषत: अपरूपाराणी आणि कोयाजी यांचें संगनमत झाल्यापासून त्याला पुन्हां स्वत: राजा होण्याची शक्यता दिसूं लागली होती. त्याप्रमाणें राजा होण्याची पूर्व तयारी म्हणून त्याला म्हतारीची पिडाटाळ होणें सोईचें वाटत होतें.

" काय? तूंदेखील मला दूर लोटूं लागलास ? ज्याचा भार मीं माझ्या उदरीं नऊ महिने धारण केला– "

रूपीच्या तोंडचें वाक्य पूर्ण होण्यापूर्वींच शहाजी अधिकाराच्या तोऱ्यांत गर्जून ओरडला, " नोकर माणसें जिवंत आहेत कीं सारीं मेलीं ? या वेडपटाला इकडे कशाला लावून दिलें ? "

अपरूपाराणी काय, कोयाजी काय किंवा नोकरचाकर काय, सर्वांनाच जर अंमळ दहशत वाटत असेल तर ती शहाजीच्या–बनावट राजपुत्राच्या मनाची. तोदेखील रूपीवर अशा प्रकारें उलटलेला पहातांच मग काय विचारतां ! अपरूपाराणीनें नोकरांना आज्ञा केली, " या बयेचें वेड आतां जास्तच बळावत चाललें. हिला इथून हलवा व दूर कोठें तरी नेऊन सोडून द्या पाहूं ! आतां हिला जवळ ठेवण्याची सोय नाहीं. "

" तिच्या पोटापाण्याची योग्य व्यवस्था करून तिला दूर एकाद्या गांवीं सुरक्षित ठेवून द्या. इथें आमच्याजवळ ही पिडा नको ! " शहाजी म्हणाला.

दासदासीजन रूपीला आवरण्यासाठीं पुढें झाले. आश्चर्य हें कीं इतका वेळ जी रूपी आकाशपाताळ एक करीत होती, ती आतां अगदीं गरीब गोगलगाय बनून त्या लोकांच्या स्वाधीन झाली. मात्र स्वाधीन होतां होतां ती म्हणाली, " याला म्हणतात जगाची रीत ! कनक आणि कांता यांच्यापुढें कुणाला आईबाप आठवत नाहींत, कोणी आठवत नाहींत ! पण माझ्या

बाळा, तुझें जर कल्याण होत असेल तर त्यासाठीं ही तुझी आई तुझ्याकरितां पाहिजे त्या हालअपेष्टा सोसायला तयार आहे... "

रूपी बोलत असतांनाच तिला दासदासींनीं ओढून नेलें देखील! अपरूपा राणीनें त्यांच्या मागोमाग जाऊन त्या नोकरांपैकीं एकाला बाजूला घेऊन आज्ञा केली, " त्या बाईला दूर जंगलांत नेऊन सोड आणि हें कोणाला कळवूं मात्र नकोस. जंगलांतल्या श्वापदांना एक दिवस तरी नरमांसाची खाशी मेजवानी मिळूं दे ! "

इकडे रूपीची वासलात अशा प्रकारें लागते, तोंच राणोजी तेथें जाऊन पोहोंचला. अपरूपाराणी व कोयाजीराव त्याचीच वाट पहात होतीं. त्यांनीं उत्सुकतेनें विचारिलें, " काय खबर आणलीस राणोजी ? "

" जगदेव शत्रूच्या हातून ठार झाला. करुणाराणीसाहेब सध्यां मध्यार्जुनांत, मानाजी चंदासाहेबाशीं सामना देण्याची तयारी म्हणून सैन्य जमवीत आहे तिकडे गेल्या आहेत. ही बातमी मला हनुमानानें येऊन सांगितली. "

" जगदेव ठार झाला काय ? ठीक आहे. आणि तो हनुमान कुठें गेला ? " कोयाजीनें विचारिलें.

" तो माघारा गेला. तोच आपणांकडे येत होता. परंतु आपला पत्ता त्याला मिळूं नये म्हणून मींच त्याला कांहीं तरी सांगून टाळलें. " राणोजी म्हणाला.

" तें तूं योग्य केलेंस. " अपरूपाराणी लगेच कोयाजीकडे वळून म्हणाली, " पण कोयाजीराव, आतां आपण प्रथम मध्यार्जुनांत जाऊन मानाजी आणि ती हडळ यांचा बंदोबस्त केला पाहिजे. त्या दोघांना या जगांतून नाहींशी केल्याखेरीज आपला मार्ग निष्कंटक व्हावयाचा नाहीं. "

" तें आलें माझ्या ध्यानांत सारें. त्याविषयीं आपण आतां मुळींच काळजी करूं नका. " कोयाजी म्हणाला.

" आपणापांशीं सध्यां किती सैन्य खडें आहे ? " अपरूपाराणीनें विचारिलें.

" सूर्यास्तापावेतों मी दोनशें सैन्य तरी खास उभें करतों. तेवढें मला वाटतें, मध्यार्जुनावर हल्ला करायला पुरेल . "

" पुरेल. कोंब उगवतो न उगवतो तोंच तो खुडून टाकायला त्यावर कुऱ्हाडीचे घाव घालायचें कारण नसतें. नुसत्या नखांनींही तो खुडला जातो."

याप्रमाणें अपरूपाराणी व कोयाजी यांचें संगनमत होऊन कोयाजी हा सैन्याची जमवाजमव करावयाला निघाला व सूर्यास्तापावेतों त्यानें राणीला शब्द दिल्याप्रमाणें दोनशें सैनिक खडे केलेही. रातोरात तें सैन्य मध्यार्जुनाकडे रवाना झालें. कोयाजीची प्रकृति नादुरुस्त असल्यानें तो व अपरूपाराणी या दोघांनीं पहांटेला निघावयाचें ठरलें. मध्यार्जुनांत तसाच प्रसंग पडल्यास ऐन वेळीं कुमक व्हावी म्हणून लगेच चंदासाहेबाकडे खलिता देऊन राणोजीला रवाना करण्यांत आलें.

* * * *

त्याच दिवशीं बरोबर मध्यरात्रीच्या सुमाराला अपरूपाराणी व कोयाजी यांना सेवकांनीं एकाएकीं झोंपेंतून जागें करून सांगितलें, "आपल्या वाड्यासभोंवार शत्रूचा गराडा पडला."

अपरूपाराणी व कोयाजी धडपडत उठून महालाबाहेर येतात, तोंच एक तरुण मराठा सरदार आपल्या सशस्त्र अनुयायांसह तेथें येऊन थडकला व आपल्या अनुयायांना म्हणाला, "पहातां काय ; पकडा या लोकांना. आणि तो तोतया राजपुत्र बटकीचा लेक कुठें दडून बसला असेल त्यालाही हुडकून काढून त्याच्या मुसक्या बांधा."

अपरूपाराणीनें खवळून विचारिलें, "खबरदार! कोण मला—या तंजावरच्या राजमातेला पकडण्याची आज्ञा देत आहे?"

"मानाजी! लांवसटी, तुझा दुष्मन मानाजी!" तो सरदार तितक्याच आवेशानें खवळून उद्गारला.

# प्रकरण २६ वें

# रामस्वामीची कारवाई

मोहना व मीनाक्षीराणी अकस्मात किल्ल्यांतून नाहींशा झाल्या व त्या प्रासादिक तरवारीही तेव्हांच चोरीला गेल्या, त्यामुळें चंदासाहेबाचा संतापाग्नि जो एकदां प्रज्वलित झाला तो तेव्हांपासून एकसारखा भडकतच होता. त्या अवतांत त्रिचनापल्लीच्या किल्ल्यावरील कित्येक वहिमी लोकांचा हक-नाहक कडेलोट करण्यांत आला. टेकडीवरील महादेवाचें देवालय- जें त्रिचना-पल्लीच्या राजवंशाचें कुलदैवत मानलें जाई, तेथें गोवधासारखे निषिद्ध प्रकार करून तें भ्रष्ट करण्यांत आलें. अनेक वहिमी नागरिकांना बलात्कारानें बाटविण्यांत आलें. असा किल्ल्यांत सर्वत्र अगदीं हा: हा:कार उडाला होता. परंतु इतकें करूनही चंदासाहेबाला मोहना, मीनाक्षी अथवा त्या तरवारी यांपैकीं कशाचाच शोध लागला नाहीं. शोध कसा लागणार ? तें त्रिविध रहस्य जर किल्ल्यांतील कोणालाही माहीत नव्हतें, तर कोण कसा शोध लावून देणार ?

तरीही चंदासाहेबाचा अजूनही पूर्वीचाच गैरसमज कायम होता कीं रतन-सिंगाला हा प्रकार माहीत असावा. रतनसिंग हा रामस्वामीप्रमाणेंच त्रिचना-पल्लीच्या किल्ल्यांतला फार पुराणा माहितगार होता. त्यानें मीनाक्षी राणीच्या पतीची व त्यानंतर मीनाक्षीराणीचीही कारकीर्द पाहिलेली. तो मीनाक्षीराणीच्या खऱ्या अमदानींत त्रिचनापल्लीचा किल्लेदार होता व त्याच्यावर राणीचा पूर्ण विश्वास होता. किल्ल्यांत तो एक बुद्रुक असामी गणला जाई. तो आपल्या लोकप्रियतेला साजेसा शूर व स्वाभिमानीही होता. परंतु परचक्राच्या महापुरांत त्यानें लव्हाळ्याप्रमाणें नम्रता धारण करून स्वसंतोषानें चंदासाहेबाची सेवा पत्करिली, व चंदासाहेबानेंही अशा मानी वीराला दुखवून आपलें कल्याण होणार नाहीं हें जाणून गप्प बसायला काय घेशील या न्यायानें रतनसिंगाला आपल्या हाताखालीं लहानशा हुद्यावर ठेविलें होतें. परंतु रतनसिंगाचा हुद्दा हलका झाला म्हणून त्याच्या लोक-

प्रियतेला त्यामुळें थोडीच ओहोटी लागते ! किल्ल्यांतील हिंदू लोकांवर त्याचें वजन अजून पूर्ववत् कायम होतें.

चंदासाहेबाची कल्पना कीं किल्ल्यांत आपल्या अगदीं घरांत आपल्या विरुद्ध जो एवढा मोठा कट उभारला गेला आहे, तो रतनसिंगाला माहीत असला पाहिजे ; किंबहुना तो त्या कटाचा एक पुढारी असला पाहिजे. त्यानेंच त्या प्रासादिक तरवारी कोठें तरी लपवून ठेविल्या असल्या पाहिजेत. त्याचा छळ करकरून त्याच्या तोंडून सर्व गोष्टींची कबुली घ्यावयाची या हेतूनें चंदासाहेबानें त्याला देहान्त शासन देण्याचें मुद्दाम लांबणीवर टाकून त्याचे परोपरीनें हालहाल चालविले होते. प्रथम प्रथम रतनसिंगाला पुष्कळ मारझोड करण्यांत आली. पण त्याला जर कांहींच माहीत नाहीं तर तो कबूल तरी काय करणार ! त्या मारझोडीचा उलट अनिष्ट असा परिणाम चंदासाहेबाला न कळत झाला कीं रतनसिंगाला अशा सैतानी अविंधाची सेवा पतकरल्याबद्दल कमालीचा पश्चात्ताप होऊं लागला व तो मनानें चंदासाहेबाचा कट्टा वैरी बनला. त्यांतल्या त्यांत त्याला खेद एवढाच वाटत होता कीं मनांत बाणलेलें वैर कृतींत उतरून दाखविण्याला त्याला आतां मोकळीक नव्हती व तशी मोकळीक पुढें सांपडणेंही शक्य नव्हतें. त्याचे हालही चंदा-साहेबानें इतक्या अमानुषपणें चालविले होते कीं ते सहन करण्यापेक्षां तो नरराक्षस आपला एकदम जीव घेईल तर फार बरें असें त्याला वाटत होतें. पण बिचाऱ्याचें जिणें व मरणेंही आतां अगदीं परावलंबी होऊन बसलें होतें.

चंदासाहेबानें रतनसिंगाचा छळ करण्याचा रोज नवा नवा उपाय शोधून काढावा. त्याप्रमाणें आज आपल्या वांटयाला कोणते भोग येणार याचा विषण्ण चित्तानें विचार करीत रतनसिंग तुरुंगांत आपल्या अंधार कोठडींत बसलेला असतांना खोलींत वर एक भलें मोठें कोळ्याचें जाळें त्याला दिसलें. त्या जाळ्याच्या मध्यभागीं कोळी बसून जाळ्याच्या कडेला कडीपाटाच्या फळीसरपटत एक किडा जाळ्यांत गुरफटून कुचंबतो आहे व कोळी भक्ष्या-साठीं दबा धरून बसलेला त्या किड्याला खाण्यासाठीं सरसर धांवत जात आहे असा तो देखावा पाहून रतनसिंग स्वतःच्या मनाशीं हळहळत म्हणाला, “अरेरे ! अभागी कीटका, माझ्याप्रमाणेंच तूंदेखील अगदीं परावलंबी होऊन पडला आहेस कीं रे ! ”

मनांतून त्या कीटकासाठीं हळहळत रतनसिंग आपण साधल्यास त्या कीटकाचा कोळ्यापासून बचाव करावा या सद्हेतूनें आपले शृंखलाबद्ध हस्त एकमेकांवर आपटून आवाज करूं लागला ! यांपेक्षां आणखी कांहींही हालचाल त्याला करतां येणें शक्य नव्हतें. कारण त्याचे पायही हातांप्रमाणेंच शृंखलाबद्ध होते.

आतां कोळी किडयावर झडप घालून त्याला खाणार, इतक्यांत कडीपाटाच्या फळीच्या आधारानें एक पाल दबा धरून बसलेली होती, ती आपलें भक्ष्य अर्थात् तो कोळी फळीजवळ येण्याचीच वाट पहात होती, ती पाल तो जवळ येतांच त्याच्यावर दृष्टि ठेवून सरसर पुढें सरकूं लागली. कोळी त्या किडयाला खाण्याच्या मोहांत गुरफटून मिटक्या मारीत असल्यानें आपला वैरी आपणावर मागाहून झडप घालीत आहे हें त्याला मुळींच कळलें नाहीं, व तो अगदीं टप्प्यांत येतांच पालीनें त्याच्यावर अर्धवट झुलती उडी घालून स्वतःची क्षुधा शांत केली.

तो देखावा पाहून रतनसिंग आपल्या मनाशीं म्हणाला, " माझ्या रक्षणासाठीं असा कोणी त्या दुरात्म्या चंदासाहेबाचा वैरी येणार आहे काय ? छे ! तें शक्यच नाहीं. मीं म्लेंछसेवेचें पातक जें आजवर जोडलें, त्या पातकाचें प्रायश्चित्त मला मरणाच्या मोलानें मिळावें अशीच श्रीरंगा, तुझी इच्छा दिसते. "

एवढें रतनसिंग स्वतःशीं उद्गारतो आहे, तोंच त्याच्या कोठडीच्या दरवाजाबाहेर खडखड असा आवाज आला. त्याबरोबर रतनसिंग दुःखभारानें आपल्याशीं पुटपुटला, " आले ! यमदूत आले ! आतां मला ते त्या काळासमोर नेणार आणि तो काळ आज कोणत्या नव्या परीनें माझा छळ करणार न कळे ! बाकी, आज माझ्यावर एकादा महा दारुण प्रसंग ओढवणार यांत मुळींच शंका नाहीं. पाहूं तर काय नशिबीं आहे तें ! "

तोंच कोठडीचा दरवाजा उघडला गेला व चार सशस्त्र मुसलमान शिपाई दरवाजांत उभे असलेले रतनसिंगाला दिसले. रतनसिंग हा हिंदु व किल्ल्यांतील सारे हिंदू बिथरलेले, ते नीट नोकरी करणार नाहींत, फितुरी करतील, या संशयानें चंदासाहेबानें तुरुंगावर व इतरत्रही झाडून सारे पहारेकरी व शिपाई आपल्या विश्वासांतील मुसलमान नेमले होते. परंतु मुसलमान

झाले तरी सारेच चंदासाहेबासारखे क्रूर व पाशवी वृत्तीचे असतात असें थोडेंच आहे ? रतनसिंगाला सक्त पहाऱ्यांतून रोज आपणासमोर आणण्यासाठीं चंदासाहेबानें ज्या शिपायांची नेमणूक केली होती, त्या शिपायांच्या तुकडीचा नाईक दाऊदखान हा भला माणूस होता. त्याला रतनसिंगाचा रोज रोज होत असलेला भयंकर छळ पाहून हळहळ वाटे. पण करतो काय ! तो हुकुमाचा बंदा पडला.

आज तर दाऊदखानाची चर्या फारच खिन्न दिसत होती. ती पाहून रतनसिंगानें त्याला विचारिलें, " का ? आज कोणता माझा छळ करण्याचें तुझ्या धन्यानें योजिलें आहे ? "

दाऊदखान गंभीर वृत्तीनें म्हणाला, " रतनसिंग, तुला काय माहिती असेल ती तूं आज तरी सांगावी आणि मोकळें व्हावेंस हें बरें. कारण, आज तशी आणीबाणीची वेळ येऊन ठेपली आहे. म्हणून मी तुला आगाऊ सूचना करीत आहें. याचा तूं राग मानूं नकोस. "

दाऊदखान शुद्ध भावानें व कळकळीनें बोलत आहे हें रतनसिंग ओळखून होता. चंदासाहेबानेंही पूर्व दिवशींच त्याला बजावून सांगितलें होतें कीं उद्यां जर तूं त्या तरवारींचा शोध लावून दिला नाहींस व मीनाक्षी आणि मोहना कुठें गेल्या हें सांगितलें नाहींस तर तुझा तुझ्या ध्यानीं मनींही नाहीं इतक्या कठोर उपायांनीं सर्व नाश करण्यांत येईल. तें सर्व आठवून रतनसिंगानें दाऊदखानाला म्हटलें, " दोस्त, मला जर त्यांतलें कांहींच माहीत नाहीं, तर मी तरी काय सांगूं ? आणि चंदासाहेब करून करून काय करणार? हालहाल करून माझा जीवच घेणार इतकेंच कीं नाहीं ? तर मी मरणाला मुळींच भीत नाहीं. "

" मरणाला तूं भीत नाहींस हें मलाही माहीत आहे. पण मरणाहूनही भयंकर असा परिणाम आज होणार असला तर ? "

" तो परिणाम काय होणार ? "

" सरकारांनीं आज तुला बळेंच गोमांस चारून बाटविण्याचा व तूं बाटल्यानंतर तुला तापलेल्या तेलाच्या कढईंत लोटून तळून ठार मारण्याचा डाव रचिला आहे. यामुळें तुला प्राणापेक्षां प्रिय अशा स्वधर्माला मुकावें लागणार. व वर मरण भोगावें लागणार ! त्यापेक्षां—मी म्हणतों, तुला

कांहीं माहीत नसलें तरी तुमच्यांतून परागंदा झालेल्या एकाद्याचें नांव खोटेंच सांगून तूं आजचा प्रसंग तरी टाळणार नाहींस का ? "

"प्रसंग अत्यंत आणीबाणीचा आहे खरा." रतनसिंग आवेशाच्या भरांत जोराजोरानें आपले केंस उपटीत म्हणाला, "त्या चांडाळानें आज मुद्दाम माझा हिंदु धर्माविषयींचा जाज्वल्य अभिमान ध्यानीं घेऊन माझा छळ करण्याला हा उपाय योजिला आहे काय ? नशीब म्हणावयाचें. दुसरें काय ? "

"म्हणूनच म्हणतों, कोणा तरी तुझ्या एकाद्या वैऱ्याचें नांव सांगून तूं मोकळा हो कसा ! "

"माझ्या जातींत—माझ्या धर्मांत माझा वैरी असा कोणीच नाहीं. आणि वैऱ्याचा झाला तरी अशा असत्य भाषणानें बळी घेण्याइतका मी अजून माणूसकी कोळून प्यालों नाहीं. बस्स ! काय व्हावयाचें असेल तें होऊं दे. मी जर सच्चा माणूस असेन, माझा सच्चेपणा जर श्रीरंगाच्या चरणीं रुजू असेल, तर तोच मला या संकटांतून निभावून नेईल. चला तुम्ही, मला त्या काळासमोर घेऊन चला. उगाच उशीर लागला तर तुमच्याविषयीं त्याच्या मनांत आणखी भलताच संशय यावयाचा." असें म्हणून रतनसिंग आपण होऊन शिपायांच्या स्वाधीन झाला. दाऊदखानाचा तेथें अगदीं नाइलाज होता. तो आपल्या साथीदारांसह केवळ कटुकर्तव्य म्हणून रतनसिंगाच्या दंडाला दोरी बान्धून त्याला चंदासाहेबासमोर घेऊन गेला.

चंदासाहेब राजवाड्यासमोरच्या बागेंत उच्चासनासमोर बसला होता, तो रतनसिंगाला दुरूनच दिसला. तेथें जवळच एक तरणी लिंबासारखी तेजस्वी कालवड—तिच्या मानेची सांखळी एका हातांत व पाजळलेला लखलखीत सुरा दुसऱ्या हातांत अशा थाटानें एक कसाई उभा होता. तो भयंकर देखावा पाहून रतनसिंगाला त्याचें भीषण भवितव्य मूर्तिमंत डोळ्यांसमोर दिसूं लागलें. तो त्या प्रसंगाशीं धर्मवीराला शोभेशा धीर वृत्तीनें तोंड देण्याचें बल आपल्याला देण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना करीत चंदासाहेबासमोर जाऊन उभा राहिला.

"ए काफर ! " चंदासाहेबानें पहिल्याच सपाट्याला रतनसिंगाला शिवी हांसडून विचारिलें, "आज तरी तुझें डोकें ताळ्यावर आलें आहे काय ?

चंदासाहेबाला तोंडचें वाक्य पूर्ण करण्याचा देखील अवसर न देतां रतनसिंग

डोळ्यांत आंसवें आणून म्हणाला, "पातक्या, जें क्रूर कर्म करावयाचें तूं योजिलें आहेस त्याचा उच्चार करून माझें श्रवणेंद्रिय आणि स्वतःची वाचा विटाळण्यापेक्षां तुला जें काय करावयाचें असेल तें मुकाटयानें कर कसा !"

"एकूण अजूनही तूं खरें बोलावयाला तयार नाहींस ! हरामखोरा, तर मग भोग आपल्या कर्माचीं फळें." असें म्हणून चंदासाहेबानें कसायाला आज्ञा केली, "मी खुणा करतांच एकदम त्या गाईची गर्दन छाट, आणि तिचें रक्त या काफराला पाज." तो लगेच रतनसिंगाकडे वळून म्हणाला "ए बेवकूब ! तुला मी तुझ्या गोमातेच्या रक्तानें प्रथम बाटवून मग तुझा तापलेल्या तेलाच्या कढईत लोटून जीव घेणार. अजून तरी तूं खरें बोलावयाला तयार आहेस काय ? सांग, त्या तरवारी तूं कुठें लपवून ठेविल्यास?"

हा प्रश्न चंदासाहेबाच्या तोंडून निघावयाला व रामस्वामी दोन तरवारींसह तेथें यावयाला एक योग जुळून आला. रामस्वामीनें त्या तरवारी चंदासाहेबासमोर ठेवून म्हटलें, "खाविंद, आपण हरप्रयत्नांनीं तंजावरच्या राजवाड्यांतून मिळविलेल्या या प्रासादिक तरवारी घ्या."

तेथल्या सर्व मंडळीला तो प्रकार पाहून विलक्षण आश्चर्य वाटलें. सर्व जण रामस्वामीकडे व त्या तरवारींकडे पाहूं लागले. चंदासाहेबाचा संताप रसरसलेल्या आगीच्या निखाऱ्यावर एकाएकीं जलवर्षाव झाल्याप्रमाणें बराच शांत झाला, व रतनसिंगाचा प्रामाणिकपणा आपोआप त्याच्या मनाला पटूं लागून मनोमन अनुतापाला प्रारंभ झाला. दाऊदखानाला रतनसिंगाचा अशा आकस्मिक कारणानें बचाव झाल्याचें पाहून आनंद वाटला. रतनसिंगाला त्याच्या जिवावरचें संकट टळल्यामुळें अम्मळ हायसें वाटलें हें खरें, तथापि रामस्वामीची स्वजनद्रोही वृत्ति पाहून त्याला तिरस्कार आला व तो रामस्वामीकडे तिरस्कारानें पाहूं लागला.

"रामस्वामी या तरवारी तुला कोठें मिळाल्या ?" चंदासाहेबानें विचारलें.

"खाविंद, तो फार मोठा इतिहास आहे. मीनाक्षीराणी आणि मोहना या दोघी बया आपल्या नाशावर उठल्या असून हा सारा त्यांचा उपद्व्याप आहे. तो वृत्तांत इथें अशा चारचौघांत सांगण्याजोगा नाहीं. इतर बाबतींतही आपणाशीं मला बरेंच महत्त्वाचें बोलावयाचें आहे. आपण मेहेरबानी करून थोडा वेळ अंतर्महालांत चलावें."

लगेच चंदासाहेब उठून आंत गेला. त्याच्या मागोमाग रामस्वामीही गेला. त्यांना आंत गेलेले पाहून रतनसिंग दाऊदखानाला ऐकू जाईल एवढ्या मोठ्यानें म्हणाला, "असले स्वजनद्रोही स्वदेशद्रोही—कुलांगार जोंवर आमच्यांत आहेत तोंवर आमच्या मायदेशाला बरे दिवस कसचे येतात!"

रामस्वामीनें एकान्तांत चंदासाहेबाला आपल्या समर्थनार्थ काय पाहिजे त्या गोष्टी सांगितल्या व तरवारींसारखी महत्त्वाची दुर्मीळ वस्तु रामस्वामीनें शोधून विश्वासानें आणून दिल्यामुळें चंदासाहेबाचाही त्याच्यावर चांगलाच विश्वास बसला. त्यानें रामस्वामीचा बहुमोल देणगी देऊन गौरव करून सांगितलें, "रामस्वामी, तूं ही तरवारींची कामगिरी पार पाडलीस तशीच मोहना आणि मीनाक्षी या दोघींना पकडून आणण्याची कामगिरीही एकदांची पार पाड म्हणजे मी तुझ्या ध्यानीमनींही नसेल इतकें तुझें कल्याण करून सोडीन."

रामस्वामी तें मान्य करून म्हणाला, "पण खाविंद, त्या दोघी बाया सध्या थोड्याच हिंडत असणार! मानाजीराव, झुंझारराव वगैरे मातबर लोकांचें त्यांना पूर्ण पाठबळ असल्यानें लढाई केल्याखेरीज त्या हातीं लागतीलसें दिसत नाहीं."

"मग तुझें काय म्हणणें आहे? तुला सैन्याची कांहीं मदत पाहिजे काय?"

"अर्थात्! त्याखेरीज तें काम शक्यच नाहीं."

"सैन्याची एक तुकडी मी तुझ्याबरोबर देतों."

"पण मी लढवय्या सेनापति थोडाच आहें? मी आपला साधा सांगकाम्या गडी. माझ्या ऐवजीं—पण खाविंद, रतनसिंगाविषयींचा आपला गैरसमज आतां सारा दूर झाला ना?"

"होय."

"मग त्याला ती कामगिरी सांगून आपल्या बाजूला वळवून कां घेत नाहीं? तो कांहीं उपेक्षा करण्याजोगा सामान्य मनुष्य नाहीं. राजवटींतील अशा जुन्या मुरलेल्या माणसांना या वेळीं खाविंदांनीं हाताशीं धरणें अवश्य आहे."

होय नाहीं करतां करतां चंदासाहेब त्या गोष्टीला कबूल झाला. त्याच्या मनांतील रतनसिंगाविषयींचा संशय आतां दूर झाला होता. त्यामुळें रामस्वामीचे बोल त्याला पटले.

"पण तूं रतनसिंगाबरोबर नेहमीं असशील ना ?"

"त्याची आपणाला मुळींच काळजी नको."

"मुराररराव घोरपड्याची आणि मीनाक्षीची गांठ पडण्यापूर्वीं मीनाक्षी पकडली गेली पाहिजे किंवा निदान ठार तरी झाली पाहिजे."

चंदासाहेबानें जें जें सांगितलें तें तें रामस्वामीनें मुकाट्यानें मान्य केलें. लगेच ते दोघेही उद्यानांत रतनसिंग उभा होता तेथें आले. रतनसिंग अद्यापि शृंखलाबद्धच होता. चंदासाहेबानें त्याला प्रथम बंधमुक्त करविलें व मग विचारिलें, "रतनसिंग, तुझ्यावरचा वहीम या रामस्वामीच्या कामगिरीमुळें आपोआप दूर झाला आहे. तूं माझा राजनिष्ठ सेवक आहेस अशी आतां माझी खात्री होऊन चुकली आहे; व म्हणूनच तुला मी पुन्हां माझ्या सेवेंत पूर्ववत् रुजूं करून घेऊन तुला एक महत्त्वाची कामगिरी सांगूं इच्छितों. ती कामगिरी तूं निष्ठापूर्वक पार पाडशील ना ?"

रामस्वामीच्या मध्यस्थीमुळें आपली सुटका झाली हें रतनसिंग ओळखून चुकला होता. तेवढ्यांत रामस्वामीनेंही त्याला डोळ्यांची खूण केली. रतनसिंगानें चंदासाहेबाला त्रिवार अभिवादन करून त्याची सेवा करण्याचें कबूल केलें. मनांतून मात्र त्याला अचंबा वाटत होता कीं असें कसें झालें ?

"तर मग तूं निवडक शंभर स्वार व आणखी जरूर तेवढी युद्धसामग्री घेऊन रामस्वामीबरोबर जा. तो मार्गांत तुला कामगिरी समजावून देईल. कामगिरी फारच महत्त्वाची आहे. तिची कोठेंही वाच्यता होणें उपयोगाचें नाहीं."

याप्रमाणें आणखी थोडा वेळ वाटाघाटी झाल्यावर रामस्वामी आणि रतनसिंग यांनीं चंदासाहेबाचा निरोप घेतला. रामस्वामीनें रतनसिंगाच्या चर्येवरून तो त्या घडामोडींतील एकंदर रहस्य जाणण्यासाठीं अत्यंत उत्सुक असल्याचें ओळखून हळूच त्याला सांगितलें, "किल्ल्याच्या बाहेर गेल्यावर मी तुला सर्व कांहीं सांगेन. तोंवर इथें कांहींही चौकशी करावयाची नाहीं."

तो दिवस कूच करण्याच्या तयारींत मोडला, व दुसऱ्या दिवशीं रामस्वामी आणि रतनसिंग सैन्यासह जावयाला निघण्यापूर्वीं चंदासाहेबाची भेट घेण्यासाठीं म्हणून आले तों अपरूपाराणीकडून कुमक मागण्यासाठीं चंदासाहेबापाशीं आलेला राणोजी तेथें त्यांना भेटला.

" रामस्वामी, हा एका दगडानें दोन—नव्हे तीनचार पक्षीं मारण्याचा योग जुळून आला आहे. मीनाक्षीराणी व मोहना हस्तगत होणें जितकें महत्त्वाचें आहे, तितकेंच अथवा त्यापेक्षांही जास्त तंजावरची राणी करुणा व तिचे साथीदार यांचा बीमोड होणें अवश्य आहे. अपरूपाराणीला करुणाराणीचा नक्की तपास लागला असून तिला पकडण्याच्या कामीं साहाय्य मागण्यासाठींच हा तिकडचा हेर आला आहे. ही जबाबदारी तुम्ही शिरावर घेऊन पार पाडूं शकाल काय ? "

रामस्वामी ती वार्ता ऐकून विस्मयचकित झाला. करुणाराणीवर ओढवूं पहाणारें हें नवें संकट कसेंही करून टाळलेंच पाहिजे व अपरूपा आणि कोयाजी यांचा पक्का बंदोबस्त केल्याखेरीज हें शक्य नाहीं हें तो ओळखून होता. त्यानेंही चंदासाहेबाप्रमाणेंच—पण अगदीं विरुद्ध दिशेनें—एका दगडानें चार पक्षी मारण्याचें आपल्या मनाशीं ठरवून चंदासाहेबापाशीं तसें कबूल केलें. लगेच तसा संदेश अपरूपा राणीला कळविण्यासाठीं राणोजी माघारा रवाना झाला.

दुसऱ्या दिवशीं रामस्वामी आणि रतनसिंग हे सैन्यासह आपल्या कामगिरीवर निघाले. सैन्य पुढें चालत होतें व ते दोघे घोड्यांवर स्वार होऊन सैन्यामागाहून कांहीं अंतरावरून चालले होते. थोडें अंतर चालून गेल्यावर रामस्वामी पाणी पिण्याच्या निमित्तानें मार्गातील एका भव्य सरोवरापाशीं थांबला. त्याबरोबर रतनसिंगही थांबला.

" रतनसिंग, आतां तुझी हरएक प्रकारची संशयनिवृत्ति करावयाला हरकत नाहीं. " रामस्वामी आपण होऊन बोलूं लागला, " पहिली गोष्ट, काल तुला मीं जीवदान दिलें आहे, हें तर तुला मान्य आहे ना ? "

" होय. पण— "

" थांब. माझें नीट ऐकून घे. पहिली गोष्ट, मीं तुला जीवदान दिलें, तें देशाच्या कल्याणाकारणें तुझा जन्म सार्थकीं लागावा म्हणून. आणि चंदासाहेबापाशीं शब्द खर्चून या कामगिरीवर मीं तुझी नेमणूक करून घेतली, ती तूं विश्वासू व जबाबदार माणूस आहेस म्हणून. मला किल्ल्यांत येतांनाच तुझ्यावर ओढवलेलें संकट लोकांकडून कळलें तेव्हां मला फार वाईट वाटलें ... "

" तें सारें खरें. परंतु तूं त्या प्रासादिक तरवारी पुन्हां हुडकून चंदासाहेबाच्या स्वाधीन केल्यास हें तूं अनुचित कृत्य केलें नाहींस काय ? "

" तुझ्या जिवासाठीं–मित्रा, तुझ्या जिवासाठीं मला तें अनुचित कृत्य करावें लागलें." रामस्वामी आपले कपडे उतरून ठेवीत म्हणाला, " मित्रासाठीं असें साहस करावयाचें नाहीं,तर कोणासाठीं करावयाचें ? "

" पण तूं हे कपडे कशासाठीं काढतो आहेस ? " रतनसिंगानें विचारिलें.

" पाणी पिण्यासाठीं." रामस्वामी हंसत हंसत अंमळ थांबून पुन्हां उत्तरला, " पण थट्टा करण्याची ही वेळ नाहीं. मी एक परम दिव्य करण्याची ही मंगल पूर्वतयारी करीत आहें. त्यापूर्वीं मला तुझी निःशंक मनाची अशी आणभाक पाहिजे आहे कीं.... "

" मायदेशाच्या मंगलासाठीं स्वतःचे प्राण खर्चीं घालावे लागले तरी देखील हा रतनसिंग त्याला आनंदानें तयार आहे. यापेक्षां आणखी कोणती आणभाक तुला पाहिजे ? "

" पुरे. तुझा एवढा शब्द मला पुरे आहे. " असें म्हणतां म्हणतां रामस्वामीनें एकदम त्या सरोवरांत उडी मारिली. तो तोल चुकून आंत पडला कीं काय अशा भीतीनें रतनसिंग त्याला वांचविण्यासाठीं घाईघाईनें आंत उडी घेणार, तोंच रामस्वामी दोन म्यान केलेल्या तरवारी घेऊन वर आला.

" हें काय ? " रतनसिंगानें आश्चर्यपूर्वक विचारिलें.

" याच त्या प्रासादिक तरवारी. मीच चंदासाहेबाच्या राजवाड्यांतून त्या हिकमतीनें हस्तगत केल्या व त्या इथें लपवून ठेविल्या होत्या. " रामस्वामी आपले कपडे बदलीत म्हणाला.

" आणि तूं चंदासाहेबाला दोन तरवारी दिल्यास त्या ? " रतनसिंगानें त्यास विचारिलें.

" तें आतां तूंच ओळख. तें कांहींही असलें तरी तो मूर्ख फंसला ना?, आणि तुझा बचाव झाला ना ? आतां तूं एवढेंच कर, ह्या तरवारी ताब्यांत घेऊन त्यांना जिवापलीकडे जप, व तसाच जिवावरचा प्रसंग तुझ्यावर येऊन ठेपला तर तुझ्याशिवाय विश्वासाच्या कोणाही माणसाच्या हातीं त्या मोहना, करुणाराणी अथवा मानाजी या नांवाचा तिचा एक साहचकर्ता आहे त्यापैकीं कोणाच्या तरी हातीं त्या पावत्या होतील असें कर. ही तंजा-

वरची साक्षात् राजलक्ष्मी आहे, व तंजारवरचें राज्य संकटमुक्त होण्यावरच आम्हां ह्या प्रांतांतील हिंदूंचें भवितव्य अवलंबून आहे, हें विसरूं नकोस.'

"म्हणजे? आतां तूं माझ्याबरोबर राहणार नाहींस काय?"

"नाहीं. अशीं आणखी कितीतरी गुंतागुंतीचीं कामें माझ्या मागें आहेत तीं मला सपाट्यानेंच पार पाडलीं पाहिजेत. मात्र अपरूपाराणी आणि कोयाजी यांच्या उपद्व्यापाचा सोक्षमोक्ष होईतों मी तुझ्याबरोबर आहें. तोंवर आपण पुढील सारा बेत नक्की ठरवूं."

लगेच ते दोघे पुन्हां घोड्यावर स्वार होऊन मार्गाला लागले.

## प्रकरण २७ वें

# अपरूपा व कोयाजी यांचा शेवट

अपरूपा राणी आणि कोयाजी यांनीं स्वसंरक्षणासाठीं म्हणून जो डाव टाकला तोच त्यांच्या वाईटाला कारण झाला. शत्रूला अर्थात् मानाजीला काळोखांत चकित करून सोडावें, व आपले लोक मग त्याला काळोखांत गांठून ठार मारतील ह्या हेतूनें त्यांनीं वाड्यांतील सारे दिवे मालविण्याला सांगितलें. परंतु त्यामुळें तेथें जी दंगल माजली, त्या दंगलींत कोणाचा पायपोस कोणाच्या पायीं नाहींसा झाला. त्यांतल्या त्यांत शहाजीनें—अपरूपा राणीच्या बनावट राजपुत्रानें तर आपल्या धांदरटपणाची कमालच केली. मानाजीराव आपणाला व अपरूपाराणीच्या साऱ्याच पक्षाला पाण्यांत पाहातो हें त्याला माहीत होतें. त्या मानाजीनें हल्ला केला असें कानीं येतांच आतां आपली धडगत नाहीं असें पाहून तो जो आपल्या शयनमंदिरांतून धडपडत जागा झाला, तो 'मानाजीराव, मी तुम्हांला शरण आलों आहें. मला मारूं नका' असा टाहो फोडीत सैरावैरा धावूं लागला. त्यामुळें त्याला पकडणें मानाजीला फारच सोपें गेलें. तेथल्या इतर लोकांची हल्ला परतविण्याची तयारी होण्यापूर्वींच मानाजीच्या लोकांनीं बहुतेकांचा फन्ना उडविला होता. तथापि होतां होईतों अपरूपा राणी त्या हल्ल्यांत ठार होऊं नये अशी मानाजीची इच्छा असल्यानें त्यानें तेथें काळोख पडतांच मोठ्यानें ओरडून राणीला ताकीद दिली होती, "राणीसाहेब, आपण आमचा प्रतिकार करण्याच्या भरीस पडाल तर हकनाहक प्राणाला मुकाल. मुकाट्यानें आमच्या स्वाधीन व्हाल तर तुमच्या मानाला साजेशा इतमामानें तुम्हांला तंजावरला पाठविण्यांत येईल."

तथापि त्या वाड्यांत पुष्कळसे मुडदे पडून वरीच सामसूम झाल्यावर मानाजीनें मशाली पेटवून राणी व कोयाजी यांच्या शोधार्थ सर्वत्र हिंडून पाहिलें, तों तेथें इतस्ततः विखुरलेल्या प्रेतांत त्याला राणीचें प्रेत दिसून आलें. त्याबरोबर तो गर्जून म्हणाला, "राणीसाहेबांचा वध कोणीं केला ?"

पलीकडे पडलेल्या प्रेतांच्या व अर्धमेल्या विव्हळत्या मुडद्यांच्या गर्दीतून एक आसन्नमरण वीर क्षीण स्वरानें उद्‌गारला, "मीं राणीचा वध केला. राणी इतकी पातकी होती कीं तिला देहान्त शासन मिळणेंच अवश्य होतें. हा जर माझ्या हातून अपराध घडला असें सरदारसाहेब, तुम्हांला वाटत असेल, तर त्याबद्दल मला क्षमा करा."

"विश्वासघातक्या! हरामखोरा! तूं राणीचा खून केलास काय?" असें आवेशानें उद्‌गारत अंगावरील अनेक जखमांमुळें रक्तानें न्हालेला कोयाजी घाटगे बाणासारखा त्या गर्दीतून धांवत पुढें आला व त्यानें तरवारीच्या एका घावासरसें त्या विव्हळणाऱ्या वीराचें शीर धडावेगळें केलें. संभाजी मानाजीच्या उजव्या हाताला उभा होता. त्यानें तो प्रकार पहातांच एकदम कोयाजीवर झडप घातली व आपल्या हातांतील कटचार त्याच्या छातींत खुपशीत म्हटलें, "देशद्रोही महापातक्या, कांचनगडावरून तूं अग्निप्रळयांतून बचावलास, पण येथें तुझ्या कपाळीं विधात्यानें मरण लिहिलें होतें. हें घे तुझ्या पापाचें प्रायश्चित्त."

कोयाजीला संभाजीच्या कट्यारीच्या वारानें प्राणांतिक जखम झाली. तरीही त्याची पर्वा न करितां त्यानें संभाजीवर उलटा वार केला. तो योगायोगासरसा संभाजीला लागावयाचा सुटून शहाजीला ओझरता लागला. तरी बरें कीं तेवढ्यांत मानाजीनें शहाजीला बाजूला ओढलें. त्यामुळें शहाजीच्या दंडावर मात्र लहानशी जखम झाली. तेवढ्यांत संभाजीनें संधी साधून कोयाजीवर दुसरा वार केला. त्या वारासरसा मात्र कोयाजी गतप्राण होऊन खालीं कोसळला.

कोयाजीच्या हातून अपरूपा राणीचा वध करणारा वीर ठार झाला, तो कोण असावा याची नीटशी ओळख दुरून न पटल्यानें मानाजीनें मशालीच्या प्रकाशांत पुढें होऊन पाहिलें तों तो हनुमान! हनुमानाची तशी अखेर झालेली पाहून मानाजी व संभाजी या दोघांनाही फार हळहळ वाटली. पण मृताला जिवंत करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं थोडेंच होतें!

अपरूपा राणी धारातीर्थीं पतन पावलेली पाहून मानाजीला ती खरी वीररमणीशी वाटूं लागली. मात्र तिनें निवडलेला राजपुत्र शहाजी—तो बावळट बटकीचा पोर प्राणभयानें एकदम आपल्याला शरण येऊन आपल्या

आश्रयानें लपून बसलेला पाहून मानाजीला मनांतल्या मनांत हसें आवरेनासें झालें. तो शहाजीकडे पाहून स्वतःशीं म्हणाला देखील, "एरंडाच्या फळांत आम्रफलाचें माधुर्य कोठून येणार? बटकीचा पोर तो बोलूनचालून बटकीचा! म्हणूनच तो इतक्या सुलभतेनें शरण आला. तें राजबीज असतें तर निदान आपणांशीं दोन हात केल्याखेरीज तरी तो खास शरण येता ना."

मानाजीनें दुसरा दिवस अपरूपाराणी, कोयाजी वगैरे मृतांना ज्याच्या त्याच्या दर्जाप्रमाणें अग्नि देण्यांत खर्च केला. त्यांतल्या त्यांत हनुमानाचा अंत्य-संस्कार अपरूपाराणीपेक्षांही गौरवानें करण्यांत आला. राणीचें प्रेत कोल्ह्या कुत्र्यांकडून खावविण्यांत आलें नाहीं, तें प्रतापसिंहमहाराजांकडे पाहून. परंतु हनुमानाच्या प्रेताचा गौरव झाला तो मात्र त्याची तशी योग्यता म्हणून !

ती सारी निरवानिरव झाल्यावर मानाजीनें शहाजीला संभाजीच्या हातीं सोंपवून सांगितलें, "संभाजी, या तोतयाला तूं महाराजांच्या पायांपाशीं नेऊन गुजर. ते याचा काय न्याय करावयाचा तो करतील." त्यानें संभाजीला एका बाजूला घेऊन हळूच त्याच्या कानांत सांगितलें, "आणि हें पहा, तूं त्यांना माझा थांगपत्ता कांहींदेखील लागूं देऊं नकोस. त्याप्रमाणेंच करुणा-राणीविषयींही कांहीं खबर त्यांना कळतां कामा नये. आकाशांत दाटलेलीं काळीं अभ्रें दूर होण्याला प्रारंभ झाला आहे खरा. तथापि तीं पुरीं दूर हो-ण्याला अद्यापि थोडा अवधि आहे. अपरूपाराणी व कोयाजी यांचा असा असा शेवट झाला एवढें त्यांना सांगावयाला मात्र हरकत नाहीं. आतां मी शिवगंगेकडे प्रथम जातों. मात्र तूं जातां जातां श्रीरंगाच्या देवालयांत त्या बैराग्याचा शोध लागला तर पहा."

संभाजी मानाजीची आज्ञा प्रमाण मानून तोतया राजपुत्रासह तेथून निघाला, व मानाजी आपणाबरोबरच्या मूठभर लोकांसह मध्यार्जुनाकडे वळला. त्रिचनापल्लीच्या गादीचा एक वारस वंगारू तिरुमल हा मध्यार्जुनाच्या आसमंतांत वेषांतरानें हिंडत आहे असें मानाजीच्या कानीं आलें होतें. तो जर या वेळीं आपणाला सामील झाला तर त्रिचनापल्लींतून चंदासाहेबाचा उठावा करण्याच्या कामीं त्याचा चांगला उपयोग होईल असा मानाजीचा तर्क होता. तोंच त्याच्या गुप्त हेरानें वर्दी दिली, "चंदासाहेबाचें सैन्य अपरूपाराणी-च्या साहाय्यार्थ येत आहे."

" बरें त्या सैन्याला येऊं दे. आणखी काय खबर ? " मानाजीनें विचारिलें.

" रतनसिंग या नांवाचा कोणी सरदार व रामस्वामी या नांवाचा त्याचा एक जोडीदार असे दोघे जण तो डाव खेळत आहेत. त्यांना करुणाराणीसाहेब मध्यार्जुनांत असल्याचा सुगावा लागला असून त्यांच्यावर हल्ला करण्याची त्यांची मनीषा आहे. "

मानाजीला प्रथम ती वार्ता ऐकून जरा चिंतेंत पडल्यासारखें झालें. तथापि रामस्वामीचें नांव कानीं येतांच त्याची सारी चिंता एकदम दूर झाली. रामस्वामीनें चंदासाहेबाला गोत्यांत अडकविण्यासाठीं हा कांहीं तरी चक्रव्यूह रचला असला पाहिजे अशी त्याची खात्रीच होती. तथापि समक्ष भेटींत आणखी कांहीं महत्त्वाच्या गोष्टी रामस्वामीच्या साहाय्यानें करतां येतील या इराद्यानें त्यानें रामस्वामीची गांठ घेण्याचें ठरविलें.

* * * *

तोतया राजपुत्र शहाजी याला बरोबर घेऊन संभाजी तंजावरच्या मार्गानें जात असतां मध्येंच त्याला खबर लागली कीं झुंझारराव श्रीरंगाच्या देवालयाच्या आसपास कोठें तरी असून सैन्याची जमवाजमव करीत आहे, व त्याची तयारी आपल्या विरुद्ध चालली आहे असा झुंझाररावाच्या हितशत्रूंनीं मुद्दाम तंजावरला जाऊन प्रतापसिंह महाराजांचा कलुषित समज करून दिल्यामुळें त्याला शासन करण्यासाठीं खुद्द महाराज चाल करून येत आहेत. ती वार्ता ऐकून संभाजीला चिंता उत्पन्न झाली कीं आतां कसें होणार ! प्रतापसिंहमहाराज स्वत: झुंझाररावाचें पारिपत्य करण्याला येत होते ती एकटच्या झुंझाररावांची थोरवी नसून तो करुणाराणीचा महिमा होता. तें संभाजी ओळून होता. झुंझारराव, करुणाराणी आणि मानाजी यांना पकडून आणण्याची कामगिरी महाराजांनीं सखोजी नाईकाला सांगितलेली त्याला ठाऊक होती. त्यामुळें त्याला पेंच पडला कीं झुंझारराव पूर्ण निर्दोषी असून स्वामिसेवादक्ष आहे हें जरी खरें तरी महाराजांची तशी खात्री कोणीं कशी करून द्यावी ? संभाजीसारख्या य:कश्चित माणसावर महाराज थोडेच विश्वास ठेवणार होते !

अशा आणीबाणीच्या वेळीं जर तो बैरागी—मानाजीचा गुरु भेटला, तर फार छान होईल असें संभाजीला वाटलें. त्यानें त्या बैराग्याची चौकशी

करावयाला व तो श्रीरंगाच्या देवालयाकडे जातांना भेटावयाला एक गांठ पडली. संभाजीनें बैराग्याला नम्रतापूर्वक वंदन करून अपरूपाराणी व कोयाजी यांच्या निधनाचा वृत्तांत त्याला निवेदन केला. त्या घटनेचा प्रत्यक्ष पुरावा म्हणून तोतया राजपुत्र शहाजी संभाजीबरोबर होताच. बैराग्यानें त्याच्याकडे वळून विचारिलें, " वेड्या मुला, राजसिंहासन ही सुळावरची पोळी खाण्याची दुर्बुद्धि तुला कोठून सुचली ? "

शहाजीनें बैराग्याच्या पायांवर लोटांगण घालून त्याची करुणा भाकली, " मला तुम्ही वांचवा. मला प्रतापसिंह महाराजांच्या स्वाधीन करूं नका."

बैरागी सडेतोड वृत्तीनें म्हणाला, " तूं राजद्रोहाचा भयंकर अपराध केला आहेस. तुला शासन अथवा क्षमा करण्याचा अधिकार माझा नसून तो महाराजांचा आहे. "

याप्रमाणें संभाषण चाललें आहे इतक्यांत लोकांचा एक घोळका रस्त्यानें आरडाओरड करीत येत असतांना त्या सर्वांनीं पाहिला. बैराग्यानें संभाजीला तिकडे पाहून विचारिलें, " हा काय प्रकार आहे ? "

तोंच त्या जमावाच्या तोंडचे अस्पष्ट शब्द त्या सर्वांना ऐकूं आले, "मारा–मारा त्या थेरडीला. बटीक ती बटीक आणि वर राजमाता होऊं पहाते काय ? "

लगेच दुसरा तसाच अस्पष्ट ध्वनि ऐकूं आला, "अरे तिला ठार मारूं नका; तिला पकडून महाराजांपाशीं घेऊन चला. म्हणजे महाराज तिच्या तोंडून सर्व शत्रुकारस्थानांचा पाठ वदवितील व मग तिला काय शासन करावयाचें तें ते करतील."

तेवढ्यांत तसाच तिसरा ध्वनि ऐकूं आला, " तिनें सांगितल्याप्रमाणें प्रथम तिच्या पोराचा तपास लागतो किंवा कसें तें पाहूं. तपास लागला, ती आपणापाशीं खरें बोलली असें शाबीत झालें, तर तिच्यावर आपण दया करून तिला आणि तिच्या पोराला जिवंतच्या जिवंत महाराजांपाशीं नेऊन गुदरूं. ती खोटें बोलते असें शाबीत झालें तर मात्र तिला इथल्या इथें ठार करूं. "

" हें त्या रूपी बटकीचें कांहीं तरी प्रकरण दिसतें. " संभाजी शहाजीकडे पहात म्हणाला.

शहाजी विव्हलचित्त होऊन समोरून चालून येणाऱ्या त्या घोळक्याकडे

पहात म्हणाला, "माझी आई!–गुरुदेव, माझ्या आईला आपण वांचवा हो वांचवा."

ती रूपीच होती. अपरूपाराणीनें तिला जंगलांत नेऊन ठार मारण्याला आपल्या सेवकाला सांगितलें, पण त्या सेवकानें भूतदयेनें प्रेरित होऊन तिला जंगलांत जिवंत सोडून दिलें. तेव्हांपासून ती बिचारी पुत्रविरहानें व्याकुळ होऊन दाही दिशा वणवण उपाशीतापाशीं हिंडत असतांना कांहीं लोकांनीं तिला ओळखलें व त्यांनींच तिचा असा छळ मांडला होता. रूपीचा आपला पुत्र तंजावरचा राजा व्हावा असा आग्रह नसून ती सारी कोयाजी व अपरूपा राणी यांची कारवाई होती हें त्या लोकांना काय माहीत!

बैराग्याला व संभाजीलाही त्या रूपीची दया आली. संभाजी भूतदयेनें प्रेरित होऊन आपली तरवार म्यानांतून बाहेर काढून रूपीच्या रक्षणार्थ त्या लोकांवर धांवण्याच्या विचारांत होता. तोंच त्याला बैराग्यानें आवरून म्हटलें, "ते लोक अडदांड आहेत. ते तुला मुळींच आवरणार नाहींत. उलट तुझ्या प्राणावर मात्र बेतण्याचा संभव आहे. तूं इथेंच रहा, मी त्यांना आवरतों."

बैराग्यानें तेथूनच सच्चिदानन्द असा त्रिवार जयघोष केला. त्याबरोबर काय चमत्कार, त्या लोकांनींही तसाच जयघोष केला. संभाजीला तें नवल वाटलें. बैरागी तसाच पुढें गेला व पुन्हां मोठ्यानें ओरडून म्हणाला, "माझ्या शिष्यांनो, त्या गरीब जीवाचा असा छळ करूं नका."

"गुरुदेव, ही स्त्री महान् अपराधी आहे." त्या लोकांपैकीं एक ओरडला.

"मला तें सर्व माहीत आहे. पण अपराध्यांना शासन करण्याचा अधिकार एका परमेश्वराचा व परमेश्वररूप राजाचा. इतरांनीं तो अधिकार उतावीळपणें हातीं घेणें म्हणजे पाप करण्यासारखें आहे. माझी तुम्हांला आज्ञा आहे कीं त्या स्त्रीला ताबडतोब सोडून द्या. तिची काय व्यवस्था पुढें करावयाची ती मी करीन."

बैराग्याच्या तोंडून ती आज्ञा निघतांच सर्व लोकांनीं त्या क्षणींच रूपीला बैराग्याच्या पायांपाशीं आणून सोडिलें व बैराग्यानें 'जा' अशी आज्ञा करतांच ते त्याला अभिवादन करून निघून गेले. म्हातारीनें रडत रडत व्याकूळ चित्तानें बैराग्याच्या पायांवर लोटांगण घातलें. शहाजीनें 'आई! आई!' अशा हांका मारीत धांवत जाऊन तिच्या गळ्याला मिठी मारिली. वास्त-

विक तोच तिची अशी दुर्दशा होण्याला कारण झाला होता. राज्यलोभाला बळी पडून त्यानें तिला हेटाळलें नसतें तर अपरूपाराणी अगर कोयाजी यांची तिला भणंग भिकारणीप्रमाणें रानोमाळ हिंडविण्याची काय छाती होती! पण रूपी माता पडली. तिच्या कोमल मातृहृदयांत पुत्राच्या प्रमादाच्या आठवणीला अथवा रोषाला लवमात्र जागा नव्हती. तिला उलट पुत्रदर्शन होतांच नवजीवन प्राप्त झाल्यासारखें वाटूं लागलें. सर्व शारीरिक यातना ती जणूं पार विसरून गेली व वत्सलतेचें आऊर उरीं दाटून आलेल्या गद्गद कंठानें शहाजीला हृदयाशीं घट्ट धरून म्हणाली, "अखेर माझा बाळ मला सुखरूप भेटला; माझ्या डोळ्यांचें पारणें फिटलें. बाबा, मी ऐकत होत्यें कीं तुझ्या वाड्यावर शत्रूचा हल्ला होऊन ती अवदसा आणि तो सैतान दोघेंही ठार झालीं, व तूंदेखील जिवें मारला गेलास असें मला कोणींतरी सांगितलें. आतां तरी माझ्या बाळा, तुला माझ्या गळ्याची शपथ आहे, तूं राजा होण्याचा नाद सोड; आणि महाराजांना शरण जाऊन त्यांच्यापाशीं जीवदान माग." ती बैराग्याकडे वळून म्हणाली, "हे बुवादेखील जणूं आम्हांला साक्षात् परमेश्वर भेटले. यांनींच मला जीवदान दिलें म्हणून ...."

"तेच मलाही जीवदान देतील." शहाजी बैराग्याला पुन्हां आदरपूर्वक वंदन करीत म्हणाला.

"अनाथांचा वाली परमेश्वर!" बैरागी नम्रतापूर्वक निर्भयभावनेनें उद्गारला, "तुम्हां दोघांही मायलेंकरांच्या हृदयांत पश्चात्तापाचा उगम झालेला परमेश्वरानें ओळखून तुमच्या प्रमादाबद्दल तुम्हांला क्षमा करण्याचें ठरविलें आहे असें दिसतें. माते, तूं ज्या लोकांच्या हातीं सांपडलीस, ते सारे माझे शिष्यजन होते. म्हणून त्यांच्या हातून तुझी सुटका करतां आली. आतां मी तुमच्यासाठीं एवढेंच करीन. तुम्हांला महाराजांच्या पायांपावेतों सुरक्षितपणें पोंचवून तुम्हांला क्षमा करण्याबद्दल त्यांना उपदेश करीन. माझा शब्द महाराज मोडणार नाहींत असें मला वाटतें."

"गुरुदेव, आपलें कृपाछत्र ज्या जीवांच्या मस्तकीं रुळूं लागलें ते महाराजांच्याच काय पण कळीकाळाच्याही भयापासून मुक्त झाले." संभाजी कृतज्ञ वृत्तीनें म्हणाला.

"सच्चिदानंद! सच्चिदानंद! सच्चिदानंद!" बैरागी त्रिवार ईश्वर-

नामाचा पवित्र उच्चार करून कांहीं पळें मिटलेल्या नेत्रांनीं उभ्याउभ्याच ध्यानस्थ झाला व ध्यान पुरें झाल्यावर सर्वांना म्हणाला, "चला मंडळी आतां माझ्या मागोमाग चला."

रूपीला चालवेना म्हणून बैराग्याच्या सांगण्यावरून संभाजीनें तिला आपल्या पाठुंगळीला घेतलें व सर्व जण श्रीरंगाच्या देवालयाकडे निघाले.

## प्रकरण २८ वें
# श्रीरंगाच्या देवालयांत

बैरागी वगैरे मंडळीला श्रीरंगाच्या देवालयांत जाऊन पोंचावयाला जर घटका दोन घटकांचा अवधि लागला असता, तर खरोखरच मोठा अनर्थ गुदरला असता.

इकडे संभाजी व बैरागी यांची भेट झाली तेव्हांच तिकडे श्रीरंगाच्या देवालयाला अकस्मात् प्रतापसिंहमहाराजांच्या सैनिकांचा वेढा पडला. त्या वेळीं झुंझारराव आजूबाजूंच्या लोकांना देवालयांत एकत्र करून आपल्या देशासाठीं, धर्मासाठीं व राजासाठीं एकजुटीनें व तळहातांवर शिरें घेऊन लढण्याचा उपदेश करीत होता. झुंझाररावानें या वेळीं वेषांतर केलें होतें, तो बैरागी बनला होता. तथापि बैरागी बनण्यांतील त्याचा हेतु अर्थातच आपणाला कोणीं ओळखूं नये असा होता. परंतु त्याला सखोजी नाईकाच्या माणसांनीं ओळखलें व महाराजांपाशीं जाऊन तशी वर्दी दिली. त्यामुळें लगेच महाराज जातीनें झुंझाररावाचें पारिपत्य करण्यासाठीं तेथें उपस्थित झाले होते.

वस्तुतः झुंझाररावानें जर तेथून पळ काढावयाचें मनांत आणलें असतें तर त्याला तें सहज करतां आलें असतें. तो मूळचाच परोपकारी वृत्तीचा असून शिवाय भाविकांचें मन सहज आपणाकडे आकर्षिलें जावें असा साधुवेष त्यानें धारण केल्यानें तो ज्या ज्या लोकांना भेटावा, त्यांनीं त्यांनीं आदरभावानें त्याच्यासमोर मस्तक नम्र करावें. श्रीरंगाच्या देवालयांत पाऊल टाकल्यापासून नेहमीं त्याच्या सभोंवतीं हजारों भाविकांचा घोळका जमलेला असे व त्यांना प्रतापसिंहमहाराजांच्या वतीनें समरांगणांत उडी घेऊन मायदेशाच्या मंगलासाठीं जीवाभावाच्या मोबदल्यांत झटण्यापेक्षां तो दुसरा कोणताही उपदेश करीत नसे. इतका राजाच्या व राज्याच्या आबादीसाठीं झटणारा तो साधु आणि त्याला शासन करावयाला महाराज कसे उद्युक्त झाले हें झुंझाररावसभोंवारच्या लोकांना पडलेलें एक अवघड कोडें होतें. त्या लोकांनीं झुंझाररावाला सुखरूपपणें नगराबाहेर काढून देण्याचीदेखील इच्छा दर्शविली. परंतु झुंझाररावानें त्यांना नकार देऊन सांगितलें, "माझ्या

साठीं कोणीं कसलीही चिंता करण्याचें कारण नाहीं. मी जर सत्यधर्माला स्मरून वागत असेन, तर सक्रुद्दर्शनीं माझ्यावर जें अरिष्ट कोसळत आहेसें तुम्हांला वाटत आहे तो आपल्या राष्ट्राला व आपल्या धर्माला शुभशकून-साचा ठरेल."

तरी लोकांचें तेवढ्यानें समाधान होईना. त्यांच्या मनांतला झुंझाररावा-विषयींचा आदर मात्र त्यामुळें दुणावला. ते त्याला म्हणाले, "स्वामी-महाराज, महाराज जर आपणाला शासन करण्याचा हट्ट सोडीनासे झाले, तर आपल्या रक्षणासाठीं आम्हीं त्यांच्याशीं समर मांडावा काय?"

यावर झुंझाररावानें त्यांना उपदेश केला, "तुमची जर श्रीरंगाच्या ठायीं खरी निष्ठा असेल, माझ्याविषयीं तुम्हांला जर खरी कळकळ वाटत असेल, तर तुम्हीं माझ्या आज्ञेखेरीज महाराजांविरुद्ध करांगुलीदेखील उचलावयाची नाहीं. इतकेंच काय; पण मी कोणी नाहीं, मीही महाराजांच्या प्रजाजनां-पैकींच एक आहे. असें समजून तुम्हीं प्रसंगीं मला बाजूला सारून महाराजांशींच राजनिष्ठ राहिलें पाहिजे; त्यांच्या नेतृत्वाखालीं मायदेशाच्या मंगलासाठीं प्राणांतापावेतों मनोभावानें झटलें पाहिजे."

लोकांनींही झुंझाररावांची आज्ञा अक्षरशः पाळली. खुद्द प्रतापसिंह महाराजांनीं सैन्यासह येऊन श्रीरंगाच्या देवालयाला वेढा दिला, राजसैनि-कांनीं महाराजांच्या आज्ञेप्रमाणें, 'तुमच्या ढोंगी गुरूला आमच्या स्वाधीन करा' अशी आज्ञा केली, तरी ते हजारों लोक तिथें चित्रासारखे तटस्थ! लगेच झुंझाररावानें त्यांना आज्ञा केली, "तुम्ही सर्व बाजूला व्हा आणि राज-सैनिकांना मार्ग मोकळा करून द्या."

सर्व लोक दुःखातिशयानें बाजूला झाले. राजसैनिकांनीं देवालयांत शिरून झुंझाररावाला कैद केलें व प्रतापसिंहमहाराज देवालयाच्या प्रांगणांत थांबले होते त्यांच्यासमोर नेऊन उभें केलें. इतकें झालें तरीही झुंझाररावानें एक शब्दही मुखावाटें उच्चारला नाहीं, इतकेंच काय पण त्याच्या चर्येवरही राग-भय–तिरस्कार यांची ओझरतीदेखील छटा उमटली नाहीं. महाराजांना आश्चर्य वाटलें.

"झुंझारराव! तुम्हांला मी आतांपावेतों वडिलकीचा मान देत आलों, तुमचें कृपाछत्र आमच्या मस्तकावर आहे असा आमचा समज होता. परंतु

माझा सर्वनाश करण्याला तुम्हीच कारण आहां, असा आतां माझा सप्रमाण ग्रह झालेला आहे व त्या अपराधाबद्दल तुम्हांला देहान्तशासन मिळावयाचें आहे. त्यापूर्वी मी एकवार तुम्हांला तुमच्या वतीचा कांहीं खुलासा करावयाचा असेल तर तशी संधि द्यावयाला तयार आहें."

महाराजांच्या तोंडून 'झुंझारराव' ही हांक ऐकूं येतांच सभोंवारचे लोक विस्मयपूर्वक झुंझाररावाकडे टकमका पाहूं लागले. झुंझारराव हा महाराजांचा श्वशुर होय हें सर्वांना माहीत होतें. त्याच्यावर बैरागी होण्याची पाळी कां यावी हें कोणालाच कांहीं कळेना.

झुंझारराव वीरवृत्तीनें गंभीरपणानें उत्तरला, "महाराज, मी पूर्ण राजनिष्ठ आहें, व मीं आपला कोणताच अपराध केलेला नाहीं एवढेंच मी या प्रभु श्रीरंगाला स्मरून आपणांला सांगूं शकतों. यापेक्षां विस्तारानें मी हें रहस्य आपणाला उलगडून दाखवूं लागलों तरी आपलें मन पूर्वग्रहदूषित असल्यानें त्यावर आपला विश्वास बसणें या वेळीं तरी शक्य नाहीं."

"असलें मानभावीपणाचें उत्तर मला नको आहे. दगलबाज! मी विचारतों त्या प्रश्नाचें मला सरळ व स्पष्ट उत्तर दे! सांग, करुणा कुठें आहे? तो नीच विश्वासघातकी मानाजी कुठें आहे? त्या प्रासादिक तरवारी कुठें आहेत? माझ्याविरुद्ध कट करतां काय?" महाराज हातांतील तरवार म्यानाबाहेर काढीत गर्जूं लागले, "हरामखोरा! आजारीपणाचें खोटें निमित्त करून तूंच करुणेला पळवून नेली असली पाहिजेस."

तरवारी नाहींशा झाल्याचा विषय झुंझाररावाला अगदीं नवीन होता. त्यानें सरळ भावनेनें म्हटलें, "महाराज तरवारींविषयीं काय बोलत आहेत तें मला नीटसें समजलें नाहीं."

"विश्वासघातकी दगलबाज! एवढा गोंधळ करून सवरून पुन्हां कानांवर हात ठेवतोस काय?" महाराजांनीं आवेशानें तरवार उगारली व आतां झुंझाररावाच्या मानेवर तो घाव पडणार तोंच त्या गर्दीतून कोणाचासा स्वर ऐकूं आला, "हां! हां! राजा, असा अविचार करूं नकोस; निष्ठावंत स्वजनांचा संहार करून आत्मनाश जोडूं नकोस."

सर्व लोक एकदम दचकून मागें वळून पाहूं लागले. महाराज हात आवरता घेऊन तिकडे वळले. झुंझारराव मात्र आतां आपला अवतार संपला अशा

भावनेनें दृष्टि मिटून अखेरचें ईश्वरचिंतन करीत होता. तोंच त्या गर्दींतून वाचकांचा पूर्वपरिचित सच्चिदानन्द बैरागी धांवत आला व त्यानें महाराजांचा हात धरून प्रथम हातांतील तरवार काढून घेऊन मग म्हटलें, " राजा, रागावूं नकोस. परंतु तुला स्वजनांचीदेखील इतकी पारख नसावी, याचें मला आश्चर्य वाटतें. अरे, ज्यांना अष्टोप्रहर आपल्या प्रभूचें –राजा, तुझें कल्याण कसें होईल याखेरीज अन्य चिंता नाहीं, तुझ्या कल्याणसाधनापुढें ज्यांना स्वतःच्या जीवनाचीदेखील लवमात्र पर्वा वाटत नाहीं, त्यांच्याविषयीं अशी भलतीच शंका घेणाऱ्या तुझी मला कींवच करावीशी वाटते."

वास्तविक सच्चिदानन्दस्वामीची व महाराजांची ओळखदेख देखील नव्हती. परंतु त्याची निस्पृह वृत्ति, त्याच्या चर्येवर झळकणारें तपश्चर्येचें तेज व त्याच्या वाणींतील अधिकार यांमुळें महाराजांवर तेव्हांच त्याची छाप पडली. लोकांना तर काय, महाराजांनीं इतकें कठोर भाषण शांतपणानें ऐकून घेतलें ही एकच गोष्ट स्वामीचा मोठेपणा त्यांच्या मनांना पटण्याला पुरेशी होती.

" स्वामीजी मला आपला परिचय करून देतील काय ? " महाराजांनीं विनयपूर्वक प्रश्न केला. तोंच संभाजी, त्याच्या मागोमाग रूपी आणि तिचा पुत्र–महाराजांचा प्रतिस्पर्धी तोतया राजपुत्र शहाजी हीं तिघेंही तेथें येऊन सच्चिदानन्दापाशीं उभीं राहिलीं. त्यांना पाहातांच तर महाराजांना विचार पडला, हें गूढ आहे तरी काय ?

" माझी ओळख तुला पाहिजे ? राजा, हा तुझा इतक्या दिवसांचा विरोधी शहाजी पहा. ही त्याची आई पहा ! –हें सारें काहूर तुझ्याविरुद्ध ज्यांनीं उठविलें होतें, तींच चांडाळ माणसें तुझ्या निरपराधी राणीच्या नाशाला जबाबदार असून तुला कुलदैवताप्रमाणें वंद्य असणाऱ्या त्या दोन प्रासादिक तरवारींचें अपहरणही त्यांनींच केलें आहे. इतकेंच काय, पण त्यांनीं–विशेषतः त्या पाताळयंत्री अपरूपाराणीनें मायावीपणानें तुला फंसविलें आणि तूंही फंसलास. म्हणूनच या झुंझाररावासारख्या उपकारकर्त्याला ठार करावयाला तूं तयार झालास. या तुझ्या सर्व चुकांचें परिमार्जन होऊन तुझ्यासह सर्वांचें मंगल व्हावें यासाठीं मनोभावानें झटणारा मी एक ईश्वराचा सेवक आहें. तुझ्यावरील संकटांचें निवारण करतां करतां हे दोन बिचारे निरपराधी जीव हातीं लागले, त्यांना तुझ्या पायांवर घालण्यासाठीं मी घेऊन आलों आहें."

"पण करुणाराणी सध्यां कुठें आहे?" महाराजांनीं प्रश्न केला.

"तो सर्व वृत्तांत मी तुला सांगेन. परंतु प्रथम तूं या झुंझाररावाची क्षमा मागून त्याला अभय दे. त्याप्रमाणेंच ही रूपी आणि हा तुझा प्रतिस्पर्धी— यांना अभय दिलें असें वचन मला दे."

"आपल्या आदेशाप्रमाणें मी झुंझाररावांना अभय देतों. परंतु या दोघांना विचार केल्याखेरीज अभय देणें योग्य नाहीं."

"अरे, मीं तो सर्व विचार केला आहे. यांची काय मातब्बरी घेऊन बसलास? यांचे बोलविते धनी—ते अस्तनींतील निखारे निराळेच होते. ती अपरूपाराणी व कोयाजी घाटगे अशी दुक्कल त्यांच्या कर्मांनीं ठार झाली."

"काय! आईसाहेब ठार झाल्या?"

"होय."

"त्यांना कोणीं ठार केलें?"

"त्या इथें चव्हाटचावर बोलण्यासारख्या गोष्टी नाहींत. तें सर्व वृत्त मी तुला सप्रमाण कथन करणार आहें. पण त्यापूर्वी तूं या मायलेंकरांना अभय दिलें पाहिजेस. कारण मीं त्यांना तसें वचन दिलें आहे. एवढा माझ्यावर तुझा भरंवसा नाहीं काय?"

महाराजांना सच्चिदानंदाची ओळख नसल्यामुळें महाराज कां कूं करीत आहेत असें पहातांच संभाजी पुढें होऊन अभिवादनपूर्वक महाराजांना म्हणाला, "महाराज, स्वामीजी सांगतात ती प्रत्येक गोष्ट खरी आहे. आपलें भाग्य थोर, म्हणून स्वामीजींची कृपादृष्टि आपणाकडे वळली आहे. यांच्याखेरीज राणीसाहेबांचें रक्षण होणें दुरापास्त होतें व मी—मी पायरी सोडून बोलतों याबद्दल महाराजांनीं मला क्षमा करावी, परंतु राणीसाहेबांचा सर्वतोपरी नाश करण्याचें—आणि तें कांचनगडच्या किल्लेदार मीरकासीम यासारख्या नरपशु अविंधाच्या हातून—अपरूपाआईसाहेब व कोयाजी यांनीं योजिलें, त्यांना देहान्तशासन परमेश्वरानें दिलें तोही न्याय अगदीं यथायोग्य झाला असेंच आपणाला आपण सर्व वृत्तांत ऐकाल तेव्हां वाटेल."

"असें हें सारें कारस्थान होतें एकूण!" महाराज एक सुस्कारा सोडून कांहीं क्षण स्तब्ध राहिले. रूपी व शहाजी या मायलेंकरांना सच्चिदानंदानें तेवढयांत हळूच सूचना केली, "महाराजांचे पाय धरून त्यांची क्षमा मागा."

त्या मायलेकरांनीं महाराजांचे पाय धरून क्षमा मागितली.

"जा ! तुम्हांला झाल्या अपराधांची क्षमा करण्यांत येत आहे." महाराज म्हणाले, "तुम्हांला याउप्पर कोठेंही जाण्याला पूर्ण मोकळीक आहे. मात्र पुन्हां जर असल्या फंदांत पडाल, तर याद राखून ठेवा !"

"नाहीं. अशी चूक पुन्हां माझ्या मुलाच्या हातून कधींच होणार नाहीं. महाराज, मी आपल्या पायांना स्मरून सांगत्यें, आम्हांला यापुढें आपले पाय सोडून अन्यत्र कोठेंच जावयाचें नाहीं. मी आपली बटीक, व बटीक या नात्यानें आपल्या आश्रयाला राहणार. हा माझा मुलगाही आपला विश्वासू सेवक या नात्यानें आपण आपल्या सेवेंत रुजू करून घ्यावा."

शहाजीनेंही महाराजांना तशीच विनंति केली. महाराजांनीं ती मान्य केली ; व तोतया राजाच्या प्रकरणाचा एकदांचा असा समाधानकारक शेवट झाला. तेथील मंडळीला मात्र एके काळीं राजा झालेला हा शहाजी पुन्हां राजाचा हुजऱ्या बनून पूर्वपदावर कसा आला याचें आश्चर्य वाटलें. अपरूपाराणीनें शहाजीला आपला पुत्र म्हणून गादीवर बसविण्यासाठीं केलेली अपूर्व खटपट ज्यांना माहीत, असे बरेच लोक जे तेथें होते, त्यांनीं शहाजीप्रकरणाची ही अखेर पाहून अपरूपाराणीच्या उपद्व्यापाबद्दल तोंडांत बोटें घातलीं.

हें एक प्रकरण असें शेवटल्यावर झुंझारराव, सच्चिदानन्द व संभाजी यांसह महाराज आपल्या निवासस्थानीं गेले. आतां काय होतें व काय नाहीं इकडे सर्वांचे डोळे लागून राहिले. तों दोन प्रहरांनीं झुंझारराव—नव्हे, तो श्रीरंगाच्या देवालयांतील बैरागी सेनापतीचीं वस्त्रें धारण करून इतमामानें श्रीरंगाच्या देवालयापाशीं यावयाला निघाला. त्याच्यापूर्वींच झुंझाररावाला महाराजांनीं सेनापति नेमल्याचें शुभ वृत्त नौबत झडवून सर्वांना जाहीर करण्यांत आलें होतें. हा कोणत्या दिलजमाईचा परिणाम हें मात्र लोकांना स्पष्टसें कळलें नाहीं व लोकांनींही ती फारशी चौकशी केली नाहीं. तथापि झुंझाररावाच्या मर्जीला व विश्वासाला पात्र झालेल्या ज्या कांहीं लोकांना करुणाराणी व मानाजी यांच्यावर महाराजांचा झालेला रोष माहीत होता, त्यांनीं झुंझाररावापाशीं त्याविषयीं विचारणा केली. त्यावर झुंझारराव एवढेंच मोघम उत्तरला, "करुणाराणीच्या ललाटीं काय लिहिलेलें आहे

कोण जाणे! परमेश्वराची मर्जी काय असेल ती खरी!"

झुंझाररावाच्या त्या उद्‍गारांत पुष्कळच सत्यार्थ सांठलेला होता. स्वतः त्यानें व सच्चिदानन्दानेंही महाराजांना अपरूपा राणी व कोयाजी यांची फितुरी सहज पटवून दिली. परंतु करुणाराणी माहेरीं म्हणून निघून गेली तेव्हांच त्या प्रासादिक तरवारी नाहींशा झाल्या होत्या व तें करुणाराणीचेंच कृत्य असावें असा महाराजांचा समज झाला होता. तो समज झुंझारराव, सच्चिदानन्द व संभाजी या तिघांच्यानेंही दूर केला गेला नाहीं. उलट मानाजी व करुणा यांचा जिव्हाळ्याचा संबंध त्या घटकेपावेतों असलेला महाराजांना नव्यानें माहीत झाला, व त्या दोघांच्या दुर्वर्तनाविषयींच्या संशयानें त्यांच्या मनांत पूर्वीपेक्षांही खोल मूळ धरलें.

झुंझारराव एवढा प्रेमळ व करुणाराणीचा धर्मपिता ना! पण त्यालादेखील राणीच्या पवित्र वर्तनाची खात्री देववेना, पण तिला नांवही ठेववेना. तरी पण त्यानें महाराजांपाशीं त्या विषयाबावत स्पष्ट बोलून दाखविलें होतें, "प्रत्यक्ष करुणा भेटेपावेतों आम्हीं तिच्याविषयीं कोणताच ठाम समज करून घेणें धोक्याचें होईल. ती भेटली व त्या तरवारींचा तपास लागला, म्हणजे काय ठरेल तें खरें."

तथापि करुणाराणीची ती बाब महाराजांच्या एकट्यापुरती होती. ती बाब चंदासाहेबासारख्या परशत्रूपासून स्वदेशाचें व स्वधर्माचें रक्षण करतांना आड येऊं द्यावयाची नाहीं, असें महाराज व झुंझारराव यांनीं आपसांत ठरविलें होतें. त्याप्रमाणें झुंझारराव सेनापति या नात्यानें शत्रूशीं सामना देण्याच्या तयारीला लागला व त्याच कार्यप्रीत्यर्थ सच्चिदानन्द स्वामी महाराज आणि झुंझारराव यांच्या अनुमतीनें बाहेर पडला. त्यानें संभाजीला मात्र मुद्दाम आपणाबरोबर घेतलें. कारण करुणाराणी वगैरे मंडळींचा जवळचा व माहीतगार असा माणूस कोणी तरी त्याला आपणाबरोबर पाहिजेच होता.

# प्रकरण २९ वें
# निहालसिंगाचें चातुर्य

रतनसिंग व रामस्वामि अपरूपा राणीच्या साहाय्यार्थ निघून गेल्यानंतर लवकरच मुरारराव घोरपडे त्रिचनापल्लीला येण्यासाठीं निघाल्याची वार्ता चंदासाहेबाच्या वार्ताहरांनीं आणली व मुराररावांचा स्वमुद्रांकित खलिता ही येऊन थडकला. आतां मुराररावांना सांपळयांत कसें पकडावें याची कडेकोट तयारी चंदासाहेबानें चालविली असतांना अपरूपाराणीच्या वतीनें निहालसिंग या नांवाचा तरुण मराठा सरदार चंदासाहेबापाशीं आला व त्यानें अपरूपाराणीचा खलिता चंदासाहेबाच्या हातीं आणून दिला. " मराठ्यांनीं समरांगणावर प्रतिपक्षाला तोंड देण्यासाठीं चांगलेच चंग बांधले आहेत, त्यांची तंजावरला प्रतापसिंहमहाराजांना कुमक करण्याचीही जय्यत तयारी झाली आहे. मुरारराव घोरपडे देखील जरी मित्रभावानें त्रिचनापल्लीवर चालून आले तरी त्यांच्याशीं देखील परिणामीं चांगलीच झुंज खेळावी लागेल व त्या कामींही रघूजी भोंसले त्यांचा पाठपुरावा करावयाला चुकणार नाहीं. पूर्वी अर्धवट राहिलेली दक्षिणेंतील मोहीम या वेळीं पुरी करावयाची व पूर्ण वियश्री संपादन करून भगवा झेंडा त्रिचनापल्लीवर रोंवून माघारें जावयाचें असा मराठ्यांचा निर्धार आहे. अशा या दारुण परचक्रांतून पार पडावयाचें तर आपणाला अर्काटचे नबाब आपले सगेसोयरे आहेत त्यांचें साहाय्य घेतल्याखेरीज गत्यंतर नाहीं. यास्तव आपण अर्काटचा नबाब आपला मेहुणा सफदर अल्ली आणि त्याचा दिवाण मीर असद यांना विनंतिपत्रें पाठवून दारुगोळा व थोडेंसें तरी सैन्य यांची कुमक करण्याला लिहावें. या बावतींत हा खलिता घेऊन येणारा आमचा विश्वासू सरदार निहालसिंग आपणाशीं अधिक वाटाघाटी करील."

खलिता वाचून झाल्यावर चंदासाहेबानें निहालसिंगाला विचारिलें कीं, " अपरूपा राणीसाहेब व कोयाजीराव यांच्या साहाय्यार्थ मीं रतनसिंग या नांवाच्या विश्वासू सरदाराला रवाना केलें आहेच. तूं इकडे यावयाला निघालास तेव्हां तुझी आणि त्याची गांठ पडली नाहीं काय ? "

निहालसिंग क्षणभर घोंटाळून म्हणाला, "नाहीं. त्याची व माझी गांठ पडली नाहीं."

"राणीसाहेबांच्या संदेशावरूनच त्याला मीं तिकडे रवाना केलें आहे."

"राणीसाहेबांनीं तशी कुमक आपणांकडे मागितल्याचें मला माहीत आहे. परंतु मला राणीसाहेबांना भेटून आठदहा दिवस तरी लोटले असतील. दरम्यान इतर महत्त्वाचीं कामें होतीं तीं करीत मी आलों."

"मग त्याच वेळीं राणीसाहेबांनीं ही सूचना कां केली नाहीं? म्हणजे आतां आम्ही तजवीज करणार ती यापूर्वींच करतां आली असती."

"आपण जाणतांच कीं हीं अत्यंत महत्त्वाचीं गुप्त राजकारस्थानें तितक्याच जबाबदारीनें व गुप्तपणें पार पाडावयाचीं असतात. राणीसाहेबांना मामुली मदतीची आवश्यकता भासली असेल व तेवढ्यापुरती ती मागणी त्यांनीं आपणापाशीं केली असेल. मानाजीराव, करुणाराणी व झुंझारराव वगैरे घरचे शत्रू सभोंवतीं घिरट्या घालीत आहेतच. त्यांच्या बंदोबस्तासाठीं कुमक मागविली पाहिजे असें राणीसाहेब आणि कोयाजीरावही म्हणत होते खरे."

याप्रमाणें परस्पर खुलासा झाल्यावर चंदासाहेबानें विशेष चिकित्सा न करितां अर्काटच्या नबाबाला मित्रत्वाचा खलिता लिहून तो आणि दुसरा एक खलिता अपरूपाराणीला असे दोन खलिते मोहनसिंगासमक्ष आपल्या एका विश्वासू जासुदाच्या स्वाधीन केले. निहालसिंगाला संशय येऊं नये व विषाद वाटूं नये यास्तव खलिता हातावेगळा करतांना तो म्हणाला, "राणीसाहेबांना व नबाबाला अविश्वास वाटूं नये यास्तव मी हें काम मुद्दाम माझ्या मनुष्याला सांगत आहें. त्याबद्दल तुला विषाद वाटण्याचें कांहींच कारण नाहीं."

"छे! छे! मला त्यांत विषाद कशाला वाटायला हवा सरकार? उलट आपण जर हे खलिते माझ्या हातीं दिले असते तर मींच आपणाला अशी कांहीं अन्य व्यवस्था करावयाला सुचविलें असतें. कारण मला दरम्यान आणखी कांहीं महत्त्वाचीं कामें करावयाला राणीसाहेबांनीं सांगितलें आहे. तीं आटोपून माघारा जाण्याला मला बराच वेळ लागेल." निहालसिंगानें तो प्रसंग शोभवून नेला. तो वर असेंही म्हणाला, "आतां मला निरोप घेण्याला सरकारांची परवानगी आहे काय?"

"आमच्या मनुष्याला राणीसाहेबांचा नक्की पत्ता कोण दाखविणार?"

"हो. तेंही खरेंच. मग मी असें करतों. माझा विश्वासू सेवक किल्ल्याबाहेर चार कोसांवर थांबला आहे, त्याला मी या जासुदाबरोबर देईन व मग माझ्या कामाला जाईन."

चंदासाहेबाला ती योजना मान्य झाली.

त्याच दिवशीं सायंकाळीं निहालसिंग व तो जासूद असे दोघेजण त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांतून बाहेर पडले. तोंच त्यांना खबर मिळाली कीं रतनसिंग करुणाराणीकडून माघारा येत आहे. तेव्हां साहजिकपणेंच निहालसिंगानें एकवार रतनसिंगाला भेटण्याचें ठरवून व बरोबरच्या जासुदाला सोवतही द्यावयाची होती त्यासाठीं रात्रभर एका खेड्यांत मुक्काम करावयाचें ठरविलें. निहालसिंगाचा नोकर तिथें नव्हता. तेथें आपला नोकर थांबला आहे असें निहालसिंगाला सांगितलें होतें तो कुठें आहे असें जोडीदारानें त्याला विचारतांच निहालसिंग जरा आजूबाजूला पाहून आला व नोकर कोठें बाहेर कामाला अगर सहल करावयाला गेला असेल असें म्हणाला.

त्या रात्रौ दोघांनींही जेवणाऐवजीं दूधच घ्यावयाचें ठरविलें व जोडीदाराला तेथेंच त्या धर्मशाळेंत थांबावयाला सांगून दूध आणण्यासाठीं स्वत: गांवांत गेला. त्यासाठीं त्याला कांहीं फार दूर जावें लागलें नाहीं. तेथून जवळच धनगरांची वस्ती होती. तेथें जाऊन त्यानें शेळीचें दूध दोन शेर मिळविलें. आपल्या मकाणाला माघारा येतांच निहालसिंगानें धर्मशाळेंतील दुसऱ्या एका भिकाऱ्याच्या चुलीवर तें तापविलें. तेवढ्यांत त्याचा जोडीदार धर्मशाळेच्या आवारांत विहीर होती तिच्यावरून हातपाय वगैरे धुवून आला. तों निहालसिंगानें तें दूध निरनिराळ्या दोन भांड्यांत ओतून तयार ठेविलें होतें. जोडीदार येतांच त्यांतलें एक भांडें उचलून निहालसिंग तोंडाला लावीत म्हणाला, "दूध फारच नामी आहे."

त्या जोडीदारानेंही दूध पितां पितां त्याची फार वाखाणणी केली.

दूध पिऊन झाल्यावर गप्पागोष्टी करतां करतां सुमारे अर्धीपाव घटका निघून गेली. निहालसिंगाचा जोडीदार पेंगूं लागला. निहालसिंग त्याला म्हणाला, "तुला इतक्या लवकर झोंप येते?"

"होय." जोडीदार पेंगतच उत्तरला.

आणखी अंमळशानें तर जोडीदाराला चांगलीच झोंप लागली. ती झोंप कांहीं साधी नव्हती. ती काळझोंप होती. निहालसिंगानें त्याला दुधांतून जलाल विष पाजलें होतें.

जोडीदार पूर्ण झोंपीं गेला आहे, तो आतां कधींही जागा होणें शक्य नाहीं असें नीट पाहून तशी खात्री झाल्यावर निहालसिंगानें प्रथम त्या जोडीदाराजवळचे दोन्ही खलिते आपल्या ताब्यांत घेतले व तेथून बाहेर पडतां पडतां तेथें एक भिकारी होता त्याला तोंडदेखलें सांगितलें, " मी जरा गांवांत कांहीं जरूरीचें काम आहे तेवढें करून येतों. तोंवर इकडे अंमळ नजर ठेव. माझा मित्र जागा झाला तर त्याला सांग. "

भिकारी बरें म्हणाला व निहालसिंग तेथून बाहेर गेला. दोघांचे दोन घोडे बाहेर एका झाडाच्या बुंध्याशीं बांधून ठेवलेले होते त्यांतल्या एकावर स्वार होऊन तो तेथून निघून गेला. तो अर्थात् माघारा येण्याच्या बेतानें निघून गेला नव्हताच.

बाहेर चांदणें शुभ्र दुधासारखें पडलें होतें. वाराही झुळझुळ वहात होता. त्या तशा आनंददायक वातावरणांत निहालसिंग राजमार्गानें भरधांव घोडा फेंकीत चालला होता. त्रिचनापल्लीहून निघाल्यापासून त्यानें रतनसिंगाची कसून चौकशी चालविली होती व तेवढ्या टापूंत कोठें तरी रतनसिंगाचा तळ पडला असावा असा नक्की सुगावा त्याला लागला होता. त्याचा शोध करून त्याला तावडतोब भेटावयाचें असा निहालसिंगाचा मानस होता. वाटेंत जो कोणी भेटेल त्याच्यापाशीं त्यानें चौकशी करावी. असें करतां करतां त्याच मार्गानें समोरून कांहीं घोडेस्वार दौडत येतांना त्याला दिसले. त्यांना पाहून चौकशी करण्यासाठीं निहालसिंगानें आपला घोडा थांबविला व समोरून येणाऱ्या घोडेस्वारांपैकीं एकाला विचारिलें, " हें त्रिचनापल्लीच्या रतनसिंग सरदाराचें सैन्य काय ? "

त्या घोडेस्वारानें सरळ उत्तर देण्याचें टाळून विचारिलें, " तूं कोण ? कोठून आलास ? "

निहालसिंगानें उत्तर दिलें, " मी त्रिचनापल्लीहून आलों. हे रतनसिंगाचे लोक असतील तर मला रतनसिंगाची कांहीं जरूरीच्या कामासाठीं भेट घ्यावयाची आहे."

तोंच एक निमम्हातारा पण रुबाबदार असा घोडेस्वार पुढें आला व निहालसिंगाला म्हणाला, " तूं कोण ? "

" मी निहालसिंग. मी त्रिचनापल्लीहून आलों. तुमचेंच नांव रतनसिंग काय ? "

" होय. " रतनसिंग उत्तरला. चांदण्याच्या प्रकाशांत दोघे एकमेकांकडे न्याहाळून पहात होते. त्याप्रमाणें थोडा वेळ रतनसिंगाच्या चर्येचें सूक्ष्म निरीक्षण केल्यावर निहालसिंग त्याला म्हणाला, " तुम्ही जरा बाजूला याल काय ? ".

" हो ! न यायला काय झालें ? " असें म्हणत रतनसिंग घोड्यावरून खालीं उतरला व म्यानांतील तरवार मोकळी हातीं घेऊन निहालसिंगामागोमाग चालू लागला. निहालसिंगानें रतनसिंगाचा तो सावधपणा पाहून हंसत हंसत त्याला म्हटलें, " तरवारीचा उपयोग करण्याची पाळी तुमच्यावर बहुधा येणार नाहीं. " निहालसिंग सैनिकांपासून जरा दूर गेल्यावर रतनसिंगाला म्हणाला, " तुम्ही खरे हिंदु आहां. आणि त्याच नात्यानें चंदासाहेबासारख्या सैतानी अविंधाच्या जाचांतून कर्नाटकाला सोडविण्यासाठीं तुम्ही प्रयत्न करीत आहां असें माझ्या कानीं आलें आहे. त्यावर मीं विश्वास ठेवावा काय ? "

" परंतु या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वीं मीं तुझा विश्वास काय धरावा ? तूं कोणत्या पक्षाचा आहेस व कोणत्या हेतूनें मला हें विचारीत आहेस हें मीं कसें ओळखावें ? " रतनसिंगानें प्रश्न केला.

" तुमच्या या सावधपणाच्या प्रश्नाबद्दल मला राग मुळींच आलेला नाहीं. उलट याबद्दल मी तुम्हांला धन्यवादच देतों. कारण प्रामाणिकपणें वागण्याची आजकालच्या राजवटींत मुळींच सोय उरलेली नाहीं. दाखवावयाचे दांत निराळे आणि खावयाचे दांत निराळे, अशी दुटप्पी वागणूक ठेवल्याखेरीज तुम्हां आम्हां हिंदूंना आजला अविंधमय झालेल्या कर्नाटकांत तरणोपायच नाहींसा झाला आहे. पण आपण मुद्यावर येऊन बोलूं. मी हिंदू आहें व स्वाभिमानाचा नंदादीप माझ्या अंतःकरणांत सदैव तेवत आहे, याविषयीं तुमची खात्री झालीच असेल. त्याबरोबरच मी चंदासाहेबाच्या विश्वासाला पात्र आहें याचा पुरावा तुम्हांला पाहिजे असेल तर हा पहा. "

निहालसिंगानें ते दोन खलिते आपल्या कमरपट्ट्यांतून काढून रतनसिंगाला दाखविले व म्हटलें, " यांतला एक खलिता अर्काटच्या नबाबाला द्यावयाचा आहे, व दुसरा आपल्या राणीला. "

" अपरूपाराणीला ? ती तर केव्हांच आपल्या पातकी साथीदारासह—कोयाजी घाटग्यासह इहलोक सोडून गेली. "

" ही फार आनंदाची बातमी तुम्हीं मला सांगितली. त्यामुळें आपला कार्यभाग आतां पूर्वीच्यापेक्षां पुष्कळच सोपा झाला आहे. पण—मीं तुमच्याशीं विश्वासानें बोलावें ना ? "

" बोल. खुशाल बोल. पण अगोदर मला सांग, तूं कोण ? "

" मी निहालसिंग. मी एक प्रतापसिंहमहाराजांचा पिढीजाद स्वामिनिष्ठ सेवक आहें. "

" प्रतापसिंहमहाराजांचा जयजयकार असो. आमचे सारे प्रयत्न तरी त्यांनाच विजयश्रीनें वरावें व ही आमची मायभूमि त्यांच्या स्वामित्वाखालीं परदास्यांतून मुक्त व्हावी यासाठीं चालले आहेत. "

"आनंदाची गोष्ट आहे. मला तुमच्या ह्या पवित्र हेतूची ओळख पूर्वीच झाली होती म्हणूनच मी मुद्दाम तुमची भेट घेण्यासाठीं वाट पहात होतों. माझें नीट ऐकून घ्या. हिंदु आणि मुसलमान यांच्यांतील हा प्रस्तुतचा एकला झगडा सामोपचारांनीं मिटणें मुळींच शक्य नाहीं. या झगड्यांत सातारकर मराठे जसे प्रतापसिंहमहाराजांच्या वतीनें धांवून आले, तसाच अर्काटचा नबाब चंदासाहेबाच्या बाजूनें ऐन वेळीं धांवून येणार आहे. यासाठीं आपण प्रथमपासूनच या गिधाडांचे पंख कापले पाहिजेत. खरें ना ? "

" अगदीं खरें. "

"या बाबतींत मला काय करावयाचें तें मी करणार आहें. परंतु आतां तुम्हीं एवढेंच करावयाचें, अपरूपाराणी आणि कोयाजी घाटगे हीं चंदासाहेबापुरतीं आणखी कांहीं काळ तरी जिवंत ठेवावयाचीं. त्यांच्या मृत्यूची वार्ता त्याला मुळींच कळूं द्यावयाची नाहीं. एवढें तुम्हीं केलें म्हणजे अर्काटच्या नबाबाची दाणादाण कशी उडवावयाची याची व्यवस्था मी पाहतों. दुसरी एक गोष्ट मी तुम्हांला सुचवावयाची म्हणजे मुरारराव घोरपडे त्रिचनापल्लीवर चाल करून येणार आहेत. "

"ते त्रिचनापल्लीला मीनाक्षीराणीच्या विनवणीवरून तिच्या साह्यार्थ येणार आहेत."

"खरें. पण मी तुमच्याशीं खाजगी आपुलकीच्या नात्यानें बोलत आहें. मीनाक्षीराणी हा लोक सोडून गेली हें तुम्हांला माहीत आहे काय ?"

"होय."

"असो. तेंही आपण चंदासाहेबाशीं बोलतांना विसरून जावयाचें व चंदासाहेबी भाषेंत बोलावयाचें म्हणजे मुरारराव येतांना त्याला किल्ल्यांत घेऊन त्याचा कोंडमारा करावयाचा."

"म्हणजे ?"

"चंदासाहेबाचा डाव तसा आहे, व मीनाक्षी राणीकडून त्यानें गफलतीनें मुराररावांच्या नांवानें लिहून घेतलेल्या पत्राचा आशयही तोच आहे. मुराररावांना चंदासाहेबाचा हा दुष्ट कावा कळून चुकला आहे. ते येतील ते अर्थात् समराच्या तयारीनेंच येतील, व किल्ल्यांत प्रविष्ट होतांच त्या नीचाचा योग्य तो समाचार घेतील. तुम्ही आतां माघारे त्रिचनापल्लीला चाललां आहां, त्या तुम्हांला ऐन वेळीं मुराररावाविरुद्ध लढण्याची कामगिरी चंदासाहेब सांगेल. ती कामगिरी कशी पार पाडावयाची हें नीट ध्यानीं घेऊन तुम्हीं वागावें म्हणजे झालें. तुमचा समर इकडे ऐन रंगांत येतो आहे, तोंच मी तुम्हाला अर्काटच्या नबाबाविषयींची व तंजावरकडची महत्त्वाची बातमी काय असेल ती कळविण्याला स्वतःच येईन. मात्र एवढें ध्यानीं ठेवा, या गनिमी काव्याच्या लढाईंत निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या बातम्या विपरीत स्वरूपांत कानीं आल्या तरी घाबरूं नका, व गैरसमजाला बळी पडूं नका. बस्स ! झालें माझें काम. आतां मी तुमचा निरोप घेतों. पण एक सांगावयाचें राहिलें. माझी आणि तुमची भेट मुळीं झालीच नाहीं असें सांगावयाचें व अपरूपाराणी आणि कोयाजी यांना जिवंत ठेवावयाला विसरावयाचें नाहीं."

"तें सर्व ठीक आहे. परंतु अर्काटच्या नबाबाच्या बाबतींत तुझें कृत्रिम मात्र फलदायी होणार नाहीं."

"कां बरें ?"

"नबाब चंदासाहेबाच्या बाजूनें मराठ्यांविरुद्ध शस्त्र उचलील हें शक्यच

नाहीं. कारण एक तर दमलचेरीच्या घाटांतील युद्धांत मराठ्यांनीं नबाबाचा पुरा मोड करून नबाब दोस्तअल्लीला ठारही मारलें, व तेव्हांपासून त्याचा मुलगा सफदरअल्ली जरी नबाब म्हणून मिरवीत आहे, तरी खरी सत्ता अशी त्याच्या हातीं मुळींच नाहीं. बरें, चंदासाहेबाचें व सफदरअल्लीचेंही नीट नाहीं. बाहेरून ते गोडीनें वागतात, परंतु अंतरंगें निराळीं आहेत. नबाबाचा पुरा मोड होऊन अर्काटचें राज्यदेखील आपल्या घशांत पडावें अशी चंदासाहेबाची इच्छा आहे, व सफदरअल्ली आणि त्याचा दिवाण मीर असद तो कावा ओळखून आहेत. तेव्हां नबाबाकडून चंदासाहेबाला साहाय्य होणें बाजूलाच राहून उलट मराठ्यांनाच नबाबाचें साहाय्य होईल, अशीं लक्षणें स्पष्ट दिसत आहेत. नुकतेंच मला खात्रीलायक असें कळलें कीं सफदरअल्ली मराठ्यांशीं तह करण्याच्या खटपटींत असून इतक्यांतच तो तह होईलही. मग नबाब अर्थातच चंदासाहेबाविरुद्ध मराठ्यांना कुमक करील."

"ही फार आनंदाची गोष्ट आहे. हें मला माहीत नव्हतें."

"म्हणूनच मीं सांगितलें. नाहीं तर तूं चंदासाहेबाचा माणूस म्हणून तिथें जावयाचा व तुझा जीव तिथें धोक्यांत पडावयाचा."

"तें खरें. परंतु तरीही मी या खलित्याचा चंदासाहेबाच्या नाशाकडे उपयोग केल्याखेरीज राहणार नाहीं."

"तो कसा काय ?"

"तें मी आधीं सांगत नाहीं. योग्य वेळीं तुम्हांला कळेलच. तूर्त समाधानाची गोष्ट एवढीच कीं नबाब ज्या अर्थीं तंजावरविरुद्ध उठावणी करावयाला तयार नाहीं, त्या अर्थीं तंजावर ही रणभूमि होणार नाहीं."

"तें अगदीं निर्विवाद आहे. तें ध्यानीं घेऊन त्रिचनापल्लींतल्या त्रिचनापल्लींतच चंदासाहेबाचा जो काय कोंडमारा करतां येईल, तो करण्यासाठीं सर्वांनीं झटलें पाहिजे. मीं रघूजी भोंसल्यांना या बाबतींत माहीतगारीच्या सूचना काय करावयाच्या त्या जासूद पाठवून केल्याच आहेत. ही वेळ अशी आणीबाणीची आहे कीं आसमंतात् सारे हिंदू राजेरजवाडे व सरदार पाळेगार या लढ्याच्या परिणामाकडे डोळे लावून आहेत. मराठ्यांच्या हातून चंदासाहेबाचा कायमचा नाश व्हावा व त्या अविंधाधमाच्या जाचांतून आपण मुक्त व्हावें, असें सर्वांनाच वाटतें आहे. त्यासाठीं ते मराठ्यांना साहाय्य करण्या-

लाही कमी करणार नाहींत. मात्र त्यांना भेटून त्यांचें साहाय्य मिळविलें पाहिजे. हें कार्य मला उघड उघड करतां येणार नाहीं. पण तें होणें अवश्य आहे, म्हणून सहज तुला मीं सूचना केली इतकेंच. तूं प्रतापसिंह महाराजांना सांगून अशी कांहींतरी युक्ति लढवावयाला सांग."

"बरें आहे. अपण मला इतकी माहिती दिली याबद्दल मी आपला फार आभारी आहें. तिचा योग्य उपयोग झाल्याचें आपणाला योग्य वेळीं कळून येईलच." एवढें सांगून निहालसिंगानें रतनसिंगाचा निरोप घेतला.

# प्रकरण ३० वें

# अखेरीपूर्वीच्या घडामोडी

आणखी सुमारें पन्धरा दिवसपावेतों चंदासाहेब व त्याचे प्रतिस्पर्धी मराठे यांच्या भावी समराच्या तयारीनें अत्यंत गुप्त पण अत्यंत धडाडीच्या हालचाली सर्वत्र सुरू होत्या. जसजसा एकेक दिवस जाऊं लागला तसतशा मराठ्यांच्या वाढत्या बलाच्या बातम्या चंदासाहेबाच्या कानांवर येऊं लागल्या. रघूजी भोंसले वगैरे सातान्याहून मुद्दाम कर्नाटकांतील अपुरी मोहीम पुरी करून कर्नाटकाला यवनदास्यांतून मुक्त करण्यासाठीं आलेले वीर शिवगंगेला झपाट्यानें युद्धाची तयारी करीत होतें, व सर्व हिंदु राजेरजवाडे, पाळेगार वगैरे मातबर लोकांकडे आपले वकील अथवा प्रतिनिधी पाठवून त्यांना या धर्मयुद्धांत भाग घेण्याला उद्युक्त करीत होते. रतनसिंगानें निहालसिंगाला सर्व हिंदूंच्या एकीकरणाची जी योजना बोलून दाखविली, ती त्यापूर्वीच आचरणांत आणण्याला मराठ्यांकडून सुरुवात झाली. सच्चिदानंद वैरागी, झुंझारराव, मानाजी ही सारी मंडळी कोणी प्रतापसिंहमहाराजांचा तर कोणी मुरारराव घोरपड्यांचा तर कोणी रघूजी भोंसल्यांचा खलिता घेऊन एकेक राजा एकेक पाळेगार गांठून मराठ्यांच्या पक्षाची बळकटी करीत हिंडत होते. ज्या थोर लोकांनीं अशा प्रतिनिधींची फारशी पर्वा करूं नये, तटस्थ वृत्ति स्वीकारावी, त्यांना सच्चिदानंद स्वत: जाऊन भेटत व त्यांना धर्मयुद्धांत सामील करून घेत. सच्चिदानंदांच्या निस्वार्थी प्रयत्नांपुढें व त्यांच्या दिव्य तपस्तेजापुढें कोणालाही निमूटपणें मान लववावीच लागे. मानाजी प्रतापसिंहमहाराजांच्या रोषाला पात्र झाला असल्यानें त्याला महाराजांच्या अनुज्ञेनें कोणतेंच काम करतां येणें शक्य नव्हतें. तरीही मायभूमीच्या सेवेचें व्रत त्यानें सोडलें नाहीं. तो आपल्या काया—वाचा—मनानें महाराजांचें अभिष्ट चिंतीत होता. मात्र उघडपणें आपण महाराजांच्या वतीनें चंदासाहेबाशीं टक्कर देण्याची तयारी करूं लागल्यास महाराजांचें आणि आपलें निष्कारण वितुष्ट आल्याचा सर्वत्र फार गवगवा झाल्याकारणानें

लोक आपल्या शब्दावर विश्वास ठेवणार नाहींत हें ओळखून मानाजीनें झुंझारराव व सच्चिदानंद यांच्या अनुमतीनें शिवगंगेला जाऊन रघूजी भोंसल्यांची भेट घेतली, व त्यांच्या संमतीनें अर्काटच्या नबाबाला सामोपचारांच्या उपायांनीं काबूंत आणण्याची कामगिरी स्वतः पतकरिली.

तथापि या सर्व खटपटी व हालचाली मराठ्यांच्या हातखंडा होऊन बसलेल्या गनिमी काव्याच्या पद्धतीनेंच चालल्या होत्या. उदाहरणार्थ रतनसिंग जो अपरूपाराणीला साहाय्य करूं म्हणून आला त्यानें चंदासाहेबाला आपली कामगिरी सांगितली ती अशी : "आपण अपरूपाराणीचा पाठपुरावा केला, त्यामुळें करुणाराणी व तिचे साथीदार यांच्यावर राणी अचानक छापा घालूं शकली. करुणाराणी आपली आतां धडगत नाहीं असें पाहून अपरूपाराणीला शरण आली. तिच्या बाकीच्या साहाय्यकाऱ्यांना लढाईंत मोक्ष मिळाला. आम्हीं मीनाक्षीराणी व मोहना यांचें गुप्त वास्तव्यस्थान हुडकून काढून तेथें छापा घातला. त्या छाप्यांत मीनाक्षीराणी आमच्याशीं लढतां लढतां धारातीर्थीं पतन पावली व मोहनेनें आपली पुढील विटंबना टाळण्यासाठीं अग्निकाष्ठें भक्षण केलीं." एवढी फत्ते करून रतनसिंग आला. मग त्याच्यावर चंदासाहेबाचा विश्वास कसा बसणार नाहीं व तो चंदासाहेबाच्या प्रीतीला पात्र कसा ठरणार नाहीं? चंदासाहेबानें खूष होऊन रतनसिंगाची आपल्या मुख्य सेनापतीच्या जागीं योजना केली व मुरारराव घोरपडे फंसून मीनाक्षीराणीच्या रक्षणार्थ येतांच त्याचा कोंडमारा करण्याची कामगिरीही त्यालाच सांगितली. अर्थात् मीनाक्षीराणी अद्याप हयात आहे व ती त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांतच बंदिवासांत आहे अशी आगाऊ हाकाटी पिटण्याला चंदासाहेबानें कमी केलें नाहीं व रतनसिंगालाही तसेंच करावयाला सांगितलें. हेतु हा कीं मुरारराव घोरपड्याची दिशाभूल व्हावी, त्यानें मीनाक्षीराणीला साहाय्य करण्याच्या मिषानें येऊन फंसावें.

पण मुरारराव घोरपडेही कांहीं कमी चतुर नव्हते. ते चांगले शेराला सव्वा शेर होते. त्यांना वस्तुतः मीनाक्षीराणीच्या आत्महत्येची वार्ता अगोदरच कळली होती व मोहनेनेंही त्यापूर्वींच मीनाक्षीच्या पत्राचा अर्थ त्यांना नीट समजावून सांगितला होता. तें सर्व ध्यानीं घेऊनच त्यांनीं आपलें पुढील गनिमी काव्याचें धोरण रघूजी भोंसल्यांच्या सल्ल्यानें अगदीं

बेमालूम आंखलें होतें. ते मीनाक्षीच्या साहाय्यार्थ म्हणून त्रिचनापल्लीकडे यावयाला निघाले, तेव्हां ही आपली भेट खाजगी स्वरूपाची आहे, व आपण राणीच्या भवितव्याविषयीं सामोपचाराच्या वाटाघाटी करण्याच्या अमक्या दिवशीं येत आहों असेंही त्यांनीं चंदासाहेबाला कळविलें.

निहालसिंगाबरोबर एक जासूद अर्काटच्या नबाबाला चंदासाहेबाचा खलिता घेऊन गेला होता, त्या खलित्याचें उत्तरही थोड्याच दिवसांत—सुमारें दहाबारा दिवसांनीं चंदासाहेबाला मिळालें. त्यांत नबाब सफदरअल्लीनें चंदासाहेबाच्या मर्जीप्रमाणें तंजावरला वेढा देऊन तेथून प्रतापसिंह महाराजांची सत्ता खणून काढण्याच्या कामीं कोयाजी घाटग्याला भरपूर साहाय्य करण्याचें कबूल केलें होतें, व त्याखेरीज त्रिचनापल्लीलाही सैन्याची आणि हत्यारें व दारूगोळ्याची मदत करण्याचें कबूल केलें होतें. त्या खलित्यांत निहालसिंगाची ओतप्रोत स्तुति नबाबाकडून करण्यांत आली होती व स्वतः निहालसिंगच तो खलिता घेऊन माघारा आला होता.

"एकूण तूंदेखील माझ्या मनुष्याबरोबर अर्काटला गेला होतास तर !" चंदासाहेबानें संतोषपूर्वक निहालसिंगाला विचारिलें.

निहालसिंग उत्तरला, "सरकार, वाटेंत आमच्यावर मोठा भयंकर प्रसंग गुदरला ! मीनाक्षीराणीच्या लोकांनीं आमच्यावर अचानक हल्ला केला. त्या हल्ल्यांत माझा जोडीदार ठार मारला गेला व मलाही सपाटून मार खावा लागला. तरी पण मीं चतुराईनें माझ्या जोडीदाराकडचे खलिते काढून घेतले व आपल्या आज्ञेप्रमाणें कामगिरी पार पाडली."

"नबाब या उत्तरांत तुझी फारच वाखाणणी करतात."

"तो नबाबांचा थोरपणा आहे. त्यापेक्षां त्यांत कांहींच नाहीं. वाखाणणी करण्याजोगी अशी कोणती कामगिरी माझ्या हातून झाली आहे ?"

"तरी पण नबाब उगाच तुझी वाखाणणी करावयाचे नाहींत." बोलतां बोलतां चंदासाहेबाला वाटलें कीं ज्या अर्थी निहालसिंग हा अनरूपाराणीच्या पदरचा सेवक, त्या अर्थी त्याला तंजावरकडील सर्व माहिती असली पाहिजे. असा माहितगार व चतुर मनुष्य आपल्या पदरीं असावा असें त्याला वाटलें व तो निहालसिंगाला म्हणाला, "हें पहा निहालसिंग, तूं माझ्या पदरीं रहावयाला तयार आहेस का ?"

" माझ्या धनिणीच्या परवानगीखेरीज तिची नोकरी सोडून मला आपल्या पदरीं कसें राहतां येईल सरकार ! हां ! एवढें मात्र आहे, तूर्त सध्यांच्या बखेड्यांचा शेवट होईतों आपणाला जरूर ती माहिती देण्यासाठीं अपरूपा-राणीसाहेबांनीं मला आपल्या पदरीं रहावयाला सांगितलें आहे."

" तोंवर तरी तूं इथें आहेस ना ? "

" होय. "

" मग कांहीं हरकत नाहीं. त्यानंतर मीं राणीसाहेबांना तुमच्याविषयीं काय सांगावयाचें तें सांगून तुझें जन्माचें कल्याण करून सोडीन."

" आपला संतोष हेंच माझें कल्याण होय सरकार ! " निहालसिंग म्हणाला. त्याच्या मनांतून कांहीं तरी काळ त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांत चंदासाहेबाच्या एकूण एक गुप्त हलचालीवर नजर ठेवण्यासाठीं व ती माहिती त्याच्या शत्रूंना वेळच्या वेळीं कळविण्यासाठीं तेथें रहावयाचेंच होतें. तो मनांत म्हणाला, " याला म्हणतात नशीब. आंधळा मागतो एक डोळा तर देव देतो दोन."

येथें अर्थात् वाचकांना गूढ पडलें असेल कीं अर्काटच्या नबाबाचा सहानुभूतीचा खलिता चंदासाहेबाला येऊं शकला तो कसा ?

तें असें झालें कीं, निहालसिंग चंदासाहेबाचा खलिता घेऊन अर्काटला जाऊन पोंहोचला, त्यापूर्वींच रघूजी भोंसले व मुरारराव घोरपडे यांच्या संमतीनें व नबाबानें तह करण्याची इच्छा आगाऊ प्रदर्शित केल्यावरून मानाजी तें तहाचें काम पुरें करण्यासाठीं मराठ्यांचा वकील या नात्यानें तेथें जाऊन पोंहोचला होता. नबाब सफदरअल्लीनें मानाजीला सामोरा जाऊन त्याला सन्मानपूर्वक राजधानींत आणून त्याला आपल्या अनेक राजवाड्यांपैकीं एका राजवाड्यांत ठेवून घेतलें होतें. निहालसिंग राजधानींत जाऊन पोंहों-चतो तोंच त्याला मानाजी तेथें आल्याची वार्ता कळली. त्याबरोबर निहाल-सिंग मानाजीला भेटण्यासाठीं प्रथम तिकडेच गेला.

निहालसिंग नांवाचा सरदार भेटीला आला आहे असें मानाजीला सेवकानें जाऊन सांगतांच मानाजी प्रथम बुचकळ्यांत पडला. परंतु त्या दोघांची भेट होतांच निहालसिंगानें संशयनिवृत्ति केली. मानाजीनें तूं कोण कोठला —असें निहालसिंगाला विचारतांच निहालसिंगानें न डगमगतां उत्तर दिलें, " मोहना आपल्या माहितीची असेल. मीनाक्षीराणीसाहेबांची ती सहचरी

होती. राणीसाहेबांनीं आत्महत्या केल्यावर मोहना भटकतां भटकतां अचानक शत्रूच्या गराड्यांत सांपडली. तेव्हां मी तिच्याबरोबर होतों. मीं तिचा धाकटा भाऊ आहें. निहालसिंग माझें नांव. शत्रूच्या तावडींतून जिवंत सुटण्याची आशा नाहीं व वेळीं शत्रूनें जीवदान दिलें तरी विटंबना आपल्या वांट्याला येणार हें ध्यानीं घेऊन मोहनेनें स्वतःच्या अब्रूच्या रक्षणासाठीं मरणाची इच्छा दर्शविली व मलाही तेव्हां अन्य तरणोपाय कांहींच दिसत नसल्यानें मीं तिच्या इच्छेला मान्यता दिली. तिनें आपलें शीर धडावेगळें करायला मला सांगितलें व मलाही तिच्या जीवितापेक्षां तिच्या अब्रूचें जास्त मोल वाटल्यामुळें मीं डोळ्यांवर कांतडें ओढून तिला इहलोकांतील जाचापासून आणि शत्रूच्या मगरमिठींतून सोडविलें. त्याच वेळीं मीं मोहनेला वचन दिलें आहे, त्या वचनाअन्वयें तिचें जीवितकार्य तिच्याइतक्याच निष्ठेनें तडीला न्यावयाला मी बांधलेला आहें. त्या वचनानुसार मी तेव्हांपासून वागत आहें; त्यामुळें मी चंदासाहेबाचा बराच विश्वास संपादन करूं शकलों आहें. आपणाला जरी या वेळीं कदाचित् माझी ओळख पटली नाहीं, तरी आपल्या अनुमतीनें करुणाराणी सध्यां शिवगंगेला रघूजी भोंसल्यांच्या आश्रयाला गेली आहे, ती मला पूर्णपणें ओळखते. राणीलाही मी माझ्या वडील बहिणीच्या ठायीं मानतों. ती आपणाला भेटेल तेव्हां आपली खात्री होईलच. परंतु तूर्त आपली याहून खात्री पटावयाला पाहिजे असेल तर..." असें म्हणून निहालसिंगानें एक मुद्रिका आपल्या डाव्या हाताच्या बोटांतून काढून मानाजीला दाखविली. ती करुणाराणीची मुद्रिका असल्याबद्दल मानाजीची खात्री झाली व तो निहालसिंगाशीं विश्वासानें पुढील बेतांबद्दल वाटाघाटी करण्याला तयार झाला.

"हा खलिता मीं चंदासाहेबांकडून नवाबाला मिळवून आणिला आहे." निहालसिंग तो खलिता आपण आपल्या जोडीदाराला ठार करून कसा हस्तगत केला वगैरे वृत्तांत सांगून पुढें म्हणाला, "तेव्हां मला आपण हें राजकारण एथवर रंगाला आणल्याचें माहीत नव्हतें. माझा मानस नबाबाकडून चंदासाहेबाच्या नांवावर कुमक मिळवून ती नेमकी मराठ्यांच्या गोटांत नेऊन सोडण्याचा होता. तोंच माझी व रतनसिंगाची भेट झाली व त्यानें मजपाशीं सर्व खुलासा केला. आतां अर्थात् या खलित्याचा तादृश कांहीं

उपयोग नाहीं हें खरें. तथापि अद्यापही चंदासाहेबाला झुलवून तोंडघशीं पाडण्याच्या कामीं याचा उपयोग होण्याजोगा आहे."

"तो कसा काय?" मानाजीनें प्रश्न केला.

"तो असा. मीं माझा खरा पूर्वेतिहास आपणाला सांगितला तो आपण विसरून जावयाचा, व मी आपल्या सैनिकांच्या हस्तें या राजधानींत हिंडत असतांना पकडला गेलों आहें असें समजावयाचें. अर्थात् हा मजजवळचा खलिता आपल्या हातीं लागल्यावर आपणाला नबाबाच्या हेतूविषयीं शंका घेण्याला पुरेसें कारण आहे. आपण जर या खलित्याच्या आधारें नबाब आंतून चंदासाहेबाला फितुर असल्याचा आरोप नबाबावर केला, तर त्याची नाशाबिती नबाबाला करतां यावयाची नाहीं. ती शाबितीं करून घेण्याच्या सबबीवर आपण या खलित्याला अनुकूल असें चंदासाहेबाच्या नांवचें उत्तर मिळवून तें त्याच्याकडे रवाना करण्याचा बहाणा करा. तेवढें उत्तर माझ्या हातीं पडलें कीं मी पुढचें सारें पाहतों."

मानाजी अर्काटला गेल्यापासून उभयपक्षीं व्हावयाच्या त्या साऱ्या वाटाघाटी होऊन मराठे व नबाब यांच्यामधील तहनाम्याचा मसुदाही मुक्रर झाला होता व त्याच दिवशीं दोनप्रहरीं त्या तहनाम्यावर त्या उभय पक्षांच्या सह्या होऊन दोघांची मैत्री व्हावयाची होती.* तो तहनामा लिहून देण्यांत नबाब सफदरअल्ली मराठ्यांना एक प्रकारें बिनशर्त शरणचिटीच लिहून देत होता.

* मराठे व अर्काटचा नबाब सफदरअल्ली आणि सुभेदार मीर असद यांच्यांत ता. १६-११-१७४० रोजीं हा तह पुढीलप्रमाणें झाला :- तहनामा ब मारफत आजम मीर आसद उल्लाखान सुभेदार तालुके अर्काट व त्रिचनापल्ली वगैरे. छल रमजान सुरू सन इहिदे आर्बैन मया व अलफ.

बंदोबस्त तालुका अर्काट वगैरे तुमचे मुद्देमाफक करूं......... कलम १

कर्नाटकचें कामकाज जें करणें तें तुमच्या इतल्ल्याखेरीज न करूं....कलम १

त्रिचनापल्लीचा मजकूर आम्ही फौजेनिशीं आलियावरी तुम्हीं भारी फौजेनिशीं सामील व्हावें. दोघांचे तरतुदीनें जागा घ्यावी व आणीकही पाळेगार सामील करून घ्यावे. आणीक फत्ते जालियावर किल्ल्यांतील मालमवेसी पैका असेल तो आम्हीं घेऊन खालीं किल्ला तुमचे हवाला करूं. तालुक्याचे किल्ले व बंदर व मुलुख जो असेल तो तुमचे हवाला करूं. चंदाखान वगैरे जे सरदार सांपडतील त्यांजपासून खंडपैका घेऊन त्यांपैकीं तिजाई तुमचे फौजेस देऊन दोन तकसिमा सरकारांत घेऊं आणि त्यांस तुमचे जिमे देऊं....कलम १

याप्रमाणें आपल्या हातांतील कळसूत्री बाहुलें बनलेला नबाब चंदासाहेबाचा आपल्या वाटेंतील कांटा दूर करण्यासाठीं चंदासाहेबाची दिशाभूल करणारा खलिता लिहून द्यावयाला कां कूं करणार नाहीं अशी मानाजीची अटकळ होती. तीच शेवटीं खरी ठरली. दोनप्रहरीं मानाजीनें निहालसिंगाच्या शिकवणीप्रमाणें नबाबाच्या भेटीला गेल्या वेळीं तहनाम्याचा विचार करतांना चांगलेंच आकाण्डतांडव केलें, तें पाहून नबाब सफदरअल्ली व त्याचा दिवाण मीर असद हे दोघेही अगदीं घाबरून गेले. त्यांनीं आपल्या परीनें आपली निर्दोषता सिद्ध करण्याची पराकाष्ठा केली. पण त्यांचें कांहींच ऐकून घ्यावयाचें नाहीं असा आगाऊ निर्धार करून तेथें गेलेल्या मानाजीला त्याचें काय होय ?

अखेर होय नाहीं करतां करतां मानाजीनें हळूच निहालसिंगप्रणीत उपाय सफदरअल्ली व मीर असद यांना सुचविला. इतकें मराठ्यांच्या ताटाखालचें मांजर होऊन राहणें जरी त्या दोघांनाही अपमानास्पद वाटलें, परी स्वतःचें राज्य टिकविण्यासाठीं व सर्वनाश टाळण्यासाठीं त्यांना मानाजीच्या सूचने-

---

चंदाखान वगैरे लाखों रुपये देतील तरी गोष्टीवर मन न द्यावें. करारा-प्रमाणें त्रिचनापल्ली वगैरेचा बंदोबस्त करून तुम्हास द्यावें ...... कलम १

तुमच्या–आमच्या दरम्यान चंदाखान व ताकी ( महमदखान ) वगैरे बोलीस पुढें जाबसालास कोणीं नसावें. आपले विरुद्ध मोंगल गनिम पाळेगार असतील त्यांस तंबी पोंचवावी. .... .... .... कलम १

करारबाब जाहला असेल त्याबद्दल येथें मुक्रर केली आहे. त्याबद्दल मीर आसद यास रवाना केलें असे. त्याबरोबर एक माणूस मातबर पाठवावा. जो करार जाला असेल त्यास दरम्यान बेलभंडार, महादेव, श्रीव्यंकटेश व खंडेराव, विठोबा, श्रीभवानी, पीर दस्तगीर दरम्यान असे. त्यांस बोली लावून त्यांत तफावत पडणार नाहीं. दरम्यान देव असे .... कलम १

मीर आसद उल्ला अगर हर कोणी तुम्हांकडील मातबर कामकाजाबद्दल येईल त्यास जबाबसाल करून बिदागी करावी. आवकाश न करावा. शिर पांव बहुमान देऊन रुकसत लावावें. ...... ..... .... कलम १

तुम्ही आम्ही एक होऊन आणीक स्थळें जीं असतील तेथें जो पैका साधेल त्याचा हिस्सा तिजाई तुम्हांस देऊं ..... ..... ..... .... कलम १

येकूण कलमें ८. येणेंप्रमाणें करारबाब जाहला असे. सदरहू प्रमाणें चालावें. दरम्यान तजावत तफावत करूं नये. छ. मजकूर.

बरहुकूम चंदासाहेबाच्या नांवाचा फेरखलिता लिहून त्याच्या स्वाधीन करणें भाग पडलें. तो खलिता हातीं पडल्यावर मगच मानाजीनें तहनाम्यावर सही केली !

तो खलिता घेऊन निहालसिंग तडक त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांत आला. त्याच खलित्यानें चंदासाहेबापाशीं निहालसिंगाची मानमान्यता कमालीची वाढवून त्याला चंदासाहेबाच्या नाकांतला वाल बनवून सोडलें. त्या मान-भावी खलित्यांत नबाबानें तंजावरला वेढा देऊन प्रतापसिंहमहाराजांचें पारि-पत्य करण्याचें कबूल करून शिवाय त्याला त्रिचनापल्लीकडे कुमक करण्याचेंही कबूल केलें होतें, व त्या भरंवशावर चंदासाहेब मारे शेफारून गेला होता, "नबाब व मी एक झाल्यावर आतां हे मराठे–हे सह्याद्रींतले पाजवे उंदीर म्हणजे कुठच्या झाडाचा पाला ! मुरारराव घोरपड्याला म्हणावें, मूर्खा, भोळसटा, मीनाक्षीराणीच्या बनावट पत्रावरून फंसून तूं भगिनीप्रेमानें विर-घळलेल्या चित्तानें एकदां ये तर खरा ! कीं तुला घशांत टाकून चावण्याचे-देखील श्रम न घेतां गिळून बसतों. तिकडे सफदरअल्ली आणि मीर असद तंजावरला वेढा देऊन त्या प्रतापसिंहाचा आणि त्याच्या साहाय्याला मारे शेफारून धांवून आलेल्या रघूजी भोंसल्याचा खुर्दा करीतच आहेत. मरा-ठ्यांना हिंदवी–साम्राज्याचा पसारा कर्नाटकांत देखील वाढवावयाला पाहिजे आहे नाहीं काय ? ठीक आहे. या चंदासाहेबाशीं गांठ आहे म्हणावें...."

त्या दिवसापासून चंदासाहेबाच्या डोळ्यांवर भावी विजयाची धुंदी आगा-ऊच इतकी चढली कीं त्याला ध्यानीं–मनीं–स्वप्नीं विजयोन्मादाखेरीज कांहींच सुचेना. त्या स्वप्नांत त्याला काय दिसलें नाहीं ? त्याला तो स्वत: संयुक्त कर्नाटकाच्या–तंजावर, त्रिचनापल्ली, अर्काट वगैरे सर्व हिंदु–मुसल-मान राज्यें ज्यांत कोणत्या ना कोणत्या स्वरूपानें विलीन झालीं आहेत अशा कर्नाटक साम्राज्याच्या सिंहासनावर सम्राट म्हणून विराजमान झालेला दिसला. श्रीरंग व अशींच महत्त्वाचीं जीं जीं देवालयें कर्नाटकांत होतीं, तेथें तेथें मशिदी उभारलेल्या त्याला दिसल्या; मोठमोठ्या हिंदू राजांच्या राण्या त्यांचे पति ठार झाल्यावर स्वखुषीनें मुसलमानी धर्म स्वीकारून आपल्या बेगमा झाल्या आहेत असलीं खुनशी व हिडीस दृश्येंही त्याला दिसलीं. पण हा सारा आपल्या उन्मत्तपणाचा काल्पनिक खेळ म्हणजे निव्वळ पाण्यावरचा बुडबुडा आहे, हें त्याला काय माहीत !

या काल्पनिक विजयोन्मादांत चंदासाहेब धुंद असतां व त्याची धुंदी उतरूं नये अशी खबरदारी निहालसिंग अक्षय त्याच्या सन्निध राहून घेत असतां मुरारराव घोरपडे ससैन्य त्रिचनापल्लीच्या किल्ल्याबाहेर येऊन थडकले. त्यांना किल्ल्यांत घेऊन कोंडावयाचें असा पूर्वसंकेत चंदासाहेबानें ठरविल्यामुळें किल्ल्याच्याबाहेर शत्रूच्या कोंडमाऱ्याची जय्यत तयारी करून सावध असलेल्या रतनसिंगानें त्यांच्याशीं सामना दिला नाहीं हें ओघानेंच घडून आलें. पण मुरारराव कसले वस्ताद! गनीमी काव्यानें लढाई खेळून शत्रूला जेरीला आणण्यांत निढावलेले मर्द मराठे ते! शिवाय सेनापति रतनसिंग जो चंदासाहेबानें किल्ल्याच्या बंदोबस्तासाठीं नेमिला होता, तो तर बोलून चालून मुराररावांचाच मनुष्य! रतनसिंगानें मुराररावाला सामोरा गेल्या वेळीं गुप्तपणें त्यांना कानमंत्र दिला, "चंदासाहेब हा अगदीं उरफाट्या काळजाचा मनुष्य असल्यानें आंत किल्ल्यांत—त्या वाघाच्या पिंजऱ्यांत जाऊन त्याच्याशीं झगडण्याचें धाडस करणें उचित नाहीं. त्यापेक्षां तुम्ही किल्ल्याला वेढा घालून हळूहळू मुंगीलादेखील आंत रीघ नाहीं अशी चौफेर बेमालूम नाकेबंदी करून आंतल्या आंत शत्रूचा कोंडमारा करा."

# प्रकरण ३१ वें
# भगवा झेंडा फडकला

एक दिवस गेला, दोन दिवस गेले, तीन दिवस गेले, चंदासाहेब मुरारराव घोरपडे किल्ल्यांत प्रविष्ट होतात केव्हां व आपण त्याला दग्यानें यमसदनाला पाठवितों केव्हां याची वाट पहात बसला होता. पण मुरारराव कांहीं केल्या आंत पाऊल टाकीनात.

हें प्रकरण आहे तरी काय याची चौकशी करण्यासाठीं चंदासाहेबानें एके दिवशीं रतनसिंगाला एकान्तांत बोलावून विचारिलें, "मुरारराव किल्ल्यांत येत नाहीं, हा काय प्रकार आहे ?"

"तो सरळ वृत्तीचा माणूस दिसत नाहीं सरकार! तो दिवसेंदिवस किल्ल्या-सभोंवारचा वेढा तंग करीत आहे, यावरून त्याचा विचार कांहीं तरी दगा-फटका करण्याचा दिसतो." रतनसिंगानें साळसूदपणें उत्तर दिलें. "मला वाटतें कीं आपण इतके दिवस स्वस्थ बसलों हीच चूक झाली."

"त्याला आपला बेत कळला काय ?"

"कोण जाणें ! कदाचित् कळलाही असेल. किंवा मूळपासूनच आपल्या डावाला प्रतिडाव खेळण्याच्या तयारीनें तो आला असेल."

"मग आतां याला काय उपाय ?"

"आपणच आतां उपाय काय तो सुचवावा."

चंदासाहेबाचा विश्वासू सेवक निहालसिंग जवळ उभा होता. तो रतन-सिंगाकडे पहात म्हणाला, "मला वाटतें, मीनाक्षीराणीच्या वतीनें त्याच्याशीं कांहीं तरी संकेत ठरवून त्याला आंत घ्यावें. मीनाक्षीराणी निजधामाला गेली हें जर त्याला कळलें नसेल तर तो फंसून आपल्या जाळ्यांत अडक-ण्याचा संभव आहे."

"पण मीनाक्षीराणी निजधामाला गेली हें त्याला अगोदरच माहीत झालें असल्यास तसा निरोप घेऊन जाणाऱ्या जासुदालाच तो दगलबाज समजून निजधामाला पाठवील. हें सतीचें वाण कोणीं पतकरावें हा प्रश्न आहे." रतनसिंग निहालसिंगाकडे व लगेच चंदासाहेबाकडे पाहून म्हणाला.

"आपला निहालसिंग तेवढें काम करील. त्याच्याइतका लायक इसम हें जबाबदारीचें काम पार पाडण्याला मला तरी दुसरा दिसत नाहीं." चंदासाहेब म्हणाला.

"सरकारच्या आज्ञेचें उल्लंघन करावयाचें नाहीं आणि स्वामीकार्यांत अंतराय पडूं द्यावयाचा नाहीं म्हणून मी तेवढेंही करीन. सरकारांची आज्ञा व्हावी." निहालसिंग निर्भयपणें उत्तरला.

"एवढ्यानें फंसून मुराररराव आहारीं आला तर कामच झालें. पण तो जर आहारीं आला नाहीं, तर मात्र आपण त्याच्यावर एकदम हल्ला करून त्याचा नायनाट केला पाहिजे." चंदासाहेब म्हणाला.

निहालसिंगानें एवढ्या मुदतींत किल्ल्यांत जितक्या प्रकारें अंदाधुंदी माजवितां येईल व नादुरुस्ती करतां येईल, तितक्या प्रकारें करून ठेविलीच होती; व किल्ल्यांतील मारगिरीच्या जागांचा अचूक अंदाज मुराररराव व रघूजी भोंसले वगैरे इतर मंडळी यांना देण्यासाठीं त्याला आतां बाहेर जाणें अवश्य होतें. तें चोरून जाण्यापेक्षां अशा राजरोस रीतीनें जाणेंच त्याला श्रेयस्कर दिसत होतें.

लगेच त्याच दिवशीं मीनाक्षीराणीचा गुप्त संदेश कळविण्यासाठीं म्हणून निहालसिंग किल्ल्याबाहेर मुराररावाच्या गोटांत गेला. रतनसिंग व चंदासाहेब यांनीं सूर्यास्तापावेतों त्याच्या परत येण्याची वाट पहावयाची व तो परत न आल्यास एकदम लढाईला सुरुवात करावयाची असा संकेत ठरला होता. त्याप्रमाणें सूर्यास्तापावेतोंच काय पण पुढें दोन घटकांपावेतों निहालसिंगाची वाट चंदासाहेबानें पाहिली व तो माघारा आला नाहीं असें पहातांच त्यानें रतनसिंगाला एकदम मध्यरात्रीं मुराररावाच्या छावणीवर तुटून पडण्याचा हुकूम दिला.

रतनसिंगानें मध्यरात्रीला एकदम मुराररावाच्या छावणीवर छापा घातला. पण मुराररावाशीं त्यापूर्वीच त्याचें संगनमत झालें असल्यानें उभयतांची ती लुटूपुटीची लढाई दुसऱ्या दिवशीं सूर्यास्तापावेतों चालली व सूर्यास्ताला रतनसिंग शत्रूच्या हातीं कैद झाल्याची दुःखद वार्ता चंदासाहेबाच्या कर्णपथावर येऊन आदळली.

तेव्हां मात्र चंदासाहेब ओळखून चुकला कीं हा दुखावलेला सर्प आपला दावा धरून आपणांला डसण्याला आतां कमी करणार नाहीं, आतां चांगलेंच

रण उभय पक्षीं जुंपणार. त्याबरोबर त्यानें प्रथम रातोरात आपल्या कौटुंबियांना गुप्त वेषानें पांडिचरीकडे फरेंचांच्या आश्रयाला पाठवून दिलें, मदुरेला त्याचा वडील भाऊ बडासाहेब होता त्याला आपल्या कुमकेला येण्यासाठीं तांतडीनें बोलावणें पाठविलें व आपल्या सैन्याचें नेतृत्व स्वत: आणि स्वत:चा वडील मुलगा यांनीं पतकरून धडाडीनें लढाई सुरू केली. त्याला अजूनही आशा होती कीं नबाब आपणाला साहाय्य करील, अपरूपाराणी व कोयाजी मदतीला धांवून येतील, व शिवाय जवळपासच्या सर्व मांडलिकांनाही त्यानें मराठ्यांविरुद्ध लढण्याला आव्हान केलें. पण इकडून मदत येईल, तिकडून मदत येईल असा तो सारा मायेचा बाजार रतनसिंग,मराठे व मुख्यत: निहालसिंग यांनीं चंदासाहेबाची दिशाभूल करण्यासाठीं उभारलेला होता. तो ऐन वेळीं कसचा कामीं येतो ! त्यांतूनही कांहीं मांडलिक चंदासाहेबाच्या हांकेला धांवून आले खरे. पण ते लढतां लढतां बाहचात्कारीं पराभूत होऊन मराठ्यांत सामील झाले.

यानंतरचें त्या खडाजंगीच्या लढाईचें वर्णन इतिहासाच्या साक्षीनें कांटेकोरपणें निवेदन करावयाचें तर "…. तंजावरचें सैन्यही मराठ्यांच्या मदतीला येऊन सर्व संयुक्त सैन्यानें त्रिचनापल्लीला वेढा दिला. त्रिचनापल्ली हें प्राचीन महत्त्वाचें ठिकाण चंदासाहेबाच्या हातीं राहूं नये म्हणून सर्व हिंदु सैन्यानें या वेळीं मोठ्या वीरश्रीला चढून निकराचें युद्ध केलें. चंदासाहेब त्रिचनापल्लीच्या बळकट किल्ल्याचा आश्रय धरून मोठ्या हिय्यानें लढत होता. परंतु मराठ्यांनीं सर्व बाजूंनीं पुरा कोंडमारा केल्यामुळें किल्ल्यांतील सामुग्री लवकरच संपत आली, त्यामुळें चंदासाहेबाला मराठ्यांशीं टक्कर देणें अशक्य होऊन बसलें. त्यानें अखेर आप्त–स्वकीयांच्या मदतीबद्दल व स्वत:च्या हिंमतीबद्दल निराश होऊन मराठ्यांशीं किल्ला स्वाधीन करण्याबद्दल बोलणें सुरू केलें. त्याच सुमाराला अगदीं आणीबाणीच्या वेळीं मदुरेहून बडासाहेब आपल्या सैन्यानिशीं साहाय्यार्थ धावून आला. परंतु तो त्रिचनापल्लीला येऊन पोंहोचण्यापूर्वींच मराठ्यांनीं अर्ध्या वाटेंत त्याला गांठून त्याच्यावर तुटून पडून त्याला ठार केलें. अशा रीतीनें चंदासाहेबाला चोहों बाजूंनीं निराश झाल्यावर त्रिचनापल्लीचा किल्ला मराठ्यांच्या स्वाधीन करावा लागला."*

* इतिहाससंग्रह–तंजावरचें घराणें.

याप्रमाणें चंदासाहेबाचा डाव त्याच्यावरच उलटून पडला. त्याला अनेक दिवस जीं सुखस्वप्नें पडत असत तीं सारी अगदीं उलटया घटनेनें त्याच्या अनुभवाला आलीं. त्यानें साऱ्या कर्नाटकाचें साम्राज्य स्वतःच्या हुकमतींत आणण्याचें बाजूलाच राहिलें, उलट त्याला स्वतःला स्वतंत्रपणें घटकाभर तरी वास्तव्य जेथें करतां येईल अशी पाऊलभर देखील सत्तेची अशी जागा बिचाऱ्याला उरली नाहीं. इतका आपला अचूक पराजय कसा झाला हें गूढ मात्र चंदासाहेबाला अखेरपावेतों उलगडलें नाहीं. गोष्ट खरी कीं किल्ल्यांतील त्याचे लोक मराठयांना फितुर झाले, किल्ल्यांत मराठे गुप्त चोरवाटांनीं माहीतगारांप्रमाणें आंत घुसले, मराठयांकडून किल्ल्याबाहेरून तोफांनी व बंदुकांची सरबत्ती होतांच अग्निवर्षाव नेमका जनसमूहावर व दारूच्या कोठारांवर होऊं लागला, पण हें सारें निहालसिंगाच्या रोपाचें फळ होय असें कांहीं चंदासाहेबाच्या अथवा कोणाच्याच ध्यानीं आलें नाहीं.

मात्र अखेर किल्ला मराठयांच्या स्वाधीन झाल्यावर रामस्वामि हा मराठयांचा प्रतिनिधि म्हणून चंदासाहेबाला बंदिवासांत लोटण्यासाठीं आला तेव्हां चंदासाहेबाचे डोळे उघडले. तो आपण होऊन प्रथम कांहींच बोलला नाहीं. त्यानें फक्त रघूजी भोंसल्यांच्या हुकमानें आपण तुम्हाला बंदीत ठेवण्यासाठीं आलों आहों असें सांगितलें.

चंदासाहेबानें त्या दोघांना पहातांच दांतओंठ खात विचारलें, "हें काय? एकूण तुम्ही अखेर फितूर झालां काय?"

रामस्वामि आपल्या शिपायांकरवी चंदासाहेबावर संगिनी रोखून त्याला त्या खडया पहाऱ्यांत बंदिवासाकडे नेतां नेतां जणू काय अगदी सहज लीलेनें म्हणाला, "काय करायचें सरकार! गरीब माणसें आम्ही, वारा वाहील तशी पाठ फिरविली पाहिजे. मीनाक्षीराणीसाहेबांच्या कारकीर्दीत आम्हीं एकनिष्ठपणें त्यांची सेवा केली. नंतर आपण त्यांचा विश्वासानें गळा कापून त्रिचनापल्लीचें राज्य बळकावून बसलां, तेव्हां स्वामिद्रोहाच्या पातकाची कल्पनाही मनांत न आणतां आम्हीं आमच्या राणीविरुद्ध सेवा पतकरिली. आपणाला आठवत असेलच!" रामस्वामि बंदिशाळेपाशीं येतांच एका विशिष्ट खोलीकडे—ज्या खोलींत मीनाक्षी राणीला बंदीवान करून कोंडून ठेवण्यांत आलें होतें तिकडे बोट दाखवून म्हणाला, "आपणच ही खोली आमच्या अभागी

राणीसाहेबांना कोंडून ठेवण्यासाठीं मुक्रर केली व याच रामस्वामीला आपण राणीसाहेबांना इथें आणून कोंडण्याची आज्ञा केली. ती आपली आज्ञा मीं तेव्हां स्वामिनिष्ठापूर्वक पाळली. कारण तेव्हां आपण आमचे विजेते–माझें स्वामि होतां." शिपाई त्या कोठडीचा दरवाजा उघडूं लागले तेव्हां रामस्वामि गंभीर चर्या करून चंदासाहेबाकडे पहात उद्‌गारला, "आजचे आमचे विजेते मराठे आहेत ते माझे स्वामि आहेत. आपणाला याच कोठडींत कोंडून ठेवण्याचा त्यांचा मला हुकूम आहे."

"विश्वासघातकी! हरामखोर! दगलबाज!" रामस्वामीच्या नजरेच्या खुणेसरसे शिपाई चंदासाहेबाला त्या कोठडींत कोंडूं लागले तेव्हां चंदासाहेब खवळून मुठी आवळून ओंठ चावीत ओरडला.

"आपणच माझे गुरु सरकार, मी आपलाच कित्ता गिरवीत आहें." असें म्हणत रामस्वामीनें आपल्या हातानें कोठडीचा दरवाजा लावून घेतला.

त्या कोठडीच्या मोकळ्या खिडकींतून चंदासाहेबाची पलीकडे दृष्टि गेली, तों दूर किल्ल्याच्या निशाणकाठीच्या बुरुजावर त्याचा विश्वासू निहालसिंग मराठ्यांच्या भगवा झेंडा रोंवीत आहे, व करुणाराणी, रघूजी भोंसले, फत्तेसिंग भोंसले, मुरारराव घोरपडे, मानाजी, झुंझारराव, सच्चिदानंद, संभाजी, रतनसिंग व आणखी इतर बरेचसे लोक खालीं उभे आहेत असा देखावा त्याला दिसला. निहालसिंगानें चंदासाहेबाचें निशाण त्या सर्व लोकांसमक्ष खालीं ओढून काढून त्याच्या फाडफाडून चिध्या चिध्या केल्या व त्या आपल्या पायांखालीं तुडवून लाथेनें खालीं लोटून दिल्या. लगेच रघूजी भोंसल्यांनीं पुष्पसंभारयुक्त भगवा झेंडा सच्चिदानंदांपुढें केला. त्यांनीं तो करुणाराणीच्या हातीं देत म्हटलें, "सज्जनांचा व गो–ब्राह्मणांचा यथान्याय प्रतिपाळ करून राष्ट्राला सुखी करणारा हा मराठ्यांचा भगवा झेंडा असाच यावच्चंद्रदिवाकरौ दिगंतांत फडकत राहो."

त्याच क्षणीं सर्वांच्या तोंडून 'हरहर महादेव!' असा त्रिवार जयघोष झाला व त्या मंगल जयघोषांत करुणाराणीच्या हातून मराठ्यांचा भगवा झेण्डा त्रिचनापल्लीच्या किल्ल्यावर फडकूं लागला. चंदासाहेबाला तें दृश्य बघवेना. तो दोन्ही हातांनीं आपले डोळे मिटून घेऊन हताश चित्तानें मट्‌कन् खालीं बसला.

# प्रकरण ३२ वें
# चंदासाहेबाची दैना



दैवाची गति खरोखरच फार विचित्र आहे. ज्या त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांत चंदासाहेब कपटनीतीनें प्रविष्ट होऊन आयत्या बिळांतील नागोबा होऊन बसला होता, व जेथें त्यानें आपल्या अस्मानी–सुलतानी जोरावर पाणी जाळावयाला कमी केलें नाहीं, त्याच किल्ल्यांत आज तोच चंदासाहेब एखाद्या दीनवाण्या भणंगाप्रमाणें कैदखान्यांतील एका कोठडींत कैद होऊन खितपत पडला होता ! मीनाक्षीराणीच्या अध:पातामुळें त्रिचनापल्लीचा किल्ला चंदासाहेबाच्या स्वाधीन झाल्यापासून जे अधिकारी तेथें चंदासाहेबाच्या हुकुमाची तामिली करीत असत, तेच अधिकारी बहुश: आजही कायम होते. परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं त्याच चंदासाहेबावर पहारा करण्याचें कार्य त्यांच्या वांटयाला येतांच त्यांनीं तें इतक्या सूडबुद्धीनें स्वीकारलें कीं, सर्पाच्या मनांत बारा वर्षें डाव असतो असें जरी म्हणतात तरी सर्पाची जातहि दावेदारीच्या बाबतींत त्या स्वाभिमानी हिंदूंच्या अंत:करणांतील दावेदारीपुढें हार गेली असती.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, त्रिचनापल्लीच्या किल्ल्याचा पाडाव झाल्यावर मराठ्यांचें निशाण त्या किल्ल्यावर जरी फडकूं लागलें व मराठ्यांचा अंमल जारी झाला, तरी त्या अंमलाची खरी घडी अजून बसावयाची होती, व किल्ल्यांत खरा अंमल तेथील पूर्वीच्या अधिकाऱ्यांचाच होता. अर्थात् ते सर्व अधिकारी–तेथें अपवादादाखल असणारे मूठभर बाटगे मुसलमान सोडून बाकी सर्व मराठ्यांची सत्ता शिरसामान्य मानणारे होते. त्या रात्रौ किल्ल्यावर सर्वत्र जो अपूर्व विजयोत्साह चालला होता, त्यांत वस्तुत: जेत्या मराठ्यांचा फारच थोडा अंश असून तो सर्व तेथल्या हिंदु जनांचा स्वयंस्फूर्तीचा खेळ होता. चंदासाहेबानें अर्धभग्न करून भ्रष्ट केलेलें महादेवाचें देवालय जें आज इतकीं वर्षें अंधारांत व अनवस्थेंत कुजत पडलें होतें, त्या देवालयांतील शिवलिंगाची आजपासून सशास्त्र व समंत्र पूजाअर्चा होण्याला प्रारंभ झाला होता, व त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांतील हिंदवासीयांच्या अपूर्व पुनर्जीवनाची

उज्ज्वल साक्ष त्या देवालयांतील अपूर्व रोषणाईवरून किल्ल्यांतीलच नव्हे तर किल्ल्यासभोंवारच्या पंचक्रोशींतील हिंदु जनतेला पटत होती. तें महादेवाचें देवालय म्हणजे किल्ल्याचेंच काय पण सबंध त्रिचनापल्लीच्या राज्याचें सौभाग्य होतें. तें सौभाग्य त्रिचनापल्लीला आज पुन्हां मिळालेलें पाहून सर्व हिंदु जनांना आनंदी आनंद वाटल्यास त्यांत नवल काय !

परंतु ह्या आनंदाइतकाच किंवा त्यापेक्षांहि जास्त विस्मय व विषाद मानण्याचें ज्याच्या कपाळीं आलें होतें असा एक अभागी बंदीवान जीव किल्यांत होता. तो अर्थात् चंदासाहेब होय. त्यानें जो जो अधिकारी भेटेल त्याला परोपरीनें आपली मुक्तता करण्यासाठीं विनवावें, त्याला निरनिराळीं आमिषें दाखवावीं; पण त्या अधिकाऱ्यानें—तो सभ्य असल्यास त्याच्याकडे नुसत्या हेटाळणीनें पाहून पुढें जावें, त्याहून प्रखर वृत्तीच्या कोणीं त्याची कटु शब्दांत संभावना करावी, तर रामस्वामीसारख्या ज्वलज्जहाल वृत्तीच्या एखाद्या हिंदूनें मुद्दाम त्या कोठडीवरून फेऱ्या घालून चंदासाहेबाच्या तोंडावर प्रत्यक्ष थुंकून त्याची विटंबना करण्यालाही कमी करूं नये ! रामस्वामीच्या वृत्तीचीं थोडीथोडकीं माणसें किल्ल्यांत होतीं अशांतला प्रकार नव्हता. मुरारराव घोरपड्यांनीं किल्ल्यावर मराठ्यांचा भगवा झेंडा फडकवितांक्षणींच तेथल्या अधिकाऱ्यांना सक्त ताकीद दिली होती कीं, चंदासाहेब जरी कैद झाला तरी तो आमचा राजकैदी आहे. त्याच्या इभ्रतीला कोणत्याही रीतीनें धक्का लागेल असें वर्तन कोणींहि केल्यास त्याला जबरदस्त शासन करण्यांत येईल.

परंतु धडधड पेटणाऱ्या वडवानलाला कुडचाभर पाण्याचें काय होय ? खवळलेल्या महासागराला बिचारी टिटवी आपल्या चिमुकल्या चोंचींतील उपसणीनें कशी आटवूं शकणार ! तीच गत मुराररराव घोरपड्यांच्या हुकुमाचीहि झाली. खासे मराठे निःपक्षपातपूर्वक किल्यांत अबादानी करून गेले खरे; पण त्यांच्या हुकुमाची तामिली करणाऱ्या आंतील अधिकाऱ्यांचा संतापवन्हि जो इतके दिवस चंदासाहेबाविरुद्ध भडकला होता व जो त्याच्या एकाहून एक वरचढ पापांनीं रोज रोज जास्त जास्त प्रज्वलित होत होता, तो नुसत्या वरिष्ठांच्या हुकुमांनीं कसा शांत व्हावा ? अग्नि भडकला कीं तो भक्ष्य घेणारच. आतां प्रत्यक्ष अग्नि भक्ष्य घेऊन शांत होण्याऐवजीं जास्त भडकत असेल व त्याहून हा लोकवन्हि कांहींसा सौम्य असेल, म्हणूनच तो

चंदासाहेबावर गत गोष्टींचा सूड घेऊन शांत होण्याजोगा होता. ती रात्र अशा सूडाला हपापलेल्या लोकांना केवळ पर्वणी अशी भासली. आपणाला जितकी जितकी म्हणून चंदासाहेबाची विटंबना करावयाची आहे तितकी आपण आज करून घ्यावयाची अशा निश्चयानें ते त्या रात्रीं वागत होते.

परंतु त्या सर्व मूर्तामूर्त संकटांचें चंदासाहेबाला जेवढें भय वाटत नव्हतें तेवढें भय त्याला त्या रात्रौ अकस्मात् तेथें येऊन थडकलेल्या एका पुरुषवेषधारी व्यक्तीला पाहून वाटलें. ती व्यक्ति भय वाटण्यासारखीच होती. मीनाक्षीराणी त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांतून बेपत्ता झाल्यापासून चंदासाहेब त्या व्यक्तीला जागोजागीं पहात होता तो निहालसिंगच होय. परमेश्वरानें आपल्या पापांचें प्रायश्चित देण्यासाठीं हा कोणी काळदूतच पाठवला आहे कीं काय, असें चंदासाहेबाला अगदीं अलीकडे भासत होतें. त्यानें निहालसिंगाला नामशेष करण्याचे होते नव्हते तेवढे सर्व प्रयत्न करून पाहिले होते. परंतु त्यांचा कांहीं उपयोग न होतां तो आज ज्या लाजिरवाण्या स्थितीला येऊन पोंचला होता ती स्थिति केवळ निहालसिंगाच्याच कारवाईचा परिणाम आहे हें त्याला पूर्णपणें कळून चुकलें होतें. जगांत कांहीं गोष्टी मनुष्याधीन असतात तर कांहीं दैवाधीन असतात. निहालसिंगाचा अनिरुद्ध संचार ही गोष्ट मनुष्याधीन नसून दैवाधीन आहे असें चंदासाहेबाच्या मनानें घेतल्यामुळेंच नुसती त्या व्यक्तीची आठवण होतांच त्याच्या हृदयाचें पाणी पाणी होऊन जाई, व त्या व्यक्तीला समोर समक्ष पाहतांच तर त्याची स्थिति फांसावर लटकल्या जाणाऱ्या एखाद्या मरणप्राय जीवासारखी होई. मराठ्यांशीं लढतांना अनेक आणीबाणीच्या प्रसंगीं चंदासाहेबाची सरशी होण्याचा ऐन रंग आला असतां लढाईचा सर्व नूर बदलून टाकण्याचें सामर्थ्य त्या एका व्यक्तीच्या अंगीं होतें. हे सर्व चमत्कृतिजन्य प्रकार चंदासाहेबानें ज्या डोळ्यांनीं पाहिले, त्या डोळ्यांसमोर त्या रात्रीच्या भयाण वेळीं तीच निहालसिंग नामधारी व्यक्ति दत्त म्हणून येऊन उभी राहिलेली पाहतांच त्याची काय अवस्था झाली असेल याची कल्पना करणेंच बरें.

आश्चर्याची गोष्ट ही कीं, चंदासाहेबाचें शिकंदर नशीब सर्रास पायाखालीं तुडवून त्याची वाताहात उडविणारी ती निहालसिंग व्यक्ति कोण असावी याची चंदासाहेबाला या क्षणापर्यंत दाद नव्हती. अगदीं प्रथम

त्याला असा संशय होता कीं मीनाक्षीराणी आणि मोहना ज्या अकस्मात् किल्ल्यांतून नाहींशा झाल्या, त्यांनींच हें सूडाचें नाटक आरंभिलें असावें. परंतु दरम्यान त्या दोघीही ठार झाल्याचें वर्तमान कानीं आल्यामुळें त्याची ती शंका फिटली होती. आणि म्हणूनच त्या व्यक्तीच्या अज्ञातपणाविषयींच्या दंतकथांना उधानाची भरती आली होती.

असो. यमदूताप्रमाणें निहालसिंग समोर येऊन उभा राहिलेला पाहतांच चंदासाहेबानें गर्भगळित होऊन खालीं मान घातली. त्याच्या डोळ्याला डोळा भिडविण्याचें धैर्य त्याच्या अंगीं मुळींच उरलें नव्हतें. निहालसिंगानें पायापर्यंत झगा धारण केला होता, व डोक्याला मराठशाही पटका बांधला होता. शरीर पहावें तर नवकिसलयाप्रमाणें कोमल, चर्या पूर्णपणें उमललेल्या पण पूर्ण ताज्या अशा गुलाबाच्या फुलासारखी, दृष्टि हरिणीप्रमाणें चंचल आणि आकर्षक; त्याचें बोलणें, त्याचें चालणें, जी जी गोष्ट पहावी ती ती अत्यंत मोहक अशीच कोणालाहि वाटे. व अशा त्या तरुणाचे गेल्या कांहीं महिन्यांतील अवाढव्य पराक्रम आठवतांच शत्रूच्याही मनांत अशी कौतुकपूर्ण शंका उत्पन्न होई कीं, या नाजुक फुलाच्या ठायीं रणझुंजाराला आवश्यक असणारा पाषाणी कठोरपणा आणि पहिल्या दर्जाच्या मुत्सद्देगिरीला आवश्यक असणारी पोलादी तलवारीच्या पात्यावर खेळणारी तीव्र बुद्धीची ढाल ह्या देणग्या कोठून कशा मिळाल्या असतील ?

निहालसिंग वेषांतर करून गंभीर वृत्तीनें तेथें येऊन चंदासाहेबासमोर उभा राहिला. तेथें येतांच चंदासाहेबाचें अधोवदन झालेलें पाहून क्षणभर त्याच्याकडे पहात तो अगदीं निश्चल उभा राहिला व दुसऱ्या क्षणाला मर्मभेदक दृष्टीनें त्याच्याकडे पाहून किंचित् गालांतल्या गालांत हंसला. सभोंवारचे पहारेकरी जरी निहालसिंगाला ओळखूं शकले नाहींत तरी सूर्योदयाबरोबर दिवाभीतांची जी अवस्था होते, अथवा रामाचें नांव ऐकतांच भूतपिशाच्चांची जी गाळण उडते असें म्हणतात, अशी त्यांची अवस्था झाली व त्या सर्वांनीं गोंधळलेल्या अंतःकरणांनीं त्याला अगदीं लवून नम्रतापूर्वक मुजरे केले. निहालसिंगाचें त्या मुजऱ्याकडें लक्ष नव्हतें. तो पुन्हां गालांतल्या गालांत किंचित् हंसत लगेच चंदासाहेबाकडे वळला तेव्हां त्याची दृष्टि एकाएकीं इतकी उज्वल झाली कीं वहात्या

जलप्रवाहांतून अग्निज्वाळांचा लोट निघाल्यासारखें सभोवारच्या नोकरांना वाटूं लागलें.

वेषधारी निहालसिंग पोलादी तलवारीच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण शब्दांत बोलूं लागला, "चंदासाहेब, तूं मला ओळखलेंस काय? वाघाचीही गाय करून सोडणाऱ्या ह्या तुझ्या मूर्तिमंत काळाला तूं अजून ओळखलें नाहींस वाटतें ! आजवर हरघडीं तुझ्या दुष्ट बुद्धीचा डोलारा हाणून जमीनदोस्त करणाऱ्या आणि तुझ्या शत्रूंना पावलोंपावलीं उत्साहाची जोड मिळवून देऊन तुला गाडण्यासाठीं अहर्निश झटणाऱ्या तुझ्या ह्या हाडवैरिणीला नीट पाहून घे."

निहालसिंग बोलूं लागला त्या वेळीं चंदासाहेबाला त्याच्या शब्दावरून त्याची ओळखही पटूं लागली, व जखमेवर मिठाचें पाणी शिंपडल्याप्रमाणें त्याच्या शतधा-विदीर्ण अंतःकरणाला असह्य वेदना होऊं लागल्या. तो पुरुष नसून ती मोहना असल्याबद्दल त्याला आतां शंका उरली नाहीं. मीनाक्षीराणी आणि मोहना जगांतून नाहींशा झाल्याबद्दल आजवर कानावर आलेल्या सर्व गप्पा खोट्या असल्याचें त्याला आतां पूर्णपणें—निदान अंशतः तरी कळून आलें. तशा शतधाविदीर्ण वृत्तींतच त्यानें मोहनेच्या चर्येकडे पुन्हा एकवार भीत भीत नुसतें न्याहाळून पाहिलें, त्याबरोबरच मोहनेनें त्याला तुच्छतापूर्वक विचारलें, "मूर्खा, पाहतोस काय ?"

"काय; आजवर माझा सतत सूड घेणारा आणि मला रसातळाला नेऊन पोंचविणारा तूं यःकश्चित् बायकोच होतास तर ! अरेरे ! काळ फिरला कीं सामर्थ्यवान् माणसांच्या सामर्थ्याचेही कोळसे होतात व तो दुबळा ठरून प्रतिकूल परिस्थितीच्या पायांखालीं निष्ठुरपणें तुडवला जातो तो असा !" तो स्वतःशीं म्हणाला. पुढें त्याच्याच्यानें स्वतःच्या मनाशीं देखील बोलवेना. तरी पण त्याच्या मनांत विचारांचें जें काहूर उसळलें होतें त्याचा दृश्य परिणाम मोहनेला तात्काळ पहावयाला मिळाला.

चंदासाहेबानें मनस्तापाच्या भरांत ताडकन् कपाळावर हात मारून घेत-लेला पाहून मोहना कठोर स्वरांत उद्गारली, "आतां कपाळावर हात मारून रडत बसणें एवढेंच तुझ्या वांट्याला राहिलें आहे. आणि त्या बाबतींत तुला मनःपूर्वक सहाय करण्यासाठींच मी यावेळीं या ठिकाणीं आलें आहें. आतां तुझें भवितव्य सर्वस्वी माझ्या हातीं आहे. पापिष्टाला त्याच्या पापाचें

प्रायश्चित्त देण्यासाठीं परमेश्वर कोणाच्या तरी मुखीं उभा रहातो, व सुष्टांचें पालन आणि दुष्टांचें निर्दालन करून सृष्टीची यथान्याय नियंत्रणा करण्याचें महत्कार्य विश्वव्यापी आदिशक्तीकडून असेंच पार पाडलें जातें. ती आदिशक्ति आज माझ्या ठायीं संचारली आहे; आणि मी—एकदां तुझ्या विलासमंदिरांत कोंडून पडलेली ही मोहना आज तुझ्या पापांचें प्रायश्चित्त तुला देण्यासाठीं नव्या जन्मानें येथें आलें आहें. मी नुसता तोंडांतून शब्द काढण्याचा अवकाश, कीं या क्षणीं हें तुझें मस्तक धडावेगळें होईल. परंतु एवढें सुखाचें तडकाफडकीं मरण तुला येण्याइतकीं तुझीं पापें हलकीं नाहींत. तुझ्या मृत्यूला अमानुष छळाची प्रभावळ जोडल्याशिवाय जगांतील परमेश्वरी न्यायाचें यथावत् चित्र जगाला पहावयाला मिळणार नाहीं. यास्तव मी तुझ्या आयुष्याचा माझ्या मनाला वाटेल तसा शेवट करण्यापूर्वी तुला तुझ्या पापांची आठवण करून देऊं इच्छितें."

"पण मोहने, मी तुझा असा काय अपराध केला आहे ?"

"मीनाक्षीराणीला जन्मांतून कोणीं उठविलें ?—विश्वासघातानें त्रिचनापल्लीचें राज्य रसातळाला कोणीं नेलें ?—महादेवाचें पवित्र देवालय कोणीं भ्रष्ट केलें ?"

"त्याचा कैवार तुला घेण्याचें काय कारण ?"

"काय कारण ?—नीचा, मी भ्रष्ट झालें असल्यें तरी रक्ताची हिंदु आहें. हिंदु जातींत जन्मलेल्या कोणाही स्त्री—पुरुषाला आपल्या मायबहिणींच्या व आपल्या देवाधर्माच्या रक्षणासाठीं पंचप्राणांची कुरवंडी करण्याच्या निर्धारानें पुढें येण्याला कारण शोधावें लागत नसतें."

"एकूण तूं मीनाक्षीराणीबाबतचा सूड माझ्यावर घेण्यासाठीं आजवर धडपडत आहेस तर !"

"अर्थात् !"

"पण मीनाक्षीराणी कुठें आहे ?"

"कां ? तिला पुन्हा भुरळ पाडावयाची आहे काय ?"

"तिच्या व माझ्यामधील जिव्हाळ्याच्या नात्याची तुझ्यासारख्या त्रयस्थाला कल्पना येणें शक्य नाहीं. तिला एकवार माझ्यासमोर येऊं द्या; मग आमचें आम्ही पाहून घेऊं."

"नीचा !" मोहना धि:कारपूर्वक हंसून म्हणाली, "तुला अजून भ्रम आहे कीं आपण मीनाक्षीराणीला पुन्हा आपल्या मायावी सौंदर्याची भुरळ पाडूं शकूं; तिला पुन्हा आपल्या मोहजालांत गुरफटून टाकून आपलीशी करून घेऊं. पण तो काळ केव्हांच गेला. तुला याची खूणगांठ म्हणून सांगत्यें, मीनाक्षीराणी हा लोक सोडून गेली पण तिनें जातांना तुझ्यावर सूड घेण्याचें काम माझ्याकडें सोंपविलें आहे. त्यासाठींच मी आतां इथें आल्यें आहें."

## प्रकरण ३३ वें

## सूड !

आपलें जीवन हेंच सर्वस्व असें न मानणारा प्राणी कोण आहे? सामान्यतः जगांत धडकांवर धडका घेऊन मृत्यूच्या जबडयांत प्रविष्ट झालेला जातिवंत सर्प देखील शत्रूवर सूड घेण्याचा व स्वतःचे प्राण वाचविण्याचा विचार एकाच वेळीं निर्वाणीच्या भावनेनें करीत असतो. जीवाचें मोल जनावराला काय किंवा माणसाला काय, सारखेंच अमोल वाटतें. एरव्हीं स्वाभिमान, स्वधर्माभिमान व अब्रू अथवा अशाच कांहीं अन्य नाजूक भावना यासाठीं पंचप्राणाचें मोल देणारा लोकोत्तर वीर विरळा. अशा विरळा वीरांपैकीं चंदासाहेब खास नव्हता. तो शूर होता, वीर होता, परंतु सद्भावनेचा विटाळही त्याच्या अंतःकरणाला झालेला नव्हता. कट्टा धर्माभिमानी म्हणावा तर खोटचा मोलाची नागझरी त्याच्या मुखांतून स्रवत असे. पट्टीचा स्वाभिमानी वीर म्हणावा तर प्रसंगीं कमालीचा लाचारपणा पतकरून प्रतिपक्षासमोर आपला बचाव करण्यांत त्याचा हातखंडा होता. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तो एक नीच वृत्तीचा दुर्जन होता. त्याचा आजवर झालेला पराजय व त्याच्या वांटचाला आलेली अनेकविध विटंबना ही कोणाही तेजस्वी वीराला अशा विटंबनेपेक्षां मरण सहस्रपटीनें बरें असें भासविणारी होती. तरी त्याला स्वतःला अजूनही वाटत होतें कीं, काय वाटेल तें करून मीं माझा प्राण बचावला पाहिजे. आणि तो कशासाठीं, तर पूर्ववत् पापांची परवड रचण्यासाठीं, आणि पाशवी विषयलालसांचें नाना प्रकारचें चोज पुरविण्यासाठीं !

इतक्या हलक्या मनोवृत्तीचा चंदासाहेब होता, म्हणूनच त्याला त्या वैरी स्त्रीजीवासमोर मान नमवण्यांत तितकी नामुष्की वाटली नाहीं. त्याच्या मनांत त्यावेळीं विचार आले, " ही एक यःकश्चित् बटीक; हिला माझ्या पायाच्या कृपेशिवाय गत्यंतर नव्हतें, आणि स्वतःच्या भोगेच्छांचें चोज पुरविण्यासाठीं असले खेळ ज्यानें प्रत्यहि खेळावे, त्या ह्या नरपुंगव चंदासाहेबानें त्या एका यःकश्चित स्त्रीसमोर आज कशी मान नमवावी ! एवढा सामर्थ्यशाली व विजयशाली नबाब चंदासाहेब मी एका यःकश्चित् बटकीसमोर गोगलगाय बनलों तर तें पाहून जगाला काय वाटेल! येथल्या माझ्या नोकरचाकरांना काय वाटेल ! " परंतु येथवरच त्याच्या उचंबळत्या स्वाभिमानाची मजल

होती; त्यापेक्षां मरण बरें असें म्हणण्याची त्याच्या मनाची तयारी नव्हती. त्यानें मनांत भ्याडपणाला शोभेसा विचार केला, "आज माझा पडता काळ आहे. आज मला पडती घेऊनच वागलें पाहिजे. पण वेळ आली म्हणजे माझें खरें स्वरूप दीडदमडीच्या बटकी, तुला दिसून येईल, मरणान्तिक वेदनांनीं दुखवलेला सर्प जिवानिशीं बचावला म्हणजे तो मनांत कसा डाव धरतो आणि योग्य वेळीं संधि येतांच तो आपला डाव कसा साधतो, याचा अनुभव तुला अजून पटला नसला तर हा चंदासाहेब तो पटवून देईल. तुझी—एका यःकश्चित् बटकीची काय कथा ! मी मी म्हणविणारे रघोजी भोंसले, मुरारराव घोरपडे, यांसारखे पट्टीचे मराठे वीर आज मारे शेफारून गेले असतील कीं आपण चंदासाहेबाला नेस्तनाबूत केलें. परंतु त्या मूर्खांनीं एवढें लक्षांत ठेवावें कीं, तुम्ही चंदासाहेबाला अर्धमेला केला तरी त्याला तुमचा चावा घेण्यासाठीं जिवंत ठेवला आहे; तो जेव्हां पूर्ववत् पुन्हां सामर्थ्यशाली होऊन तुम्हांलाच दंश करील तेव्हां तुमचे डोळे उघडतील." हे सूडाचे विचार मनांतल्या मनांत घोळीत चंदासाहेबानें त्याच क्षणीं मोहनेसमोर आपली मान नमवली आणि दीनवाणीनें उद्गार काढले, "मोहने, वर्षाचे बाराही मास सारखे नसतात. आज माझा पडता काळ असला तरी नेहमींच तो तसा राहील असें नाहीं. शरद्ऋतूमध्यें अवकळा आलेलीं झाडें वसंतऋतूंत पुन्हां हिरव्यागार पल्लवराजीनें विभूषित होतात. अशुभ गोष्टी जबडा पसरून पुढें उभ्या राहिल्या तर त्यावर कालहरणासारखा दुसरा उपाय नाहीं. त्या पहिल्या वहिल्या रात्रीं मीं तुला माझी बेगम करण्याचें वचन दिलें, तें मी अद्याप विसरलों नाहीं. मीं जगामध्यें कुणाचा कांहींही अन्याय केला असला तरी तुला गुलाबाच्या फुलाप्रमाणें अलग तळहातावर झेलून धरलें होतें, हें तुला नाकबूल करतां यावयाचें नाहीं. तूं माझा सूड घेण्यासाठीं इतकी धडपड कां करतेस हेंच मला कळत नाहीं. सय्यदखानाच्या मरणानंतर तुला मीं माझ्या जनानखान्यांत आणलें, ते तुझ्यावर मीं केवढे उपकार केले बरें ! त्यावेळीं तुला जर माझा आश्रय मिळाला नसता तर सय्यदखानाच्या इतर नाटकशाळांची जी दुर्दशा झाली, तीच तुझीही झाली असती; व आज एखाद्या शिपाईप्याद्याची बटीक म्हणून राबण्याचें तुझ्या कपाळीं आलें असतें. तो माझा उपकार स्मरावयाचा सोडून मोहने, हें तूं काय आरंभिलें आहेस ?

हिंदुसमाजांत आपणाला स्थान आहे असें तुला वाटतें काय? त्यापेक्षां मी अजून तुला पूर्ववत् प्रामाणिक आणि मनमोकळेपणानें सांगतों कीं, तूं माझा छळ करण्याचें सोड आणि मला मार्ग मोकळा करून दे. इतकी जरी माझी दुर्दशा झाली आहे, तरी मी एकवार मोकळा सुटण्याचा अवकाश, कीं पुन्हां हां हां म्हणतां सैन्यसामुग्रीची जमवाजमव करून शत्रूला धूळ चारीन आणि तंजावर व त्रिचनापल्ली ह्या दोन्ही ठिकाणची राजलक्ष्मी तूं माझी बेगम या नात्यानें तुझ्या पायावर आणून लोळवीन. मीनाक्षी तिकडे मसणांत जावो. तिच्याशीं तुला काय करावयाचें आहे ? "

मोहना किंचित् विकट हास्य करून म्हणाली, "विश्वासघातकी नराधमा, हें वैभवलालसेचें सोनेरी जाळें तूं कोणासभोंवार फेंकतो आहेस याची तुला जाणीव आहे ? तुला काय वाटतें; ही मोहना श्रीरंगाच्या देवालयांतून त्या नरपशूच्या—तुझ्या दुष्ट व्याह्याच्या जनानखान्यांत संतोषानें आली, आणि तेथून तूं तिला आपल्या विलासमंदिरांत आणलीस तेव्हां ती हंसली, बोलली, तीं खऱ्या अंतःकरणानें बोलली असें ? "

"एकूण मूळपासूनच खरेपणा तुझ्या अंगीं नव्हता म्हणावयाचा तर!" चंदासाहेब बापुडवाण्या स्वरांत उद्गारला.

"नव्हता कां ? होता, ओतप्रोत खरेपणा माझ्या रोमरोमांत त्यावेळीं सळसळत होता. आणि अजूनही सळसळत आहे. ही मोहना जी आजवर जगली आहे, ती त्या खरेपणाच्या संजीवनीवरच होय. जगामध्यें सत्याचा शेवटीं जय होतो. ह्या जगांतील महत्त्वावर अजूनही माझा अढळ विश्वास आहे; आणि स्वतःच्या निःसीम श्रमांनीं सत्यमेवजयते याचा प्रत्यय माझ्या क्षुल्लक जीवाच्या शक्त्यनुसार जगाच्या निदर्शनाला आणून देणें हेंच ध्येय डोळ्यां-समोर ठेवून मी इतके दिवस जगलें आहें. मी कर्तव्यासाठीं जगलें आहें; सुखोपभोगासाठीं नाहीं."

मध्येंच चंदासाहेबानें विचारलें "मग तुझें कर्तव्य तरी काय ? "

"माझें कर्तव्य ! " मोहना एकदम चंडिकेचा अवतार धारण करून क्रोधानें नखशिखांत कांपत उद्गारली, "माझें कर्तव्य काय आहे हें तुला अजून कळत नाहीं ना ? " सच्छील हिंदु अबला तुमच्यासारख्या पाशवी-वृत्तीच्या अविंधांच्या हातीं सांपडून सर्वस्वाला बुडाली; तिनें आपल्यासारखेंच

अनेक भगनींचे धिडवडे निघालेले पाहिले; देवाधर्माची दुर्दशा देखील तिला अहर्निश पहावी लागली. ह्या सर्व अत्याचारांचें निर्मूलन करून, माझा धर्म–माझा आवडता हिंदुधर्म, आणि आमची शीलवती, सत्यवती, धर्मवती स्त्रीजात–स्त्री ही माता आहे हें नराधमा, तूं ओळखत नाहींस, म्हणून तुझ्या-सारख्या मात्रागमनी दुरात्म्यांना ह्या जगांतून नाहींसे करणें आणि सज्ज-नांच्या परित्राणांचा मार्ग निष्कंटक करणें हेंच माझें ध्येय; आणि त्या ध्येयाची पूर्तता मी आतां करणार आहें. मला तुझी भाकडकथा ऐकायला नको आहे. ऐक; ही मोहना आतां पूर्वीची ती दुबळी स्त्री उरलेली नाहीं. या क्षणीं तरी सर्वाधिकार माझ्या हातीं आहे, आणि म्हणूनच मी सांगेन त्याप्रमाणें तुला निमूटपणें वागलें पाहिजे." असें म्हणून मोहनेनें किंचित् मागें वळून आपल्या बरोबरच्या सशस्त्र शिपायांना आज्ञा केली, "याच्या मुसक्या बांधून याला खोलीबाहेर काढा आणि माझ्या मागोमाग याला फरफटत घेऊन चला."

आज्ञा होण्याचाच अवकाश, लगेच तिची अम्मलबजावणी झाली. दोघे सेवक मोहनेपुढें मशाली धरून चालूं लागले व त्याच्या मागोमाग दरवेशानें चालविलेल्या अस्वलाप्रमाणें बंदिवान चंदासाहेब चालविला जात होता. त्याचा तो बंदिवानाचा वेष आणि अपमानानें काळवंडलेली चर्या पाहून आजू-बाजूच्या सर्व शिपायांना व पहारेकऱ्यांना एक प्रकारचें कौतुक वाटत होतें. नाहीं म्हणावयाला यांत जे कोणी चंदासाहेबाच्या हंगामी अमदानींत बाटून मुसलमान होऊन यःकश्चित् ऐहिक स्वार्थाला लालचावलेले, होते त्यांना किंचित् हळहळ वाटली असेल, परंतु ती हळहळदेखील चंदासाहेबासाठीं नसून आपण त्याच्या नादानें आपण सर्वस्वाला बुडालों याची होती; व आतां नव्या हिंदु अमदानींत आपली काय दशा होणार अशी चिंताही त्या हळहळी-बरोबरच त्यांच्या मनांत डोकावत होती.

ती विस्मयजनक मिरवणूक रात्रीच्या भयाण वेळीं दोन मशालींच्या उजेडांत तेथून निघाली ती एका मागून एक चौक्या पहारे ओलांडून थेट टेकडीवरील महादेवाच्या देवालयाकडे वळली. इतका बंदोबस्ताचा तो किल्ला आणि राजवाडा, रात्रींच्या प्रहरीं हटकल्याशिवाय कोणालाही तेथें एकसुद्धां चौकी पहारा ओलांडून पुढें जाणें मुष्कीलीचें ! परंतु भगवान् श्रीकृष्णाच्या जन्माच्या वेळीं ज्याप्रमाणें मुसळधार पर्जन्यानें पहारेकऱ्यांचे कर्ण बधिर

करून सोडले आणि दुथडी भरून वहाणाऱ्या यमुनेनें त्या बाल वासुदेवासाठीं वाट मोकळी करून दिली, त्याप्रमाणेंच त्या मंडळींच्या अग्रभागीं मोहना आपल्या मर्दानी वेषांत चाललेली पाहून प्रत्येकानें कसलीही शंका मनांत न धरतां व कोणालाही न हटकतां मुकाटपणें या मंडळींना पुढें जाऊं दिलें, व वर आणखी मोहनेला त्रिवार मुजऱ्यांची खंडणीही दिली! ज्या चंदासाहेबाला आजवर नुसत्या राजवाड्यांतून हिंडतांना देखील सेवकांचे एकजात शेंकडों मुजरे मिळावयाचे, तेथें आज त्या बिचाऱ्याच्या वांट्याला एकही मुजरा येईना! अपवादादाखल म्हणून कीं काय शेवटच्या चौकी पहाऱ्यावरील पहारेकऱ्यानें गोंधळून म्हणा किंवा मनापासून म्हणा, मोहनेच्या मागोमाग ती मंडळी तेथून पार होऊं लागतांच चंदासाहेबाला मुजरा केला. तें पाहून मोहनेनें त्याच्याकडे एक तीक्ष्ण अर्थात् नापसंतीचा नेत्रकटाक्ष फेंकला व लगेच आपल्या मागील सशस्त्र सैनिकाकडे एकवार नजर फेकली. त्या नजरेच्या भरारीसरशीं त्या सैनिकानें आपली नागवी तलवार निमिषार्धांत त्या पहारेकऱ्यावर चालवून त्याचें शिर धडावेगळें केलें. त्या यःकश्चित् अपराधाबद्दल देहांत शासन ही शिक्षा फार कठोर होती हें तर खरेंच; परंतु चंदासाहेबासारख्या महाशत्रूला नुसता मुजरा करणें हें देखील केवढें भयंकर पाप आहे याची प्रत्यक्ष दहशत बसवण्यासाठीं मोहनेनें करविलेल्या त्या शिक्षेला असमर्थनीय तरी कसें म्हणावें !

# प्रकरण ३४ वें

## तंजावरांत

महादेवाच्या देवालयापाशीं जाऊन पोंचेतों अगदीं शांतपणें मोहना पुढें आणि ती मंडळी मागें चालत होती. देवालयापाशीं जातांच मात्र मोहना क्षणभर थबकली, त्याबरोबरच ते शिपाईही थबकले. मशालींच्या उजेडांत चंदासाहेबाच्या काळवंडलेल्या चेहऱ्याकडे निरखून पहात मोहना म्हणाली, "नीचा, तूं याच जागीं उभा राहून महादेवाचें देवालय जमीनदोस्त करण्यासाठीं हुकूम सोडला होतास ना? याच जागीं तुझ्या आयुष्याच्या अखेरची बोळवण होणें अवश्य आहे. हिंदूंचीं देव–देवालयें, हिंदु स्त्रिया, हिंदूंचीं राज्यें, हिंदूंची दौलत म्हणजे तुला आजवर पोरखेळ वाटत आला. हें महादेवाचें देवालय त्रिचनापल्ली राज्यांतील साऱ्या हिंदूंना परमपूज्य आहे. याच महादेवाच्या कृपाछत्राखालीं हें राज्य उदयाला आलें आणि वैभवशाली बनलें, आणि ह्याच ईश्वरी शक्तीच्या कोपामुळें ह्या राज्यावर आपत्ति आली. त्रिचनापल्लीच्या सर्व राज्याचा व्यवहार आपल्या इच्छामात्रें करून चालविणाऱ्या या परमपवित्र परमेश्वराची विटंबना करण्यासाठीं निर्लज्जपणें धजणाऱ्या दुरात्म्या,"–मोहना दीपज्योतीनें प्रज्वलित केलेल्या त्या देवालयापलीकडील प्रकाशमान कड्याकडे बोट दाखवून म्हणाली, "ह्याच कड्यावरून आज मी तुझा कडेलोट करणार आहें. शिपाई हो, पहातां काय, एका क्षणाचाही विलंब न लावतां या शिक्षेची अंमलबजावणी करा.–पण थांबा. याच्या घोर पापांना एवढें प्रायश्चित्त देखील पुरेसें होणार नाहीं." ती एकदम चंदासाहेबाकडे वळून म्हणाली, "चांडाळा, त्या पहिल्या दिवशीं मला राणीच्या रंगमहालांत कोंडलेंस तेव्हां काय प्रौढी मारलीस ती तुला आठवते? त्या सर्व दुर्दैवी अबलांसमोर तुला मी प्रथम आपल्या पापांचा पाढा वाचावयाला लावणार आणि तिथें राजवाड्यांतील यःकश्चित् दासींकडून तुझी खेटरपूजा बांधून मग तुझा कडेलोट करणार."

मोहनेच्या तोंडचें वाक्य पुरें होतें न होतें तोंच मागाहून कोणीतरी चार पांच माणसें धांवत तेथें आलीं. 'बुडत्याला काडीचा आधार' या न्यायानें चंदासाहेबाला वाटलें कीं, आपणाला तारावयाला कोणी आले काय! मोहना स्तब्धपणें तिकडे पाहूं लागली तोंच तीं माणसें अगदीं जवळ आलीं.

मोहनेला संशय आला कीं आपण चंदासाहेबाचा असा शेवट करण्याचें योजिलें आहे हें षट्कर्णी झालें असावें व आपल्यांतीलच कांहीं खाशी मंडळी त्या गोष्टीला प्रतिबंध करण्याला आली असावी. तिनें आपला आतांचा बेत मनांतल्या मनांत रद्द करून घाईघाईनें शिपायांना पुन्हां आज्ञा केली, "पहातां काय? या क्षणाला या चांडाळाला महादेवाच्या कड्यावरून खालीं लोटून द्या."

हुकुमाची तामिली करण्यासाठीं शिपाई पुढें सरसावणार तोंच मागाहून येणाऱ्या मंडळींपैकीं एकानें धांवत पुढें येऊन सांगितलें, "हां हां! सरदारसाहेब, आपली आज्ञा कृपा करून मागें घ्या. ह्या राजबंद्याला आजच मारावयाचें नाहीं असा मुराररराव घोरपडे, रघूजी भोंसले वगैरे खाशा मंडळींचा सक्त हुकूम असतांना तुम्हीं हें काय आरंभिलें आहे?"

चंदासाहेबाला प्रथम जी एक आशा वाटत होती तीही आतां वाटेनाशी झाली. "मराठे आपणाला तूर्त जिवंत ठेवणार तें एवढ्याचसाठीं का? कीं कर्नाटकांतील विसकटलेल्या राजकारणाची घडी नीट बसविण्याच्या कामीं शक्य तेवढा आपला उपयोग करून घ्यावयाचा, आणि मग मार्गांतून आपला कांटा दूर करावयाचा?" ही शंका आकाशवाणीसारखी सत्य होती. त्याचें प्रत्यंतर खुद्द त्याला दुसऱ्याच क्षणाला ऐकावयाला मिळालें. मोहना त्या अज्ञात माणसाच्या विरोधामुळें कांहींशी रागावून खवळून उद्गारली, "माझ्या भगीरथ प्रयत्नांनीं गळाला अडकलेल्या माशावर मराठ्यांचा खरें पाहूं जातां कांहींच हक्क पोंचत नाहीं. रक्ताला रक्त आणि सूडाला प्रतिसूड हा जगाचा न्याय आहे. मी या सावजाला या क्षणीं जिवंत ठेवायला तयार नाहीं."

पूर्वींचा तोच माणूस पुन्हां उद्गारला, "छे छे! सरदारसाहेब, हा आततायीपणा चांगला नाहीं. तुम्हांला तेवढा हा शत्रुसा भासतो आणि मराठे त्याला मित्र समजून कर्नाटकचा नबाब करणार आहेत असें थोडेंच आहे! परंतु आपल्या ध्यानांत आलेंच असेल कीं सरदारसाहेब, आपल्या धंद्यांत

निर्ढावलेला कुशल कसाई, कसाईखान्यांत दुभत्या गाईच्या मानेवरून सुरी फिरविण्यापूर्वी तिच्या स्तनांतील उरलें-सुरलें घोंटभर दूध देखील काढून घ्यावयाला कधीं विसरत नाहीं. माझी उपमा कांहींशी अस्थानीं आहे खरी. मराठे कसाई वृत्तीचे मुळींच नाहींत. परंतु त्यांना जर ह्या कलिपुरुषाच्या जीविताचें त्याच्या मरणापेक्षांही जास्त मोल मिळावयाचें असेल, तर त्याला कोणीं कशाला आड यावें ! "

चंदासाहेबाची स्थिति ते उद्‌गार ऐकून मेल्याहूनही मेल्यासारखी झाली. यांत मराठ्यांचा कांहीं तरी विशिष्ट हेतु असला पाहिजे व त्यांनीं संकल्पिलेल्या राष्ट्रकार्याला आपण आततायीप्रमाणें खो घालणें बरें नाहीं, असें मोहनेला वाटून तीही किंचित् सौम्य वृत्ति धरून प्रत्युत्तरादाखल उद्‌गारली, "खाशा मराठ्यांचीच तशी आज्ञा आहे त्याला माझा नाइलाज आहे. मींही आजवर जे जे प्रयत्न केले—तुमच्या मुराररावांना आणि रघोजी भोंसल्यांना तुम्ही सांगा कीं मोहना आजवर निर्मम भावनेनें ह्या देशकंटकाला धुळीला मिळवण्यासाठीं अहर्निश झटली ती केवळ वैयक्तिक सूड घेण्यासाठीं नव्हे, तर राष्ट्राच्या कल्याणासाठींच होय." ती एकाएकीं थांबली. तिच्या मनांतून बरेंच बोलावयाचें होतें. परंतु तो ओघ एकाएकीं फल्गू नदीप्रमाणें गुप्त झाला. ती एकदम लाजेनें खालीं पाहूं लागली.

तिची अशी अवस्था कां झाली याचें कारण असें कीं, आजवर ती जी कर्नाटकच्या मोहिमेंत नाना स्वरूपांनीं स्वैरसंचार करीत आली, ती बहुधा मोहन व निहालसिंग या नांवांनींच; व तीं नांवें सर्वांच्या परिचयाचीं होतीं. मोहनेला तत्त्वतः आतां कोणीच आठवीत नव्हता. कारण मोहना या जगाला सोडून गेल्याचें कोणत्याही कारणामुळें असो, सर्वांना विदित झालें होतें. त्या रहस्याचा स्फोट आपल्याच तोंडानें झाला, व आतां आपणाला अजिबात निराळ्या परिस्थितींत वावरावें लागणार, या विचारांनींच मोहनेला लाजविलें. लज्जाविनयसंपन्नता हाच स्त्रियांचा नैसर्गिक धर्म व हेंच त्यांचें नैसर्गिक सौंदर्य होय. बिचारी मोहना तरी त्या नैसर्गिक नियमाला अपवाद कशी ठरावी !

* * *

लवकरच चंदासाहेबाला त्रिचनापल्लीहून तंजावर येथें आणण्यांत आलें,

व एक दिवस त्याचा न्याय करण्यासाठीं दरबार भरविण्यांत आला. प्रतापसिंह महाराज अर्थातच त्या दरबाराचे मुख्य अधिपति होते; व मुराररराव घोरपडे, रघूजी भोंसले वगैरे मातबर मराठे वीर आपापल्या दर्ज्याप्रमाणें महाराजांच्या डाव्या–उजव्या बाजूला बसले होते. दरबार प्रतापसिंहमहाराजांच्या दरबारमहालांतच भरविण्यांत आला होता. जगाला दिसावयाला तो विजय जरी प्रतापसिंहमहाराजांचा होता, तरी तत्त्वतः विजयश्रीनें मुराररराव घोरपडे, रघूजी भोंसले वगैरे मराठ्यांनाच वरिलें होतें. त्यांच्या पराक्रमाशिवाय अर्थात् छत्रपति शाहूमहाराजांच्या साह्याशिवाय आपला तरणोपाय नव्हता हें ध्यानीं घेऊन प्रतापसिंहमहाराजांनीं सर्व खाशा मराठे सरदारांना त्या दरबारांत पहिल्या ओळींत मान्यतेचीं स्थानें दिलीं होतीं. सखोजी वगैरे महाराजांच्या दरबारांतील खाशांना दुसऱ्या ओळींत स्थान मिळालें होतें. मीरअसद, सफदरअल्ली वगैरे शत्रुपक्षाकडील पुढाऱ्यांनाही त्या दरबारांत मान्यतेचें स्थान मिळालें होतें, परंतु याचें कारण उघड होतें. कांट्यानें कांटा काढण्यासाठीं मराठ्यांनीं ह्या दोन कळसूत्री बाहुल्यांचा प्रस्तुतच्या मोहिमेच्या कामीं उपयोग करून घेतला होता व त्याबद्दल त्यांचा हा तोंडदेखला गौरव चालला होता. ह्या सोहळ्यांत मानाजीराव सामील असलेला मात्र दिसत नव्हता.

प्रस्तुतच्या मोहिमेंत मराठ्यांच्या पहिल्या हल्ल्यांतच नबाबाचा पक्ष नामोहरम झाला व दमलचेरीच्या घाटांतील तुंबळ युद्धांत नबाबाच्या वर्चस्वाला मूठमाती मिळाली, तेव्हां त्या वठलेल्या वृक्षावर जीव धरून राहिलेलीं जीं कांहीं बांडगुळें मराठ्यांच्या हातीं लागलीं त्यांतीलच सफदरअल्ली व मीरअसद हीं दोन माणसें होतीं. खरें पाहूं जातां नामुष्कीचा असा तह मराठ्यांशीं करून ते दोघेही पूर्वींच मराठ्यांच्या ताटाखालील मांजरें बनले होते, व त्यांचा दरबारांत मानमरातब वगैरे ठेवून सध्यां जे देखतभुलीचे देव्हारे माजविण्यांत येत होते, त्याचा अर्थही आपल्या ताटांखालील मांजरांचे लाड पुरविण्यापेक्षां निराळा कांहीं नव्हता.

असो. बंदिवान चंदासाहेब तेथें प्रविष्ट होतांच एकवार विषण्ण चित्तानें सभोंवार पाहूं लागला तेव्हां प्रथमच त्याची आणि मीरअसद व सफदरअल्ली या दोघांची दृष्टादृष्ट झाली. ते दोघे त्याला पाहून कुत्सितपणानें हंसले.

त्याबरोबर चंदासाहेबानें तिरस्कारानें खालीं मान घातली. त्या दोघांच्या हंसण्याचा अर्थ मुंगी होऊन साखर खावी आणि हत्ती होऊन लाकडें फोडावीं असा होता, तर चंदासाहेबाच्या हंसण्याचा अर्थ 'धन्याच्या दारीं ठाणबंदी असलेला कुत्रा कितीही ऐषआराम भोगीत असला तरी त्याला वनराजाची योग्यता कधींच यावयाची नाहीं' असा होता. तो मनांतून त्या दोघांना फितुरीबद्दल सहस्रशः दोष देत होता.

चंदासाहेब तेथें प्रविष्ट होतांच सर्व सभासदांची दृष्टि एकदम त्याच्याकडे वेधली गेली. तसें होणें सहाजिकच होतें. अनेकांना–नव्हे बहुतेकांना त्याची ती शोचनीय अवस्था पाहून आनंदच वाटला. परंतु मुरारराव घोरपड्यांनीं मात्र लगेच आपल्या बैठकीवरून उठून प्रतापसिंह महाराजांना नम्रतापूर्वक विनंति केली, "महाराजांनीं चंदासाहेबाला बंधमुक्त करावें व त्यांना योग्य तो मान द्यावा. एकानें गाय मारली म्हणून दुसऱ्यानें वासरूं मारणें बरें नव्हे."

# प्रकरण ३५ वें
# दरबारांतील प्रकार

लगेच प्रतापसिंहमहाराजांनीं चंदासाहेबाला बंधमुक्त करण्याचा हुकूम केला व त्याला आपल्या जवळ सामान्य मानकऱ्यांमध्येंच पण अलग असें स्थान दिलें. ही सारी कारवाई अर्थातच मुरारराव घोरपडे वगैरे खाशा मराठ्यांची होती. दरवेशी अस्वलाला खेळवतो त्याप्रमाणें त्यांनीं चंदासाहेबाचा हा खेळ चालविला होता. परंतु चंदासाहेबाला मात्र कदाचित् वाटलें असेल कीं आपली ही जी विटंबना होत आहे तिला खाशा मराठ्यांची मान्यता नाहीं, व म्हणूनच अजूनही आपणाला त्यांच्या साह्यानें वर डोकें काढण्याला वाव आहे.

चेंचून अर्धवट जिवंत सोडलेल्या सर्पाला सूडाशिवाय दुसरें काय सुचणार! परंतु चंदासाहेबाला आपलें मनोगत तेथें उघड बोलून दाखवितां येणें शक्यच नव्हतें. थोड्याच वेळांत रीतसर दरबारी कामाला सुरवात झाली. दरबारी रीतिरिवाजाप्रमाणें सर्व नित्यनैमित्तिक शिष्टाचार, मुजरे वगैरे पार पडल्यावर मुराररराव घोरपड्यांनीं रघूजी भोंसल्यांच्या सांगण्यावरून साताऱ्याहून छत्रपतींकडून आलेला खलिता भर दरबारांत वाचून दाखविला. त्याचा आशय, चंदासाहेबाला राजकीय कैदी म्हणून समजण्यांत येऊन त्याला आजन्म कैद भोगण्यासाठीं साताऱ्याला पाठवून द्यावें, असा होता. प्रतापसिंहमहाराजांना अर्थातच तो खलिता शिरसावंद्य होता. चंदासाहेबानें मात्र या पूर्वींच कांहीं दिवसांपासून आपली व आपल्या मुलांची मुक्तता होण्यासाठीं नानापरींचे प्रयत्न चालविले होते, व त्याबद्दल मराठ्यांना आठ लाखांची जबर खंडणीही देऊं केली होती. त्याच गोष्टीचा पुनरुच्चार करून तो दरबारांत उद्गारला, " मराठ्यांना पाहिजे असेल तर मी आठ लाखांपेक्षां जास्त देखील खंडणी द्यावयाला तयार आहें. परंतु त्यांनीं मला आणि माझ्या मुलाला बंधमुक्त करावें. एवढें झाल्यास मी त्यांच्याशीं दोस्तीचा तह करीन व उभयतांच्या साह्यानें एकमेकांना भावी राजकारणाचे प्रश्न अधिक सलोख्यानें सोडवितां येतील."

परंतु चंदासाहेबाच्या या शब्दावर तेथें कोण विश्वास ठेवणार ! नाहीं म्हणावयाला बाबूजी नाईकासारखा सावकारीवर महत्त्वाला चढलेला एखादा भिक्षुक मात्र पैशाच्या राशींना भाळावयाचा ! नाईक स्वतः त्या दरबारांत हजर होतेच. ते एकदां भोंसल्यांच्या व लगेच मुराररावांच्या कानाशीं लागून कुजबुजले, "चंदासाहेब जर पैसा द्यावयाला तयार आहे, तर त्याच्याकडून दहा–वीस लाख रुपये घेऊन त्याला सोडून द्या ना कां ? सर्पाला दांत पाडून सोडला म्हणजे त्याचें भय मुळींच रहात नाहीं. आपणालाही तिकडे नित्य नव्या नव्या स्वाऱ्यांपायीं खर्चामुळें हैराणगत होते; ती अडचण दहा वीस लाख मिळाले तर तेवढ्यानेंच मिटेल."

रघूजी भोंसले हे हरएक कामांत नाइकांचे साथीदार असल्यामुळें ते त्यांना कधींही कोणत्याही चुकीबद्दल वर्मी झोंबेल असें बोलत नसत. परंतु मुरार-रावांना त्यांचा कसला मुलाहिजा ! ज्याला राजकारणाचा श्रीगणेशाही कळत नाहीं, शौर्याचा स्पर्शही ज्याला कधीं झाला नाहीं, असला नाईक हा एक भिक्षुकी पेशाचा सावकार गडी आहे, व तो निष्कारण भोंसल्यांच्या छायेखालीं उभा राहून हरएक राजकारणांत अगांतुकपणें लुडबूड करतो, हें मुराररावानीं अनेकदां पाहिलें होतें व त्याबद्दल त्यांना तिरस्कारही वाटू लागला होता. त्याच नाइकांच्या तोंडाला चंदासाहेबानें देऊं केलेली जबर खंडणी ऐकून पैशासाठीं पाणी सुटावें यांत मुराररावांना नवल जरी वाटलें नाहीं, तरी अत्यंत तिरस्कार मात्र वाटला. ते नाइकांच्या कानाशीं लागून खोंचकपणें हळूच म्हणाले, "पण नाईक, ते दहा–वीस लाख रुपये दक्षणा म्हणून तुमच्या भिक्षुकी सदरांत जमा होऊन तुमच्या सावकारी पिशवीचें बूड थोडेंच जड होणार आहे !"

मुराररावानीं हंसत हंसत फेंकलेला तो शालजोडींतील लालभडक जोडा नाइकांच्या गालाला चांगलाच लागला व गाल चांगलाच रंगला. परंतु तो प्रसंगच 'तेरे चूप मेरे चूप' असा होता. मनांतल्या मनांत गाल चोळीत स्वस्थ बसण्याशिवाय व जणुं काय आपली फजिती झालीच नाहीं असें दर्श-विण्यासाठीं उसनें हंसें चेहऱ्यावर दर्शविल्याशिवाय त्यांना त्यावेळीं गत्यंतरच नव्हतें. मुरारराव जरी हळू बोलले तरी रघूजी भोंसल्यांना व जवळच्या कांहीं मंडळींना तें ऐकूं गेलें. त्यांनाही त्यामुळें हंसूं आलें. परंतु एक तर तो दरबार

व दुसरें, नाइक हें एक बडें प्रस्थ, म्हणून मोठ्यानें कोणीही हंसलें नाहीं. नाइकांनीं मात्र खाई त्याला खवखवे या न्यायानें चोरट्या नजरेनें आजूबाजूला पाहिलें, तेव्हां तो एकंदर प्रकार त्यांच्या ध्यानीं आला. त्याबरोबर त्यांनीं काढेचिराईत प्याल्यासारखें तोंड करून मान जी खालीं घातली ती कांहीं क्षण वर केलीच नाहीं.

प्रतापसिंहमहाराजांनीं चंदासाहेबाची विनंति ऐकून अभिप्रायार्थ मुरारराव व रघूजी भोंसले यांच्याकडे नजर वळविली. त्या पहाण्याचा अर्थ उघड उघडच 'पुढें काय करावयाचें' असा प्रश्नार्थक होता. चंदासाहेबाचें भवितव्य सर्वस्वीं सातान्याकडून आलेल्या त्या दोन मराठे मुत्सद्यांच्या धोरणानें ठरविणें हेंच प्रतापसिंहमहाराजांचें त्या वेळचें कर्तव्य होतें, व तेही राज्यमदाच्या धुंदींत आपल्या कर्तव्यांत कुचराई करण्याला तयार नव्हते. मुरारराव व रघूजी भोंसले या दोघांनींही आपसांत चार दोन शब्दांत कांहींतरी खलबत करून पुढें काय करावयाचें तें ठरविलें, व चंदासाहेबाच्या विनंतीला मुराररावांनीं उठून उत्तर दिलें, "आम्हांला चंदासाहेबांची विनंति मान्य करतां येती तर तसें करण्यांत फार आनंद वाटला असता. परंतु महाराजांची आज्ञा, तिथें आमचा नाइलाज आहे. शिवाय चंदासाहेब व त्यांचे चिरंजीव यांच्या जीविताची किंमत आम्हांला इतकी अमोल वाटते कीं आठ लाखांनींच काय पण दहा—वीस लाखांनीं देखील त्या किंमतीला मर्यादा घालणें म्हणजे त्या थोर दर्जाच्या बापलेकांचा अपमान करणें होय."

मुराररावांचे ते डावपेंचाचे शब्द सोन्याच्या सुरीप्रमाणें चंदासाहेबाच्या जिव्हारीं जाऊन झोंबले. तरी पण त्याचा स्पष्ट अर्थ त्या मूढाच्या ध्यानीं आला नाहीं. तो असें समजला कीं मुराररावांना ही संधी साधून आपणाला पिळून निघेल तेवढा पैसा काढावयाचा आहे. तो किंचित् रागाच्या भरांत उद्गारला, "मला ह्या डावपेंचाचा अर्थ कळतो. डोईजड खंडणी मागून मला भिकारी बनवून सोडण्याचा घोरपड्यांचा उद्देश यांत स्पष्ट दिसून येत आहे. पण पिंजऱ्यांत कोंडल्या गेलेल्या सिंहाला खडे मारण्यांत त्यांना जर एवढा पुरुषार्थ वाटतो तर माझें कांहीं म्हणणें नाहीं. त्यांनीं स्पष्ट शब्दांत किती खंडणी पाहिजे हें मला सांगावें, म्हणजे मी त्याचा विचार करूं शकेन. मात्र पैशासाठीं माणुसकीला हरताळ फांसण्याइतका मराठ्यांचा बाणा कच्चा

आहे, हें मला आज कळून चुकलें, ”

केवळ संतापाच्या दर्पांत चंदासाहेब हें बोलत आहे, हें मुरारराव, भोंसले वगैरे सर्व मंडळींना तेव्हांच कळून चुकलें व सर्वांना त्याची चीडही आली. पडत्या काळीं देखील जे वीराग्रणी कोणाचीं असलीं अरेरावीचीं उणीं उत्तरें सहन करणारे नव्हते, ते आज विजयश्रीचे धनी शोभत असतां चंदासाहेबाची ती दर्पोक्ति कशी सहन करणार? दरबारचा सर्व रंग चंदासाहेबाच्या त्या उद्‌गारांनीं पालटल्याचें मराठे मानकऱ्यांच्या चर्येवरून उघडपणें ओळखतां येत होतें. त्या निषेधपर भावनेला रघूजी भोंसल्यांच्या वाणीनें तोंड फुटलें. ते एकदम संतापानें उभे राहिले व आपल्या नेहमींच्या खड्या आवाजांत बोलले, “मराठ्यांचा बाणा काय आहे हें अजूनही ह्या मराठ्यांच्या चरणधुळींत लोळत पडलेल्या उपऱ्या नबाबांना समजलेलें नाहीं. पडलों तरी माझेंच नाक वर हा बाणा ज्या आरंभ–शूरांचा, त्या असल्या नबाबी खाक्याच्या झब्बूंना मराठी बाण्याची ओळख पटण्याइतकी त्यांची पात्रताच नाहीं. मराठ्यांनीं जिथें खुद्द आपले प्रतिस्पर्धी चरणधुळींत लोळवले, तिथें त्यांची संपत्ति त्यांनीं मनांत आणल्यास लुटून आणण्याला त्यांना कितीसा उशीर! पण जितक्या अरेरावीनें हा धनलोभाचा आरोप मराठ्यांवर करण्यांत आला, तितक्याच खणखणीतपणानें तोंडीस तोंड म्हणून माझा जबाब असा कीं, आम्हांला कोटमाप संपत्ति मिळाली तरी ती नको आहे. त्या संपत्तीचा दिमाख बाळगणाऱ्या नबाबालाच ह्या अरेरावीचें प्रायश्चित्त म्हणून आम्ही आमच्या अन्नावर जगवून आमच्या अजबखान्यांतील प्रेक्षणीय वस्तु करून ठेवणार आहों. चंदासाहेबांनी आजन्म मराठ्यांचे बंदिवान् म्हणूनच आयुष्य कंठणें आतां प्राप्त आहे. निदान बेमुर्वतखोरपणानें बोलून मराठ्यांची मेहेरबानी कोणालाही संपादन करतां येत नाहीं, हें त्यांना कळूं लागेपर्यंत तरी त्यांनीं आमच्या सातारा राजधानींतील बंदिखान्याची हवा चाखत खितपत पडलेंच पाहिजे.”

“एकूण हा सारा सूडाचा मामला आहे तर! मग तेथें माझा नाइलाज आहे. परंतु हें मराठ्यांचें कर्तव्य विश्वासघाताचें होईल व त्यांच्या सच्चेपणाला यामुळें चांगलाच बाट लागेल, एवढें त्यांनीं ध्यानांत ठेवावें. मला माझ्या योग्यतेप्रमाणें वागविण्यांत येईल या भरंवशानेंच मी मराठ्यांच्या स्वाधीन झालों. असल्या नामुष्कीच्या स्थितींत राहण्याचें माझ्या नशिबीं आहे हें जर

मला पूर्वींच कळतें, तर मीं अशा प्रतिस्पर्ध्याची ताबेदारी पत्करण्यापेक्षां धारातीर्थीं मरण हजार पटीनें सुखाचें मानलें असतें." चंदासाहेब आवेशा आवेशानें म्हणाला.

"हें पहा चंदासाहेब, तुम्ही आमच्या हातीं खुषीनें लागलां नाहीं, तर नाइलाजामुळें तुम्हांला आमच्यापुढें शरण येणें भाग पडलें. हा खरा प्रकार आमच्यापासून लपवून ठेवून असली वाष्कळ वल्गना तुम्हीं कितीही केली तरी तिला एथें अरण्यरुदनाइतकेंही मोल मिळणार नाहीं."

मुराररावांचें पुरतेंपणीं बोलून होण्यापूर्वींच दरबारांतील स्त्रियांच्या सज्जांतून चिकाच्या पडद्याआडून अकस्मात् उद्‌गार निघाले, "इतका जिवाचा उदारपणा तुमच्या अंगीं होता, तर त्रिचनापल्लीच्या किल्ल्यांत यःकश्चित् एका स्त्रीसमोर तुम्ही एखाद्या कोंकराप्रमाणें भागूबाईसारखी मान कां नमविली? एखाद्या लतकोडग्या कुत्र्याप्रमाणें तुम्ही त्या स्त्रीच्या पायां कां पडलां?"

# प्रकरण ३६ वें

# महाराजसुध्दां मोहून गेले

उल्कापात झाल्याप्रमाणें त्या अज्ञात् उद्‌गारांचा दरबारावर परिणाम झाला. तो वाग्बाण कोठून निघाला हें जरी सर्वांना कळलें नाहीं तरी चंदासाहेबाला कळलें; व आणखीही कांहीं खाशा मराठ्यांना कळलें असेल. वाचकांनाही मोहनेनें त्रिचनापल्लीच्या किल्यांत चंदासाहेबाला देहान्त शासन देण्यासाठीं रचिलेल्या व्यूहाची आठवण असेलच.

मुराररराव त्या अनाहूत उद्‌गारांकडे बळेंच दुर्लक्ष करून पुढें म्हणाले, "आणखी असें पहा, घोडा पेंड खातो तो आपल्या गुणानें खातो. परंतु सर्पाच्या विषारी मनोवृत्तीप्रमाणें त्याच्या शरीराची रचनाही विधात्यानें अशी विचित्र केलेली असते कीं त्याला दुधानें पोसलें तरी त्या दुधाचें त्याच्या पोटीं विषच बनावयाचें. तुम्हांला कैद झाल्या दिवसापासून आजवर खरो-खरच आम्ही फार मान्यतेनें वागवीत आलों आहोंत. परंतु तुम्ही आजच्या या भर दरबारांत अपराधी या नात्यानें उभे असतां, आमचा म्हणजे पर्यायानें छत्रपतींच्या सत्तेचा उण्या-दुण्या शब्दांनीं उपमर्द चालविला आहे; त्याबद्दल तुम्हांला शासन करणें योग्य आहे. दुर्दैवाची गोष्ट ही कीं, छत्रपती सरकारांचा हुकूम आपणाला बंदिवान करून सातान्याला आणावें असा आहे, त्याऐवजीं आपला न्याय-मनसुभा करण्याचा अधिकार जर आमच्या हातीं असता, निदान महाराजांचा हुकूम जर आमच्या हातीं आला नसता, तर तुमची दशा यावेळीं अगदीं वेगळी झाली असती. आम्हांला शिळ्या कढीला ऊत आणा-वयाचा नाहीं. परंतु तुम्ही मराठ्यांवर गैरविश्वासूपणाचा छद्मी आरोप पावलोपावलीं करीत आहां, म्हणून तुम्हांला असें कठोर शब्दांनीं विचारणें प्राप्त आहे कीं विश्वास ही चीज तुमच्या गांवीं तरी आहे काय? त्रिचना-पल्लीच्या विधवा राणीला तुम्हीं फसवून त्रिचनापल्लीचें राज्य बळकावलें तेव्हां विश्वास तुम्हांला कसा आठवला नाहीं ?"

आतां हें प्रकरण पुन्हां विकोपाला जाणार व चंदासाहेबाची अवस्था फार बिकट होणार असें जरी सर्वांना वाटलें, तरी त्याबद्दल थोडीफार हुरहूर ज्यांच्या मनाला वाटणें शक्य होतें असे मीरअसद व सफ्दरअल्ली हे दोघेच काय ते त्या ठिकाणीं होते. त्यांना म्हणजे तरी मनांतून चंदासाहेबाविषयीं प्रेम वाटत होतें असें नाहीं, परंतु पाण्यापेक्षां रक्ताचा संबंध जवळचा असतो या न्यायानें ते मुसलमान व तो मुसलमान 'न जाणो, अल्लाची खैर झाली तर आज ना उद्यां नबाबाच्या पक्षाला जोर लागेल त्या वेळीं आपण मराठी सत्तेचीं पाळें–मुळें कर्नाटकांतून खणून काढूं. तसें झाल्यास नबाबशाही पुन्हां जारी करण्याच्या कामीं चंदासाहेबाचा आपणाला फार उपयोग होईल' अशा भविष्य काळाविषयीं ते दोघे मनांत मांडे चुरीत होते. सफदरअल्ली त्या चिघळूं लागलेल्या परिस्थितीला इष्ट अशी कलाटणी देण्याच्या हेतूनें प्रेरित होऊन मध्येंच उभा राहिला व मुरारराव, रघूजी भोंसले आणि प्रतापसिंह महाराज वगैरे सर्वांना उद्देशून म्हणाला, "आपण चंदासाहेबांची सध्यांची दुबळी स्थिति लक्षांत आणा. त्यांच्याप्रमाणें एके काळीं वैभवशिखरावर चढलेला पण दुर्दैवाच्या फेऱ्यामुळें आज आपत्तीच्या गर्तेत पडलेला कोणता माणूस अशा वेळीं मनानें स्थिर राहूं शकेल? त्यांच्या तोंडून अपशब्द निघाले असतील तर त्याबद्दल आम्ही आपली माफी मागतों."

तोंच चंदासाहेब आपल्या जागेवरून सर्पासारखा फुत्कारत उद्गारला, "असल्या कम्बख्त् नामर्दांची शिष्टाई मला नको आहे. असल्या शिष्टाईवर जगण्यापेक्षां मला जगण्याचा मोह आवरेनासा झाला तर मी एकदां सोडून शंभरदां या शूर मराठ्यांच्या पायांवर मस्तक ठेवून जीवदयेची भीक मागेन. वीरानें वीरापाशीं दयेची याचना करण्यांत लांच्छन नाहीं. परंतु अशा नामर्द स्वकीयांकडून आपली अशा वेळीं तरफदारी करून घेणें हें मात्र खरोखरच मला लांच्छन वाटतें."

सफदरअल्ली पुन्हां म्हणाला, "चंदासाहेब, आपला दगडाखालीं सांपडलेला हात हलके हलके कसा काढून घ्यावा ही कला मराठ्यांच्या सहवासापासून सर्वांनीं शिकावी. तुम्ही आमच्या मध्यस्थीचा असा भलताच अर्थ करूं नका."

आतां ह्या कंटाळवाण्या बडबडीचा एकदां कसाबसा शेवट व्हावा या उद्देशानें प्रतापसिंहमहाराज म्हणाले, "परंतु ह्या कोणत्याच गोष्टी येथें

बोलण्याचें कारण नाहीं. शब्दानें शब्द वाढतो व कोळसा उगाळीत बसलें कीं काळेंच निघतें. यास्तव या विषयावर बोलण्याची आम्ही सर्वांनाच मना करितों. साताऱ्याहून परमपूज्य श्रीमान् शाहूमहाराजांचें आज्ञापत्र आलें आहे, तें आम्हांला शिरसावंद्य आहे; व त्या आज्ञापत्रानुसार आम्ही चंदासाहेबांना राजबंदी म्हणून एथल्या सातारकर खाशा मराठ्यांच्या स्वाधीन करीत आहों." एवढें बोलून त्यांनीं लगेच प्रस्तुतच्या मोहिमेंत पराक्रम गाजविलेल्या वीरांचें यथोचित् सन्मान करण्याचें कार्य सुरू केलें. प्रथम रघूजी भोंसले व मुरारराव घोरपडे यांचा वस्त्रालंकार व रत्नखचित तलवारी देऊन बहुमान करण्यांत आला, व त्यानंतर क्रमाक्रमानें एकेकाचा यथोचित् गौरव झाला. गाड्याबरोबर नळ्याला यात्रा या न्यायानें बाबूजी नाइकांनाही त्या वहात्या गंगेंत हात धुवून घेतां आला हें निराळें सांगावयाला नकोच. मीरअसद आणि सफ्दरअल्ली या दोघांनाही वस्त्रालंकार अर्पण करण्यांत आले, व त्यांनीं प्रतापसिंह महाराजांच्या सिंहासनासमोर येऊन त्रिवार मुजरे करून त्यांच्याशीं आजन्म राजनिष्ठ राहण्याची शपथ वाहिली. तो विचित्र प्रसंग पाहून चंदासाहेबाच्या नेत्रांतून मात्र खळखळ अश्रु वहात होते. राजसत्तेचा त्याचा मद अजून जिरला नव्हता. मुसलमान हेच हिंदुस्थानांतील खरे राज्यकर्ते आहेत, व उभ्या कर्नाटकांत नबाबाची राजसत्ता हीच खरी राजसत्ता असून इतर सर्व हिंदु सत्ताधीश हे पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें अशाश्वत् आहेत, अशा घमेंडीनें आजवर तो वागत आला होता. हळुहळू सर्व कर्नाटकच काय, पण साधल्यास आणखीही मुलूख पादाक्रान्त करून दिल्लीच्या मोडकळत्या बादशाहीपर्यंत आपल्या सामर्थ्याचा हात पोंचवून, साधल्यास दिल्लीच्या तक्तावर विराजमान होण्यापर्यंत त्याच्या महत्त्वाकांक्षेची उडी होती. एवढा ज्याचा दुर्दमनीय अभिमान त्यालाच मीरअसद व सफ्दरअल्ली ह्या नबाबाच्या प्रभावळींतील खाशा राजपुरुषांनीं काफरांच्या तक्तासमोर राजनिष्ठेची शपथ घेतांना पाहून रडूं कोसळल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

असो. याप्रमाणें तो दरबार बरखास्त झाला. चंदासाहेब आतां कायदेशीर रीतीनें मराठ्यांच्या स्वाधीन झाला, व त्याला आतां साताऱ्याकडे रवाना करण्यांत येणार हेंही सर्वांना कळून चुकलें. अंमळशानें दरबार बरखास्त होतांच तेथलें व सभोंवारचें वातावरण मराठ्यांच्या विजयसूचक उत्साही

मंगल जयजयकारानें दुमदुमून गेलें. विशेषतः मुरारराव घोरपड्यांच्या अद्वितीय पराक्रमाबद्दल सर्वांनीं एकमुखानें त्यांच्या नांवाचा धन्यतापूर्वक एवढा प्रचंड जयघोष केला कीं मुराररावांनीं आनंदाच्या भरांत रघूजी भोंसल्यांच्या कानाशीं लागून जातां जातां हळूच हंसत हंसत उद्गार काढले, "एवढा अपूर्व मान—सन्मान जनतेकडून मिळविण्यासाठीं मी मृत्यूलादेखील मिठी मारण्याला आनंदानें तयार होईन. युद्धाचा प्रसंग केव्हांही झाला तरी अप्रियच; परंतु या गौरवाच्या लालुचीनें मनाला असें स्फुरण वाटूं लागतें कीं अविंधांनीं आपलें उरलें सुरलें बळ एकवटून कर्नाटकांत पुन्हां डोकें वर काढावें, दिल्ली अटकेपर्यंतच्या त्यांच्या जातभाईनीं त्यांना कुमक करावी, आणि मीं पुन्हां रणांगणावर त्यांचा असाच खासा नक्षा उतरवून दिल्लीचें बादशाही तक्त डळमळीत करून उखडून टाकावें."

रघूजी भोंसल्यांना देखील तो प्रकार आनंददायक वाटला. त्यांतल्या त्यांत कोणाला जर किंचित् वाईट वाटलें असेल तर तें एकटच्या परोत्कर्षासहिष्णु नाइकांना! बिचाऱ्याला मुराररावांचा तो अपूर्व उत्कर्ष सहन झाला नाहीं! परंतु त्यांत जगावेगळे असें कांहींच नाहीं. एखाद्या मनुष्याच्या ठायीं कर्तबगारीची उणीव ज्या प्रमाणांत जास्त,त्या प्रमाणांत तो मनुष्य क्षुद्र वृत्तीचा असावयाचाच; व तो नेहमीं दुसऱ्याच्या उत्कर्षानें दुःखी व्हावयाचाच.

दरबार बरखास्त झाल्यावर इतमामानें सर्व खासे आपापल्या निवासस्थानाकडे वळले. नगरांतील सुवासिनी स्त्रियांनीं आपल्या सुशृंगारित घरांच्या दरवाज्यांत ठायीं ठायीं उभें राहून त्यांना पंचारत्या ओंवाळल्या. हा सर्व प्रकार विजयोत्साहाला अनुरूप असाच झाला, मात्र एकच जबरदस्त जिज्ञासा जी दरबारांतील सर्व लोकांच्या मनाला लागून राहिली होती ती ही कीं, अगदीं ऐन वेळीं चंदासाहेबावर वाग्बाणांचा वर्षाव करणारी ती स्त्री कोण असावी! वाचकांना ती मोहना होती, हें पूर्वींच माहीत आहे. मात्र प्रतापसिंहमहाराजांना व इतर अनेकांना हें माहीत नसल्यामुळें सर्वत्र त्या एका गोष्टीची आपापसांत कुतूहलपूर्वक चौकशी सुरू होती, व प्रतापसिंह महाराजांनींही आपल्या राजवाड्यांत जातांच अगोदर त्या धैर्यशाली अज्ञात स्त्रीची चौकशी सुरू केली. त्यांच्यासारख्या तरुण, वैभवशाली, विलासी व विजयी भूपालाच्या मनांत त्या स्त्रीविषयीं एखादी कोमल व मधुर लालसा

उत्पन्न झाली असली तरी त्याबद्दल त्यांना दोषी कोण म्हणेल! त्यांच्या स्थितींतील कोणाही नरवराचें चित्त अशा स्त्रीकडे वेधलें जाणारच; अशी अर्धांगी आपणाला असावी असें त्याला वाटणार! मात्र एकंदर शक्याशक्यतेचा विचार न करितां एखाद्या व्यक्तीविषयीं असली अभिलाषबुद्धि मनांत धरणें जरा उतावळेपणाचें व साहसाचें दिसतें खरें. पण तें कांहीं कांहीं प्रसंगीं ज्यांचें त्यांना शोभतेंही.

# प्रकरण ३७ वें

# मधुर मीलन



अपरूपाराणी आणि कोयाजी घाटगे यांच्या लावालावीमुळें व स्वार्थसाधुपणामुळें तंजावरच्या राजघराण्यांत उसळलेलें दुष्ट वादळ आतां आपोआपच शांत झालें होतें. ज्या मानाजीविषयीं प्रतापसिंहमहाराजांनीं अपरूपाराणीच्या मायावी बोलांना बळी पडून करुणाराणीच्या नांवानें भलताच संशय घेतला होता, तोच अखेर प्रस्तुतच्या लढाईंत मराठ्यांच्या खांद्याला खांदा भिडवून लढतां लढतां शरपंजरीं पडलेला पाहून त्याच्याविषयींचा महाराजांच्या मनांतला रोषही बहुश: कमी झाला होता. तरी पण एक गोष्ट-अत्यंत नाजूक व जिव्हाळ्याची अशी एक गोष्ट महाराजांच्या अंत:करणांत शल्याप्रमाणें सलत होती, ती मानाजी व करुणा यांच्या परस्पर नात्याविषयींची होय. अपरूपाराणी आणि कोयाजी यांचे देशद्रोही व राजद्रोही प्रयत्न सर्व यथावत् चवाठ्यावर आल्यामुळें करुणाराणी व मानाजीराव यांच्या बाबतींत त्यांनीं उठविलेल्या भरमसाट कंड्याही केवळ खोडसाळपणाच्या व द्वेषमूलकच असल्या पाहिजेत, असें महाराजांचें मन त्यांना सांगे. पण ती बाबच अशी नाजूक कीं–प्रत्यक्ष सहधर्मचारिणीच्या नैतिक वर्तनाविषयीं पतीच्या मनांत उत्पन्न झालेला संशय दूर होणें महाकर्म कठीण असतें. त्यांतूनही खरोखरच स्थितप्रज्ञ महात्मे जे कोणी असतील, मनुष्याची खरी पारख ज्यांना असेल, आणि समतोल वृत्तीनें सभोंवारच्या परिस्थितीचा विचार करण्याचें प्रशंसनीय आत्मबल ज्यांच्या ठायीं असेल, अशांना आपल्या सहवासांतील अर्धांगीची ओळख करून द्यावयाला दुसरें कोणी नको असतें. पण त्याच गोष्टीचा तर येथें अभाव होता. कदाचित् आपणावरून जगाची पारख करण्याइतकी एककल्ली संवय जी सामान्यत: मनुष्यमात्राला निसर्गत: जडलेली असते ती संवय प्रतापसिंहमहाराजांना असल्यामुळें कीं काय, त्यांना वाटत असावें कीं, सुंदर सुंदर युवतींचा मोह जर आपल्याला आवरत नाहीं, जितक्या सौंदर्यवती युवती आपल्या रंगमहालांत सहजासहजीं आणतां येतील

तितक्या आणून त्यांच्याशीं नानापरींचे विलास करावे असें जर आपणाला वाटतें, तर राणीलाही तिच्या परीनें तसेंच वाटत नसेल कशावरून! जगामध्यें सुंदर, मोहक, चित्तवेधक असें कांहींही आढळलें तरी तें हवेंहवेंसें प्रत्येकाला वाटतें. मानाजीरावासारखा तरुण, देखणा पराक्रमी व मायाळू मित्र पहातांच राणीला त्याच्या विषयीं अभिलाष उत्पन्न झाला तर तें इष्ट जरी नाहीं तरी संभवनीय खास होतें. मात्र म्हणून कांहीं महाराज करुणेला त्या संशयात्मक चुकीची क्षमा करा वयाला तयार नव्हते. 'ती कशी झाली तरी स्त्री आहे. ती माझी अर्धांगी आहे. तिनें असले चाळे केलेले तिच्या आणि माझ्या उभय कुळांना नरकांत लोटणारे आहेत.' अशा मनांतल्या संशयपरिपाकाचें द्योतक म्हणून एखादा भयंकर विचार क्षणोक्षणीं महाराजांच्या मनांत तांडवनृत्य करूं लागावा व त्यामुळें त्यांचें मन अत्यंत अस्वस्थ व्हावें. सभोंवारच्या परिस्थितीवरून करुणाराणीचा कोणताही अपराध नाहीं असेंही त्यांना एकदां वाटे. विशेषतः प्रस्तुतच्या झगड्यांत यश मिळवून देण्यांत करुणाराणीचा देखील बराच मोठा वांटा होता, हें महाराजांना माहीत असल्यामुळें त्यांना इतकी कर्तव्यतत्पर राणी दुराचारी कशी असूं शकेल असाही सारासार विचार त्यांच्या मनोभूमींत अंकुरित होऊन वाढीला लागला होता. मानाजीरावासारखा निःसीम राजनिष्ठ सेवक राजाशीं अशी प्रतारणा कशी करूं शकेल! तरी पण तो संशय—तो राक्षसी संशय दूर होण्याला हीं सर्व बाह्य उपकरणें अपुरीं पडल्यामुळें, महाराज आशेनें भवितव्याकडे डोळे लावून होते कीं, "राणीच्या निर्दोषतेविषयीं कोणीतरी माझी सप्रमाण खातरजमा करून देऊं शकेल का?"

मनुष्याचें मन म्हणजे अनेक बऱ्या—वाईट विचारांचा व कल्पनांचा अजबखाना होय. मनुष्य ज्या वेळीं तोंडानें एक गोष्ट बोलत असतो, त्या वेळीं दुसऱ्या अनेक विरोधी गोष्टींचें काहूर त्याच्या मनांत माजलेलें असतें. प्रतापसिंहमहाराजांनीं दरबार भरविला, दरबारांत सन्माननीयांचा मानसन्मान झाला, तरी करुणाराणीविषयींचा विचार त्यांच्या मनांत जो अव्याहत डांचत होता तो त्यामुळें शमूं शकला नाहीं. दरबार आटोपून राजवाड्यांत आल्यावर देखील त्यांना त्या विचारांचा विसर पडूं शकला नाहीं. उलट त्यांना आतां जरूर तेवढें मनःस्वास्थ्य देवदयेनें लाभल्यामुळें तो सहधर्मिणीविषयींचा

विचार त्यांना जास्त जास्त घेरूं पहात होता. तो सबंध दिवस जवळ जवळ त्यांनीं त्या दारुण चितानलांत होरपळत कसाबसा काढला. अखेर आपली सर्व सारासार विवेकशक्ति एकवटून त्यांनीं मनाचा धडा केला, "बस्स! आपण करुणेला बोलावून समक्ष या गोष्टीचा खुलासा विचारावा."

परंतु हा महाराजांचा विचार कृतींत उतरण्यापूर्वीच त्या दिवशीं सूर्यास्ताच्या समयाला मानाजीराव आणि झुंजारराव हे दोघे अकस्मात् महाराजांच्या भेटीला आले. ते येतांच मानाजीरावानें शेल्यांत गुंडाळून आणलेल्या दोन तलवारी महाराजांच्या पायांपाशीं ठेवून म्हटलें, "महाराज, युद्धाचा शेवट देवदयेनें आपल्यासारखा झाला आहे. ह्या युद्धांत आमच्याकडून घडलेली फुल ना फुलाची पाकळी सेवा महाराजांच्या चरणीं रुजू असेल, असा आम्हांला भरंवसा आहे. आतां महाराजांच्या मनांत जो अनिर्वाच्य विकल्प महाराजांच्या मायावी चुलतीनें भरवून दिला आहे, त्याचें निराकरण होणें आमच्याच काय पण महाराजांच्या दृष्टीनेंही आवश्यक आहे. विशेषतः एक निरपराधी देवता हकनाहक त्या विकल्पाला बळी पडलेली आहे." बोलतां बोलतां मानाजीरावाचा कंठ इतका दाटून आला कीं त्याच्याच्यानें पुढें बोलवेना.

झुंजारराव इतका वेळ गंभीरपणानें स्तब्ध उभा होता. तो मध्येंच उद्गारला, "महाराज, मी करुणेचा धर्मपिता या नात्यानें त्या शोचनीय प्रकारामुळें मला मरणाहूनही जास्त दुःख होत आहे. आपण मला फितूर ठरविलें, आपल्या राजसेवकांच्या हातून माझा छळ झाला; तें सर्व दुःख मीं निमूटपणें आजवर गिळलें. पण माझी लेंक—ती धर्माची असली तरी मी तिला माझ्या पोटच्या लेंकीप्रमाणेंच मानतों.—ती अशी दुर्वर्तनी निपजेल, हें कालत्रयींही शक्य नाहीं. ती दुर्वर्तनी नाहीं हें मीच काय पण कोणीही सांगूं शकेल. फार कशाला! सुदैवानें कोणत्याही न्यायान्यायाचा निवाडा करण्याचें साधन आपणासमोर आहे." तो समोरच्या तलवारीकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाला, "महाराजांची पुण्याई थोर म्हणून हें तंजावरच्या राजघराण्यांतून चोरीला गेलेलें त्रिभुवनाच्या मोलाचें दैवी वैभव आमच्या हातीं लागलें, तें आम्ही महाराजांच्या चरणीं रुजू केलें आहे. महाराजांना आतां माझी हात जोडून विनंति आहे कीं, मी करुणेला आपणा समोर आणतों. राणी म्हणून नव्हे, तर अपराधी म्हणूनच समोर आणून उभी करतों. महाराजांनीं तिला युक्त तें दिव्य

करावयाला लावावें. ती त्या कसोटीला उतरली तर सोन्याहून पिवळें झालें. बरें; ती अपराधी ठरली तर याच क्षणीं याच जागीं महाराजांकडून तिचें शासन होण्याची वाट न पहातां मी माझ्या हातानें याच तलवारीनें तिचें शीर एथल्याएथें धडावेगळें करीन. पोरगी म्हणून अपत्यमोहाला मी बळी पडणार नाहीं याविषयीं महाराजांची खात्री असूं द्या."

चोरीला गेलेल्या त्या प्रासादिक तलवारी पुन्हां कधीं आपल्या हातीं येतील अशी महाराजांना या क्षणापर्यंत मुळींच आशा नसल्याकारणानें अकल्पितपणें तें दैवी वैभव पुढें आलेलें पाहून ते आश्चर्यानें दिग्मूढ होऊन गेले. त्यांच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. ज्याअर्थी मानाजीराव आणि झुंजारराव इतक्या निक्षून करुणेविषयीं निर्वाळा देत आहेत, त्याअर्थीं तिला आणखी निराळें दिव्य करावयाला लावणें यांत जसा तिचा अपमान आहे तसाच त्या दोघांचाही अपमान आहे असें महाराजांना वाटलें. मानाजीविषयीं त्यांच्या मनांत असलेला अल्पस्वल्प संशयही त्याच क्षणीं आपोआप दूर झाला. कारण त्या प्रभावशाली तलवारी हातीं घेऊन निर्भयपणें बोलणारा मनुष्य अपराधी असणेंच शक्य नव्हतें. अपराध्याचा हस्तस्पर्श होतांच त्या तलवारींचें तेज लुप्त होऊन त्या काळचा ठिक्कर पडत असत, हा त्यांच्या अंगाचा दैवी प्रभाव सर्वांना महशूर होता. इतका वेळ आपण निष्कारण संशयाच्या पिशाच्याला आपल्या मनोमंदिरांत थैमान घालूं दिलें याबद्दल स्वत:शीं खजिल होऊन महाराज उद्गारले, "झुंजारराव, तुमच्या शब्दांवर माझा पूर्ण भरंवसा आहे. ह्या तरवारी हें तंजावरच्या राजघराण्यांतील जागृत राजवैभव तुम्हीं निष्ठापूर्वक पुन्हा राजगृहीं आणलें, याबद्दल तुमची तारीफ करण्यानेंही तुमचा उपमर्द होईल कीं काय, असें आम्हांला भय वाटतें. इतकी तुमच्या ठायीं वसणारी आमच्या विषयींची पूज्य भक्ति थोर आहे, व ती कैक पिढ्यांची आहे. ह्या अमोल कामगिरीबद्दल आम्हीं आजन्म तुमच्याशीं कृतज्ञ राहिलें पाहिजे." तसेच ते मानाजीरावाकडे वळून शांत मुद्रेनें पहात उद्गारले, "मानाजी, तूं देखील कोणत्याही प्रकारें मुळींच अपराधी नसून, आमच्या गादीचा एकनिष्ठ सेवक—नव्हे, तुला सेवक म्हणणें म्हणजे तुझी योग्यता कमी केल्यासारखें होईल.—तूं गादीचा एक सामर्थ्यवान् आधारस्तंभ आहेस. आम्हीं भलत्याच चुगलखोरांच्या नादीं लागून तुझ्यावर किटाळ आणलें याबद्दल तूं

आम्हांला मनःपूर्वक क्षमा केली पाहिजेस."

मानाजीराव हात जोडून गद्‌गद् कंठानें उद्‌गारला, "महाराजांच्या मुखांतून स्रवणाऱ्या ह्या स्तुतिवर्षावाचा माझ्या माथां भार होतो आहे. महाराजांनीं आपल्याकडे कमीपणा घेतला तो घेण्याचें कांहींच कारण नाहीं. आम्ही महाराजांच्या चरणधुळींत लोळून महाराजांच्या अन्नावर लहानाचे मोठे झालेले महाराजांचे सेवक; आमची क्षमा ती महाराजांनीं कशाला मागायची? परंतु एक गोष्ट मात्र महाराजांनीं अवश्य केली पाहिजे. राणीसाहेबांवरील आरोपाचें निराकरण कोणत्याही मार्गानें होईना पण महाराजांनीं आमच्या डोळ्यांदेखत करून घेतलेंच पाहिजे, त्याशिवाय आमच्या मनाला शांतता मिळणार नाहीं."

मानाजीरावानें बोलतां बोलतां झुंजाररावाकडे पाहिलें. झुंजाररावाला त्या पहाण्याचा अर्थ तेव्हांच कळून चुकला. करुणाराणीचें नांव जें महाराजांसभोंवारच्या ढालगजांनीं हकनाहक बद्दू केलें होतें, त्याची शहानिशा करून घेणें झुंजाररावालाही अत्यंत अगत्याचें वाटत होतें. किंबहुना करूणाराणी पूर्णपणें निर्दोषी आहे हें माहीत असूनही झुंजारराव राणीला दिव्य करावयास लावण्यासाठीं उत्सुक होता. तो महाराजांना त्यांच्या अविचाराविषयीं मनांतून दोष देत असेल. पण तें दुसऱ्या कोणाच्याही ध्यानीं येणें शक्य नव्हतें. महाराजांनीं विचार केला कीं आपल्या ह्या दोघां एकनिष्ठ सेवकांचा एवढा साधा आळ आपण कां पुरवूं नये! त्यामुळें राणीच्याही मनाला समाधान होईल, सर्वांनाच त्यापासून संतोष होईल. लगेच त्यांनीं संमतिदर्शक उद्‌गार काढले, "तुमची इच्छाच दिसते आहे त्या अर्थी राणीसाहेबांना त्यांच्या मर्जीप्रमाणें दिव्य करूं द्या. आम्ही मात्र स्वतःच्या मनाशीं याचा इतकाच अर्थ घेतों कीं, आमच्या पुनर्मीलनाचें चिरकाल स्मरण टिकण्यासाठीं या दिव्याचा खरा उपयोग होणार आहे."

"आणि न जाणो, कदाचित् महाराजांनाही ह्या दिव्यापासून एखादा धडा शिकतां येण्याचा संभव आहे. महाराजांची सत्ता थोर आहे, योग्यताही थोर आहे, पण ह्या सतीच्या पातिव्रत्याची योग्यता त्याहूनही थोर आहे, पण त्याविषयीं महाराजांनीं निष्कारण संशय घेतला असेल तर ते देखील अपराधी ठरूं शकतात. मात्र त्या अपराधाबद्दलचें शासन—" बोलतां बोलतां झुंजार-

रावाचें मन त्याला खाऊं लागलें कीं आपण हा अतिप्रसंग केला, बोलूं नये तें बोलून गेलों. आपली पायरी आपण ओळखली नाहीं. तो तोंडातलें वाक्य तसेंच अर्धवट सोडून महाराजांच्या पायांशीं नम्र होऊन उद्गारला, "महाराजांनीं माझ्या वावग्या बोलांबद्दल मला क्षमा करावी."

परंतु महाराजांनीं झुंजाररावाला आपल्या पायांवर डोकें ठेवण्याची संधि न देतां वरच्यावर त्याला आलिंगनपूर्वक हृदयाशीं धरून सन्मानपूर्वक आपणाशेजारीं बसविलें, आणि त्याच्या चरणांना वंदन करून म्हटलें, "झुंजारराव, आम्ही राजे रयतेचे; पण तुम्हांला आम्ही लेंकरूंच आहों. वयानें म्हणा, अनुभवानें म्हणा, कर्तव्यतत्परतेनें म्हणा किंवा संसारांतील नात्यानें म्हणा, कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी तुम्ही आम्हांला वंद्य आहांत. आम्हांला आडमार्गावरून मार्गावर आणण्याचा अधिकार तुम्हांला आहे आणि तुम्ही आमचे सर्व अपराध पोटीं घालून आम्हांला उदार मनानें क्षमाही केली आहे. यापेक्षां थोर मनाच्या महात्म्यापाशीं आमच्यासारख्या अपराध्याला करतां येण्याजोगें दुसरें पवित्रांतलें पवित्र व अत्यंत उचित शासन दुसरें असेल असें आम्हांला वाटत नाहीं. बरें; राणीसाहेब कुठें आहेत?"

झुंजाररावानें नेत्रांवाटे वहाणारे अश्रु पुशीत मनांतल्या मनांत महाराजांना व स्वत:ला धन्यवाद देत मागें वळून 'करुणे!' अशी हांक मारली. थोड्याच वेळांत अवगुंठनवती करुणाराणी महाराजांसमोर येऊन उभी राहिली. महाराज तिच्याकडे प्रेमानें पण किंचित् ओशाळ्या नजरेनें टकमक पहात होते. ती देखील हृदयांत उचंबळणाऱ्या सर्व भावनांना आपल्या नेत्रांत एकवटून महाराजांकडे पहात असेल! पण तिनें तोंडावरून पदर घेतला असल्यामुळें तें कोणाला दिसणें शक्य नव्हतें.

लगेच मानाजीरावानें उभा राहून प्रथम महाराजांना आणि नंतर त्या दोन तरवारींना प्रणाम करून प्रार्थना केली, "माझ्या वाणींत, कृतींत, इच्छेंत, माझ्या प्रत्येक श्वासोच्छ्वासांत जर तंजावरच्या गादीविषयीं व माझ्या सांप्रतच्या प्रभूंविषयीं निस्सीम निष्ठा जागृत असेल, धर्मपत्नीला न शोभणाऱ्या अपकर्तव्याचा विटाळही जर कधीं माझ्या मनाला, वृत्तीला किंवा इच्छेला झाला नसेल, तर हे खड्गरूपी देवते, तूं आपल्या अपूर्व तेजस्वितेनें माझ्या करस्पर्शाबरोबर चमकूं लागशील." एवढें बोलून त्यानें त्यांतली एक तलवार म्याना-

बाहेर काढली. साहजिकपणेंच महाराजांची दृष्टि तिकडे खिळलेली होती. त्यांनीं जेव्हां ती तलवार आपल्या तेजानें तळपत असून तिचा प्रकाश त्या दिवाणखान्यांत प्रभातकाळच्या संधिप्रकाशाप्रमाणें चोहींकडे फांकलेला पाहिला; त्याबरोबर मानाजीरावाच्या नेत्रांतून आनंदाश्रूंच्या गंगायमुना वाहूं लागल्या. महाराज व करुणाराणी यांनाही आनंदाश्रूंचा पूर आवरेनासा झाला. महाराजांनीं त्याच क्षणीं त्याला हृदयाशीं धरून आपल्या कृपाश्रु—वर्षावानें त्याला न्हाऊं घातलें. त्याच्या मनांतून पुष्कळ बोलावयाचें असेल पण मुखावाटे एक शब्दही निघेना. किंचित् वेळानें झुंजारराव मानाजीरावाला म्हणाला, "मानाजी, त्या दोन्ही तरवारी म्यान करून राणीसाहेबांसमोर ठेव. त्यांना दिव्य करूं द्या."

लगेच मानाजीरावानें तसें केलें. झुंजाररावानें करुणेला त्या दोन्ही तरवारी म्यानाबाहेर काढण्यास सांगितलें. परंतु दुसऱ्याच क्षणाला त्याच्या मनांत काय आलें न कळे, तो पुन्हा महाराजांना म्हणाला, "महाराज, करुणा दिव्य आपल्या समाधानासाठीं करणार आहे; आपण तिचे संसारांतील सहचर—तिचे सौभाग्येश्वर या नात्यानें या महत्कार्यांत तिला हातभार लावला पाहिजे. त्या तलवारी आपण म्यानाबाहेर काढून तिच्या हातीं दिल्या पाहिजेत."

"जशी तुमची इच्छा." असें म्हणून महाराजांनीं त्या दोन्ही तलवारी म्यानाबाहेर काढल्या. तों काय चमत्कार! भटींतून तापवून काढून निवलेल्या लोखंडाच्या कांबीसारख्या एकदम त्या काळ्या ठिक्कर पडल्या. महाराजांनीं तो प्रकार पाहिला, करुणेनेंही पाहिला. सर्वांना तो चमत्कार कळून चुकला. परंतु आश्चर्य हें कीं त्याचा अचंबा कोणालाच वाटला नाहीं. फार काय, खुद्द महाराजांनाही अचंबा वाटला नाहीं. सर्व मंडळी एकमेकांच्या तोंडाकडे टकमक पाहूं लागली. महाराज ओशाळेपणानें म्हणाले, "राणीसाहेबांच्या बाबतींत आम्ही अनंत अपराधी आहोंत हें आम्हाला पूर्णपणें मान्य आहे; व त्याच अपराधाची साक्ष ह्या खड्गदेवतांनीं दिली आहे."

झुंजारराव आणि मानाजीराव यांना तरी मुख्यत: महाराजांनींच त्यांचीं बोटें त्यांच्या डोळ्यांत कशीं जातात हें दाखवावयाचें होतें. त्यांना तो प्रकार पाहून परमसंतोष वाटला. करुणेलाही तसेंच वाटलें असल्यास त्यांत नवल नाहीं. वास्तविक राणीवर भलभलते आरोप करणारे महाराजच दोषी आहेत

असा खड्गदेवतेनें एकवार निर्णय दिल्यावर करुणाराणीच्या निर्दोषतेविषयीं निराळ्या दिव्याची आवश्यकताच नव्हती. तरीही महाराजांनीं त्या तलवारी आदरपूर्वक तिच्यासमोर करीत म्हटलें, "राणीसाहेब, आपली परीक्षा पहाण्यासाठीं नव्हे, तर आमच्या स्पर्शानें अपवित्र झालेल्या या खड्गांना पावन करण्यासाठीं आम्ही हीं आपल्या हातीं देत आहोंत."

# प्रकरण ३८ वें
# करुणेचें दिव्य



करुणेनें त्या तलवारी हातीं घेऊन नतमस्तकपूर्वक त्यांना अभिवादन केलें. तों पूर्वीसारखाच चमत्कार घडून आला. त्या तरवारी राणीच्या हाताचा स्पर्श होतांक्षणींच विद्युल्लतेप्रमाणें चमकूं लागल्या. अस्तप्राय सूर्याचे सोनेरी किरण त्या महालाच्या झरोक्यांतून आंत डोकावत असलेले त्या तलवारींवर पडल्यामुळें तर त्यांचें तेज तेथल्या मंडळींना क्षणभर असह्य वाटलें. महाराजांनीं लगेच करुणेपुढें मस्तक नमवून उद्गार काढले, "देवते, पतिव्रते, तूं धन्य आहेस. तुझ्या रूपानें ह्या तंजावरच्या राजघराण्यांत साक्षात् राजलक्ष्मी नांदत आहे. तूं आमच्या चुकीमुळें कांहीं काळ परागंदा झालीस, त्याबरोबर परचक्राची आकाशची कुऱ्हाड आमच्या राज्यावर कोसळली; आणि तूंच सर्व आगळिकी विसरून तंजावरच्या राज्याकडे कृपाकटाक्ष फेकूं लागलीस म्हणूनच तें परचक्र टळलें, व आम्ही सर्वजण हा आनंदाचा दिवस पहात आहोंत. आजपासून ह्या खड्गदेवतांची पूजा करण्याचा मान एकट्या तुझा आहे." करुणा त्या तरवारी पुन्हां महाराजांसमोर ठेवूं लागली तेव्हां महाराजांनीं हातानें नकार दर्शवीत म्हटलें, "नको नको, तूं त्या देवतांना तुझ्यापासून दूर लोटूं नको. त्यांची पाळणूक मोठी कठीण आहे. अंतर्बाह्य पावित्र्यानें नटलेल्या पुण्यवंतांनीं पूजाअर्चा केली तरच हें जागृत दैवत आपणावर प्रसन्न राहील. अशा पावित्र्याची मूर्तिमंत प्रतिमा तूंच एकटी आहेस; तूंच ही जबाबदारी पतकरली पाहिजेस."

हा सुखकारक संवाद त्या मंडळींत आणखी कोठवर लांबला असता कोण जाणें! आनंदसागरांत मनुष्य एकदां पोहूं लागला कीं त्याला पोहावें तेवढें थोडेंच वाटतें. असा एखादा चित्तवृत्ति उचंबळून सोडणारा आनंदाचा प्रसंग उद्भवला कीं दिवसच्या दिवस व रात्रीच्या रात्री भूक-तहान न म्हणतांदेखील त्या आनंदांत रंगून रहाण्याची संवय महाराजांना तशीच करुणाराणी-

लाही होती. आजचा हा प्रसंग तर सर्व आनंददायक प्रसंगांच्या मालिकेंत अग्रस्थानीं शोभण्यासारखा होता.

त्या आनंदाचा विरस करण्यासाठीं नव्हे, तर तो द्विगुणित, दशगुणित, शतगुणित करण्यासाठींच कीं काय, द्वाररक्षकानें आंत येऊन अभिवादनपूर्वक वर्दी दिली, "मोहन नांवाचे सरदार महाराजांची एकवार भेट घेऊं इच्छितात."

मोहन हें नांव ऐकतांच तेथल्या सर्वांना मोहिनी पडल्यासारखें झालें. महाराजांनीं मोहनची शौर्य–धैर्य–चातुर्याची नुसती कीर्ति ऐकली होती, त्याच्या अपूर्व चातुर्याच्या रसाळ कथाही ऐकल्या होत्या, पण प्रत्यक्ष व्यक्ति अशी कधींच पाहिली नव्हती. परंतु करुणाराणी, मानाजीराव व झुंजारराव यांनीं मोहनशीं एक दिलानें वागून बव्हंशीं, त्याच्या कल्पकतेच्या व चपळतेच्या जोरावर प्रस्तुतच्या मोहिमेंतील सर्व डावपेंच यशस्वी केल्यामुळें त्यांना त्याची खरी योग्यता कळत होती. मात्र आश्चर्य हें कीं, आनंदी-आनंदाच्या त्या महोत्सवांत दरबार भरून सर्व सन्माननीयांचा यथोचित् आदरसत्कार करण्यांत आला त्यावेळीं मोहन हजर नव्हता! तो हजर असता तर, अर्थातच दुधांत साखर पडल्याप्रमाणें झालें असतें. पण तो हजर नव्हता म्हणून दरबारचें अडलें, असें मुळींच नाहीं. साहजिकच आहे! एक म्हातारी जेवली नाहीं म्हणून अन्नछत्र थोडेंच ओस पडतें!

असो, मोहनचें नांव ऐकतांच महाराजांनीं त्याला ताबडतोब आंत पाठवून दे, असें द्वाररक्षकाला सांगितलें, व ते स्वतः त्याचा यथोचित् आदरसत्कार करण्यासाठीं आसनावरून उठून दरवाज्यापर्यंत गेले. मोहन दरवाज्यांत येतांच महाराजांनीं त्याला कडकडून आलिंगन देण्यासाठीं आपले दोन्ही बाहू पसरले. मानाजीराव व झुंजारराव यांनीं त्याला उत्थापन दिलें. करुणाराणी जवळ उभीच होती. ती चांचल्यपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागली. महाराज गाढालिंगन देण्यासाठीं एक पाऊल पुढें सरले, त्याबरोबर मोहन चट्कन् एक पाऊल मागें सरकला. महाराजांच्या तें ध्यानीं आलें नाहीं. त्यांनीं दुसरें पाऊल पुढें टाकलें तोंच मोहननें दोन्ही हात जोडून त्यांना विनंति केली. "हां महाराज, आपण कृपा करून पाऊल आवरतें घ्या." एकाएकीं धरणीकंपाचा धक्का बसावा त्याप्रमाणें महाराज व इतर मंडळी या सर्वांचीं अंतःकरणें मोहनच्या त्या शब्दांनीं हादरून गेलीं. मानाजीराव व झुंजारराव



करुणाराणी दिव्य करून आपल्या पावित्र्याविषयीं पतीची ख

त्यांना वाटलें, हा महाराजांचा अपमान झाला; आणि वरवर पहाणाराला तो खरोखरच अपमान होता. महाराजांचें आलिंगन हा प्रसाद सामान्यत: कोणत्याही माणसाला मोक्षप्राप्तीइतका दुष्कर होता. असें असतां मोहन इतका तऱ्हेवाईक कसा, हें गूढ कोणालाच उकलेनासें झालें. मात्र महाराजांना स्वत:ला त्यांत अपमान वाटला नाहीं. ते शांतपणानें उद्‌गारले, "सरदार, मी तुम्हांला दरबारच्या प्रसंगीं विसरलों अशी तुमची चुकीची समजूत झाली असावी म्हणून तुम्हीं त्याबद्दल हा सात्त्विक निषेध प्रदर्शित केला, तो स्वाभिमान तुमच्या नि:स्वार्थी देशसेवेला आणि अपूर्व कर्तबगारीला साजेसाच आहे. परंतु माझ्या शब्दावर तुमचा विश्वास असेल तर सांगतों, आम्ही तुम्हांला विसरलों नाहीं. आम्ही तुमचा पुष्कळ शोध केला, पण शोध लागला नाहीं. एवढ्यानें तुमचें समाधान होणार नाहीं काय?" मानाजीराव, झुंजारराव व करूणाराणी ह्या तिघांनींही महाराजांच्या लोकोत्तर उदार औदार्याचें मनोमन कौतुक केलें. मोहन पुन्हां हात जोडून विनम्र स्वरांत उद्‌गारला, "नाहीं नाहीं. महाराज, मी त्या प्रकाराबद्दल आपणाला दोष देत नाहीं. आपण माझी चौकशी केली हें मला माहित आहे, पण मीं आपण होऊनच दरबारांत येण्याचें टाळलें. त्याबद्दल मी आपणाला दोष कसा देऊं! आपण राजपुरुष, आम्हीं आपली परमेश्वराच्या ठायीं एकनिष्ठपूर्वक पूजा करावयाची! आपणाला दोष देण्याचें पातक माझ्यासारखा स्वामिनिष्ठ जीव कां म्हणून जोडील?" बोलतां बोलतां मोहन नखशिखान थरथर कांपत होता. खवळलेल्या हरणाच्या चंचल दृष्टीप्रमाणें त्याची दृष्टि तरळूं लागली होती. तो निसर्गत:च मदनासारखा सुंदर होता व त्याच्या गालांवर नेहमींच गुलाब फुललेले दिसत. कांहींसें भय, कांहींसे श्रम व कांहींसा विस्मय यामुळें त्यावेळीं त्याच्या गालांवर नेहमींच्याहून अधिक लाली आपोआपच फांकली होती. कोणीही त्या सुंदर मुखकमलाकडे स्तिमितपणें टकमक पहात रहावें इतकी ती गोंडस चर्या एका क्षणांत कां न कळे किंचित् मलूल झाली. हा सर्व प्रकार करुणाराणी, मानाजीराव व झुंजारराव या तिघांनाही दिसून आला.

"तर मग तुम्ही मागें कां सरलां? तुमच्या मनांत काय असेल तें मोकळ्या मनानें सांगा." महाराज शांतपणें पुन्हां उद्‌गारले.

किंचित् अस्वस्थ वृत्तीनें मोहन उद्‌गारला, "पहिली गोष्ट—ईश्वरसाक्ष,

महाराजांच्या पायाची साक्ष, राणीसाहेबांच्या पायाची साक्ष"—मध्येंच थांबून तो चटकन चार पावलें पुढें येऊन झुंजाररावाच्या पायांवर मस्तक नम्र करून गहिंवरलेल्या कंठानें उद्गारला, "ह्या पिताजींच्या पायांची साक्ष, आपलें आलिंगन स्वीकारण्याची माझी पात्रता नाहीं; आणि तो अधिकारही परमेश्वरानें मला दिलेला नाहीं." पुढें त्याच्याच्यानें बोलवेना. तो तसाच झुंजाररावांच्या पावलांवर मस्तक ठेऊन अश्रूंचा अभिषेक करीत स्तब्ध राहिला. कोणालाच त्याच्या त्या गोंधळलेल्या मन:स्थितीचा अर्थ कळेना. त्यानें झुंजाररावाला पिताजी म्हणून त्याच्या पायांवर डोकें नमविलें, पण तें कोडें सोडविण्याला प्रत्यक्ष झुंजाररावही असमर्थ ठरला. प्रत्येकजण एकमेकांकडे प्रश्नार्थक दृष्टीनें पाहूं लागला. पण बोलेना मात्र कोणीच.

अंमळशानें अश्रूंचा पहिला पूर किंचित् ओसरल्यावर मोहन उभा राहिला आणि महाराजांना हात जोडून विनवूं लागला, "आतां आपल्या सर्वांचें अंगीकृत कार्य यशस्वी झालेंच आहे. माजलेल्या यवन दैत्यांचा मोड होऊन हिंदवी—साम्राज्याची मंगल प्रभात येथें उगवलीच आहे. श्रीरंगाच्या कृपेनें आणि आपणासारख्या पुण्यवंतांच्या पुण्याईनें आज भूभार हलका झाला आहे. आतां उरलें सुरलें रहस्य माझ्यापुरतें तरी मला उलगडून दाखविण्याला हरकत नाहीं असें मला वाटतें. पण त्यापूर्वी माझी महाराजांना अशी अंत:करणपूर्वक विनंति आहे कीं, करुणाराणीसाहेब ह्या महा पतिव्रता साध्वी आहेत. त्यांच्याविषयीं भलता संशय घेणें हें महत्पाप आहे,—असें महाराजांच्या बाबतींत म्हणण्याचा मला जरी अधिकार नाहीं, तरी महाराजांनीं नि:संशय मनानें, पूर्ण प्रेमभावानें त्यांना पुन्हां स्वीकारून महाराणीपदावर अधिष्ठित करावें. ही माझी मागणी महाराजांनीं प्रथम मान्य केली पाहिजे."

"त्या संशयाचा समाधानकारक शेवट झाला आहे. महाराजांनी पश्चात्तापपूर्वक राणीसाहेबांचा स्वीकार केला आहे." मानाजीराव म्हणाला. करूणाराणी मात्र जास्त कावरीबावरी होऊन सभोंवार पाहूं लागली. त्यावेळीं तिचें मन जर कोणाला न्याहाळून पहातां आलें असतें, तर त्या मनकवड्याला स्पष्टपणें कळून आलें असतें कीं, मानाजीरावाविषयीं महाराजांनीं जसें एकवार भलताच संशय घेऊन करुणाराणीला वनवासाला पाठविलें, तसाच संशय मोहनच्या बाबतींत महाराजांना पुन्हां येणार नाहीं ना? मोहन

मामाजीरावापेक्षां कितीतरी पटीनें सुंदर होता; व तो गुणसंपन्न होता हें तर सिद्धच होतें. अशा रूपगुणसंपन्न तरुणानें आपल्या सारख्या समवयस्क स्त्रीचा इतक्या जिव्हाळयानें गौरव केलेला पाहून महाराजांच्या मनाला कांहीं विपरीत तर वाटणार नाहीं ना ! त्या तशा गोंधळलेल्या मनस्थितींत 'इडा पिडा टळो आणि अमंगळ दूर पळो ' अशी मनोभावानें परमेश्वराची प्रार्थना करण्यापलीकडे करुणाराणीच्या हातीं तरी दुसरें तिसरें काय होतें! ती अशा काल्पनिक शंकेनें भ्याली; हा तिचा दोष मुळींच नव्हता. दुधानें तोंड पोळलें कीं मांजर ताक देखील फुंकून पितें. राणीचा जीव एकदां पोळून निघाला होता. त्या हृदयाच्या जखमा अजून पूर्णपणें बऱ्या झाल्या नव्हत्या. तिला तसें वाटणें स्वाभाविकच होतें.

राणीचें दुर्भाग्य टळलें ही शुभ वार्ता ऐकून मोहननें हायसा एक उसासा सोडला. क्षणभर थांबून तो पुढें म्हणाला, " महाराजांच्या पायापाशीं माझी दुसरी फिर्याद अशी आहे कीं, चंदासाहेबासारख्या नराधमाला देहदंडाची शिक्षा योग्य असतां, इतकेंच काय पण निसर्गाची आडकाठी नसती व त्याला एकाच जन्मांत अनेकदां मेलेला जिवंत करून पुन्हा पुन्हा देहदंडाची शिक्षा देणें शक्य असतें, तर ती शिक्षा त्याच्या अघोर अपराधांना शोभली असती, असें असतां, तो राक्षस–तो साऱ्या मानव जातीचा शत्रू अजून जिवंत आहे हें बऱ्याचें लक्षण नाहीं. " तो एकदम थबकून किंचित् अधोवदन करून स्वतःशीं कसला तरी गूढ विचार करीत कांहीं क्षण स्तब्ध उभा राहिला व पुन्हां आपल्या गालावरचे घर्मबिंदु पुशीत उद्गारला, "कदाचित् राजकारणाच्या पूर्वापार परिणामाकडे लक्ष देऊन महाराजांनीं त्याला जिवंत ठेवलें असेल. परंतु मीं जर फिर्यादी म्हणून माझी वैयक्तिक हृदयद्रावक गाऱ्हाणीं महाराजांना ऐकविलीं तर ते त्या गाऱ्हाण्यांची दाद घेणार नाहींत काय ? "

"तुमचीं गाऱ्हाणीं काय आहेत?" महाराजांनी प्रश्न केला व ते व झुंजारराव एकाग्र दृष्टीनें मोहनची चर्या पहात होते. आपण भान विसरून भलतेंच बोलून गेलों असें वाटल्यामुळें कीं काय, मोहन गोंधळलेल्या मनःस्थितींत त्या प्रश्नाचें उत्तर देऊं शकला नाहीं. तेवढ्यांत झुंजाररावानें चटकन् आपल्या जागेवरून उठून मोहनापाशीं जाऊन त्याच्या मानेच्या डाव्या बाजूला कायसेसें निरखून पाहिलें. करुणेला तो काय पहातो हें अजमावतां न आल्यानें

तीही चार पावलें पुढें जाऊन त्याप्रमाणेंच पाहूं लागली. मोहनच्या तें तेव्हांच लक्षांत आलें. तो लगबगीनें मान फिरवून किंचित अधोवदन होऊन अस्वस्थ चित्तानें उभा राहिला. कां बरें?

# प्रकरण ३९ वें
# मोहना व करुणा बहिणी बहिणी !

"पाहूं दे,मला तुझ्या मानेवरची ती खूण पुन्हा एकदां पाहूं दे." झुंजारराव दुसऱ्या बाजूकडे वळून पहात म्हणाला. तेव्हांच करुणा झुंजाररावाच्या कानाशीं लागून हळूच उद्गारली,"मंगलेच्या मानेवर अशीच काळी खूण होती. ही मंगला तर नसेल ना ! "

"मोहन हा पुरुष नसून स्त्री असावी असें आज कैक दिवस त्याची कोमल चर्या मला सुचवीत आहे. " तो पुन्हां निरखून पहात उद्गारला, " खास ही मंगलाच आहे. हे डोळे, ही तोंडाची वाटोळी ठेवण—ही मंगलाच आहे खास—मंगले ! "

करुणेनेंही जुने पडताळे मनांत आठवून शक्य तेवढें निरीक्षण केलें, व ही मंगलाच आहे असे स्वत:शीं उद्गार काढीत पुढें जाऊन मोहनच्या—नव्हे,आपल्या परिचयाच्या मोहनेच्या मस्तकावरील मंदील आपल्या हातानें काढून घेतला. त्याबरोबरच तो मोहन नसून ती एक तरुणी आहे अशी साक्ष सर्वांना तेव्हांच पटली.

मोहन—पण आतां ती मंगला आहे, हें आपणाला कळून चुकलें आहे. मंगला दोन्ही हातांनीं आपलें वदन झांकून स्फुंदूं लागली. करुणाराणीनें तिला आपल्या हृदयाशीं धरून तिचें शांतवन केलें, "मंगले, रडूं नकोस. तूं कदाचित् मला ओळखलें नसशील. मी तुझी वडील बहीण आहें. " बोलतां बोलतां करुणाराणी स्वत:च हुंदके देऊं लागली. तिला तो गहिंवर आवरेना. मंगलेचें मस्तक करुणेच्या हृदयावर टेकलें आहे, तिच्या अश्रुधारांनीं करुणेचीं पावलें भिजत आहेत आणि करुणेच्या अश्रुगंगेची संतत धार तिच्या मस्तकावर पडत आहे, असा तो पाषाणालाही पाझर फोडणारा देखावा पाहून सर्वांचीं हृदयें उचंबळून आलीं. करुणेनें कधीं कधीं महाराजांना आपला पूर्व वृत्तांत सांगावा व महाराजांनीं तिचे शांतवन करावें, असे अनेक रोमहर्षणकारक प्रसंग त्या प्रेमळ जोडप्याच्या आयुष्यांत पूर्वी घडून आले असल्या कारणानें

महाराजांना तें गूढ उकलण्याला आपल्या बुद्धीला फारसा ताण द्यावा लागला नाहीं. करुणाराणी मंगलेला रडूं नको म्हणून सांगतां सांगतां, स्वत:च रडूं लागलेली पाहून तिची समस्या पूर्ण करण्यासाठीं ते आपण होऊन उद्गारले, "मंगले, करुणाराणी तुझी वडील बहीण आहे. ती आतां कोणी सामान्य स्त्री राहिलेली नाहीं. ती राणी आहे हें तूं ओळखतच आहेस. एवढा जबरदस्त जिव्हाळ्याचा आधार मिळाल्यावर तुला आतां जगांत भय कुणाचें आहे? मात्र तूं हें रहस्य इतके दिवस गुप्त राखून आम्हां सर्वांची तारांबळ उडवून दिलीस. हेंच रहस्य जर तूं राणीची आणि तुझी प्रथम भेट झाली तेव्हांच उलगडून दाखवलें असतेंस, तर तुझ्या आयुष्याचा मार्ग या पूर्वीच सुकर झाला असता."

यावरून वाचकांना कल्पना करतां आलीच असेल कीं मंगला हें मोहनेचें खरें नांव होतें, व तिच्या कपाळीं अज्ञातवास आल्यानंतर तिची नांवापुरती-देखील ओळख दुसऱ्या कोणाला पटूं नये यास्तव तिला मोहना हें दुसरें नांव ठेवण्यांत आलें होतें. मोहनाच ह्या एकंदर कारस्थानांत मूळपासून मोहन व निहालसिंग अशा दुहेरी वेषांतरानें वावरत होती.

"मंगले, इतकीं वर्षें तूं कुठें होतीस? आम्हीं तुझ्यासाठीं त्रिखंड धुंडाळलें तरी तुझा शोध लागला नाहीं. वेडे मुली, आम्हांला सोडून तूं कुठें गेली होतीस?" झुंजारराव टप्टप् आनंदाश्रु गाळीत मंगलेच्या पाठीवरून हात फिरवीत जिव्हाळ्यानें उद्गारला.

"बाबा!" मंगला आपले अश्रु पुशीत स्फुंदत स्फुंदत उद्गारली, "माझ्या हृदयाचाच काय पण माझ्या या साडेतीन हात देहाचा—माझ्या सबंध आयुष्याचा खरें पहातां पाषाण बनलेला आहे. स्त्रीजातीची अब्रू तिच्या पातिव्रत्यांत असते. अब्रू हाच स्त्रीजातीचा जिवंतपणा होय. तो जिवंतपणा परमेश्वरी कोपामुळें यापूर्वीच मी गमावून बसलें आहें. अशा स्थितींत मी आपणाला हें काळें तोंड दाखवण्याइतकी निर्लज्ज कशी बनूं! झाल्या त्या गोष्टी होऊन गेल्या. माझ्या मुखानें माझ्या अध:पाताची ती कहाणी मला वदवत नाहीं." ती करुणेची मिठी सोडवीत म्हणाली, "अध:पाताच्या खोल—खोल—सप्त पाताळापेक्षांही खोल अशा गर्तेत जन्मावेरीं कुजत पडलेली जगांतील अत्यंत अभागिनी स्त्री मी आहें. करुणाराणीसाहेब, माझ्या अपवित्र

स्पर्शानें आपणाला विटाळ झाला तेवढा पुरे. आपण दूर व्हा, मला जाऊं दे."

एवढें म्हणून मंगला करुणेची मिठी सोडवून माघारी जाऊं लागली. झुंजार-रावानें अपत्यस्नेहाच्या भरांत तिचें मनगट धरून तिला बळेंच अडविलें आणि विचारलें, "वेडे मुली, असा अविचार कां करतेस? माझी बालंबाल खात्री आहे कीं तूं त्यांतली मुलगी नव्हेस. तुझ्या पूर्वजन्मींच्या पापामुळें परमेश्वर तुझ्यावर कोपला असेल,–होऊं नयेत त्या गोष्टी तुझ्या हातून झाल्या असतील. प्रतिकूल परिस्थितीच्या भोंवऱ्यांत सांपडलेलीं दुर्दैवी माणसें फंसून अशींच अज्ञातवासाच्या रखरखीत रानोमाळीं करपत पडलेलीं असतात. त्याबद्दल मी तुला दोष देणार नाहीं. तूं कसलीही चिंता मनांत न ठेवतां आणि कसलेंही भय न बाळगतां यापुढें वागण्याचा निश्चय करून इथेंच रहा."

"मंगले, तुझ्या आयुष्याची अशी माती करणारा तो चांडाळ कोण आहे हें जर आम्हांला कळून येईल, तर त्याच्या रक्तानें तुझ्या नांवाला लागलेला कलंक धुवून काढण्याला आम्ही कमी करणार नाहीं." एवढें महाराज उद्‌गारले मात्र, त्याबरोबर मंगला उल्हसलेल्या अंतःकरणानें उद्‌गारली, "पहा–महाराज पहा! आपणाला आपला शब्द मागें घ्यावा लागेल. आपण विचार करा. आपण त्या अपराध्याला शासन केलें तर माझ्या बहिणीची दासी म्हणून देखील तिच्या पदरीं रहाण्याची माझी तयारी आहे. उरल्या जन्मांत अशा साध्वीची सेवा करण्यानें तरी माझ्या सर्व पापांचें निरसन होईल आणि मला सुखानें मरण येईल. पण मी आपणाला याच वेळीं निक्षून सांगतें, आपण जर आपला शब्द मागें घेतला तर मात्र ही मंगला कुणाची कोणी नव्हे." ती किंचित् थांबून अंमळ हलक्या पण करारी स्वरांत पुढें उद्‌गारली, "माझ्या उभ्या आयुष्यांतील अनुभव मला सांगतो आहे कीं, सत्ता आणि संपत्ति ह्या ज्यांच्या दासी आहेत अशा थोरामोठ्या लोकांना शब्दाची कांहींच किंमत नसते. आपण आपला शब्द खरा करूं शकणार नाहीं हें जितकें मला माहीत आहे तितकें हेंही माहीत आहे कीं, तो शब्द खरा करतां आला नाहीं म्हणून आपणांला विषाददेखील वाटणार नाहीं —"

करुणाराणी, झुंजारराव व मानाजी ह्या तिघांनाही मंगलेचे ते कठोर शब्द ऐकून अचंबा वाटला. साक्षात् महाराजांपुढें अशा तऱ्हेचे तुसडेपणाचे शब्द बोलण्याचें त्या तिघांपैकीं कोणाच्याच अंगवळणीं नव्हतें. खुद्द महा-

राजांनाही अचंबा वाटल्याचें त्यांच्या चर्येवरून स्पष्ट दिसून येत होतें. तशांतही ती बोलणारी व्यक्ति अन्य कोणी असती तर महाराजांच्या कोपानलांत ती त्याच क्षणीं होरपळून निघाली असती. परंतु मंगलेच्या मागें तिची पुण्याई सिद्धहस्त उभी होती, त्यामुळें महाराजांना तिचे कटु बोलही गोड मानून घ्यावे लागले. महाराज शांत चित्तानें तिला म्हणाले, " मंगले, तुझा जीव जगांतील कटु अनुभवाच्या अग्निवर्षावाखालीं भाजून निघाला असल्यामुळें असे पूर्ण निराशेचे उद्‌गार तुझ्या मुखांतून निघत आहेत हें आम्ही जाणतों. हा तुझा आतताईपणा असला तरी तो सद्‌हेतुमूलक आहे. म्हणूनच आम्ही तुला पुन्हा पूर्ववत् आश्वासन देतों कीं तुझ्यावर झालेल्या अत्याचाराचें प्रायश्चित्त तुझ्या वैऱ्याला देतां आलें नाहीं तर आम्ही राजे हें नांव यापुढें सांगणार नाहीं.सांग, तुझ्या वैऱ्याचें नांव काय तें सांग. "

" माझा वैरी चंदासाहेब आहे. बोला, आतां आपण त्याचें शासन करणार ना ? " मंगलेनें विचारलें. महाराज यावर कांहींच उत्तरले नाहींत. ते स्तब्धपणें सर्वांच्या तोंडाकडे पाहूं लागले. झुंजाररावानें महाराजांची बाजू घेण्याच्या उद्देशानें व मंगलेला वडीलकीच्या नात्यानें दाबण्याच्या उद्देशानें मध्यें कांहीं बोलण्याचा प्रयत्न केला. पण मंगला सर्वांनाच हातानें गप्प रहावयाला सांगून उद्‌गारली, " मला इतर कोणाचें कांहींही ऐकावयाला नको आहे. मी हें अगोदरच ओळखून होतें. पण एवढ्या धनंतर साम्राज्याचे महाराजदेखील यःकश्चित् एका अबलेला न्याय द्यावयाला कसे असमर्थ असतात हेंच मला खुद्द महाराजांना पटवून द्यावयाचें होतें. "

" मंगले, तूं म्हणतेस तें सारें खरें आहे, पण तुझा एका व्यक्तीच्या हिताहिताचा फाजील अभिमान धरून आम्हीं राष्ट्रहितावर निखारा ठेवला तर तो अक्षम्य अपराध होणार नाहीं का ? चंदासाहेब तुझा अनन्य अपराधी आहे हें आम्हांला सहस्रशः कबूल आहे. परंतु राष्ट्रहितासाठीं आज त्याला जिवंत ठेवणें आम्हांला प्राप्त आहे. राष्ट्रहिताकडे नजर देऊन तूं आम्हांला आमच्या वचनांतून एवढ्याबद्दल मुक्त करणार नाहींस का ? "

" आपल्या त्या राष्ट्राला आणि राष्ट्रहिताला घेऊन मला काय करावयाचें आहे! महाराज, आपण रागावूं नका, पण एका यःकश्चित् व्यक्तीचें हित साधण्याला देखील असमर्थ ठरलेले आपण राष्ट्रहित तें काय साधणार ? "

मंगला तशीच डोळ्यांना पदर लावून कांहीं वेळ स्फुंदत उभी होती. तोंच दुसऱ्या क्षणाला वीज चमकावी त्याप्रमाणें ती चमकून सर्वांग थरारत सावध-पणें जागच्या जागीं अंग सावरीत उद्गारली, "बस्स! मला न्याय मिळाला एवढा पुरे झाला, आतां माझा मार्ग मला मोकळा आहे." ती बोलतां बोलतां आपल्या वस्त्राखालीं लपविलेला जंबिया सर्कन बाहेर काढून तो आपल्या छातीवर रोंखीत उद्गारली, "या सर्वच क्षोभकारक गोष्टींचा शेवट करण्याचें निर्वाणीचें हेंच एक साधन माझें कैवारी होय. आपल्या सर्वांच्या आणि राणीसाहेब, आपल्यादेखील अंत:करणावरची ह्या मंगलेविषयींची अखेरचीसुद्धां स्मृति धुतली जावी आणि जगामध्यें ह्या मंग-लेचें नांवदेखील राहूं नये, म्हणून मी हें पहा हें असें माझ्या वैऱ्याच्या पापाचें प्रायश्चित्त घेत आहें —"

बोलतां बोलतां डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्यांत मंगलेनें खसकन खंजीर आपल्या छातींत खुपसला. मानाजी व झुंजारराव हे दोघे तिचा हात धरण्यासाठीं शक्य तेवढ्या चपळाईनें पुढें सरले. पण वीज कधींतरी कोणाला हातीं धरतां आली आहे! मंगला त्याक्षणीं हा लोक सोडून गेली. त्या दिवाण-खान्यांत तिच्या रक्ताचा लाल सडा पडला आतां तिच्या अजब कर्तबगारीची मंगल स्मृति तेवढी बाकी राहिली होती, व ती मात्र महाराज, करुणाराणी वगैरे सर्वांच्या मनांत अगदीं ताजी होती. त्या स्मृतीनेंच त्या सर्वांचीं मस्तकें मंगलेच्या कलेवरासमोर नमविलीं. सर्वांनीं तिच्या रक्ताचा टिळा कपाळीं लावून तिला धन्यवाद दिले. त्या थोर मनाच्या शापभ्रष्ट देवतेविषयीं सर्वांच्या अंत:करणाला किती हळहळ वाटली असेल याचें वर्णन कोणत्या शब्दांनीं करावें!

# उपसंहार



त्रिचनापल्लीच्या लढाईंत रतनसिंग व रामस्वामि यांसारखें जे निष्ठावंत हिंदु साह्यकर्ते झाले, त्या सर्वांचा मुराररराव घोरपडे व रघूजी भोंसले यांनीं यथोचित परामर्ष घेतला. त्या सर्वांना त्याच किल्ल्यांत आपल्या मायघरीं मान–सन्मानानें रहावयाला मिळाल्यानें अत्यंत संतोष वाटला. सच्चिदानंद आपल्या देशसेवेचा सर्व भार वृद्धापकाळामुळें आपल्या शिष्यावर सोंपवून तीर्थाटणाला निघून गेले. तोतया राजपुत्र सवाई शहाजी आपल्या आईसह कोठें तरी सुखानें काळ कंठीत होता.

* * *

ठरल्याप्रमाणें रघूजी भोंसले वगैरे साताऱ्याकडील मंडळी प्रतापसिंह महाराजांशीं तह, करार मदार वगैरे शहाजोगपणें आटोपून चंदासाहेबासह अविलंबानें साताऱ्याला येऊन पोंचली. कर्नाटकांतील ह्या इरेला पेटलेल्या मोहिमेचा शेवट काय होतो इकडे सर्वांचें लक्ष लागून राहिल्यामुळें शाहूमहाराज साताऱ्यांतच होते व नानासाहेब पेशवेही मुद्दाम भोंसल्यांच्या आगमनाची वार्ता ऐकून तेथेंच त्यांची वाट पहात राहिले होते. भोंसले चंदासाहेबाला कैद करून बरोबर आणीत आहेत अशी खबर जेव्हां शाहूमहाराजांना कळली, तेव्हां त्यांना पराकाष्ठेचा आनंद तर झालाच; पण ही मोहीम अर्धवट अपुरी पडण्याचा संभव असतां नानासाहेबांनीं कांहींशा दुराग्रहानें ती पुढें चालविली ह्याबद्दल महाराजांना आतां त्या तरुण पेशव्याचें कौतुक करावें तेवढें थोडेसें वाटूं लागलें. रघूजी भोंसले वगैरे मंडळी नानासाहेबांच्या सक्तीच्या हुकुमान्वयें पुन्हा कर्नाटकांत मोहिमेवर गेल्यापासून त्यांच्या निंदकांना त्यांची भरमसाट निंदा करावयाला चांगलेंच फावलें होतें; आणि निंदापुराण अव्याहत सुरू ठेवतां येऊन महाराजांच्या मनांत पेशव्यांविषयीं चांगलेंच काळें ओकतां यावें ह्या हेतूनें कर्नाटकची मोहीम अयशस्वी व्हावी म्हणून कैकजण परमेश्वराची प्रार्थना करीत होते. त्या सर्वांना मोहिमेच्या यशस्वितेची वार्ता ऐकून

पितृनिधनानंतर्कें दुःख झालें हें निराळें सांगावयाला नकोच. नानासाहेब ज्ञात्याच धूर्त असल्यामुळें हें सर्व कांहीं जाणत होते. परंतु त्यांनीं असल्या लुंग्या-सुंग्यांकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. नानासाहेबांना पेशवाईचीं वस्त्रें मिळण्याच्या वेळीं रघूजी भोंसल्यानीं कसून विरोध केला व बाबूजी नाइकही मध्यें आडवे पडले, तरी तें किल्मिष मनांत न ठेवतां नानासाहेबांनीं त्यांच्या स्वागताची अभूतपूर्व तयारी ठेवण्याची व्यवस्था केली. खुद्द महाराजांनींही एखाद्यादेखील नगरप्रवेशाच्या प्रसंगीं जो गुणगौरव अनुभविला नसेल तो भोंसले, नाईक वगैरे मोहिमेवरून विजयी होऊन आलेल्या मंडळींच्या वांटयाला आला. नाइकांचा वांटा म्हणजे सोंवळयाबरोबर बासन एवढाच त्याचा अर्थ ! खुद्द महाराजदेखील नानासाहेबांसह त्या मंडळीला वेशीपावेतों सामोरे गेले होते. त्यांना शृंगारलेल्या हत्तीवरील अंबारींतून राजवाड्यापावेतों मिरवत आणण्यांत आलें, आणि लगेच खासा दरबार भरवून त्यांचा मानसन्मान करण्यांत आला. अभागी चंदासाहेबाच्या वांटयाला ह्या मानसन्मानापैकीं कांहीं-देखील जरी आलें नाहीं तरी त्याचा पूर्ववैभवाला साजेसा इतमाम राखण्यांत नानासाहेबांनीं मुळींच कसूर केली नाहीं. चंदासाहेबाला त्यांच्या हुकुमावरून तबडतोब तेथल्या अजिमतारा किल्ल्यांतील एका राजवाड्यांत नजरकैदी म्हणून नेऊन ठेवण्यांत आलें, व त्याच्या तैनातीची योग्य ती व्यवस्था करून देण्यांत आली. याउप्परही चंदासाहेबाला तें मेलेलें जिणें मरणापेक्षां दुःसह वाटावें यांत कांहीं नवल नाहीं. तो तर मानखंडनेमुळें इतका बेभान होऊन गेला होता कीं यापेक्षां मरण बरें असें त्यानें ज्याच्या–त्याच्यापाशीं बोलून दाखविलें; आणि हेंही खरें कीं चंदासाहेब जर कोणत्याही निमित्तानें तेव्हांच जगांतून नाहींसा झाला असता, तर मराठी साम्राज्यावरची एक मोठी आपत्ति अनायासें टळली असती, आणि कर्नाटकांत मराठ्यांच्या साम्राज्यसत्तेचा चिरस्थायी विस्तार झाला असता. पण भवितव्यतेची इच्छा तशी नव्हती. उलट त्याच चंदासाहेबानें पुढें कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ होऊन मराठी साम्राज्याच्या मानेवर घाव घालावा अशी विधिघटनाच होती! तिथें कोण काय करणार !

तो कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ पुढें सात आठ वर्षांनीं कर्नाटकांत मराठी साम्राज्याच्या हितविध्वंसाला कसा कारण झाला तें वृत्त पुढें यथाकालीं निवेदन

करण्यांत येईल. तूर्त एवढें खरें कीं फार वर्षांपासून मराठ्यांच्या मनांत डांचत असलेला कर्नाटकांतील यवनांचा धांगडधिंगा प्रस्तुतच्या मोहिमेमुळें बहुशः थांबला. उभ्या कर्नाटकांत यवन सत्ता जवळ जवळ नामशेष होऊन गेली असें म्हटलें तरी चालेल. लुप्तप्राय झालेलें तंजावरचें राज्य पुन्हा ऊर्जितावस्थेला येऊं लागून मराठी साम्राज्याच्या विस्ताराचा दक्षिणेंतील मार्ग अशा रीतीनें निष्कंटक झाला, आणि तरुण नानासाहेब पेशव्यांच्या प्रतिस्पर्धी ग्रामसिंहांचीं तोंडें पेशव्यांच्या ह्या पहिल्याच राजकारणपटुतेच्या बेमालूम डावानें अगदीं बंद होऊन गेलीं. बाजिरावांच्या निधनाबरोबर पेशवाई ठार बुडाली असे अमंगल उद्गार काढणाऱ्या सर्वांना नानासाहेबांच्या अंगची ही राजकारणाची अवाढव्य उरक व दूरदर्शित्व पाहून मनांतल्या मनांत आणि जे कोणी निःपक्षपाती होते त्यांना तर जगांतदेखील—कबूल करणें भाग पडलें कीं पेशवाई बुडाली नाहीं, तर जुन्या पेशवाई कारभाराला कार्यक्षमतेचा नवा उजाळा देणारें हें **पेशवाईचें मन्वंतर** घडून आलें. अर्थात् हा त्या मन्वन्तराचा केवळ प्रारंभकाळ होय. त्याचा खरा विकास ह्या पुढील पेशवाई मालेंतील **पेशवाईचा पुनर्विकास** ह्या पुढील कादंबरींतून यथावत् निवेदन कऱ्यांत करण्यांत येईलच.

ॐ तत्सत्

शाळेतील शिक्षण जन्मभर पुरत नाहीं, यास्तव ग्रंथ हेच आपले कायमचे गुरु होत.

प्रो॰ हिक्सन.